






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य पत्रिका १९८७-८८

जुलै - सप्टेंबर १९८७ - अंक २४२

ऑक्टो - डिसें १९८७ - अंक २४३ (दलित सा.हि.अंक)

जाने - मार्च १९८८ अंक २४४

एप्रिल - जून १९८८ - अंक २४५

संपादक - डॉ. वसंत स जोशी

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषद

# साहित्यिक साहाय्य निधी

वृद्ध, अपंग आणि निराधार साहित्यिकांना आर्थिक साहाय्य देण्यासाठी सांप्रतच्या कार्यकारी मंडळाने साहित्यिक साहाय्य निधी जमा करण्याची योजना यापूर्वी हाती घेतली आहे. या निधीला सढळपणे देणग्या देऊन साहित्यिकांबद्दलची आपली कृतज्ञता साहित्य-प्रेमी जनतेने व्यक्त करावी, असे आवाहन यापूर्वीच करण्यात आले आहे. या आवाहनाला उत्तम प्रतिसाद मिळत आहे, हे नमूद करण्यास आनंद होतो.

दि. २६-८-१९८७ पर्यंत साहित्य परिषदेकडे जमा झालेल्या देणग्यांचा तपशील याच अंकामधे देण्यात आला आहे.

या अपूर्व उपक्रमाचे महत्त्व आणि आवश्यकता ओळखून या निधीसाठी सर्व साहित्य-प्रेमी रसिकांनी जास्तीत जास्त रकमेची देणगी रोख, चेकने किंवा ड्राफ्टने 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे' या नावाने पाठवावी, अशी आग्रहाची विनंती आहे. या निधीसाठी दिलेल्या देणगीला आयकरातून सूट मिळणार असून देणगीची रीतसर पावती लगेच पाठविण्यात येईल आणि देणगीदारांची नावे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील.

आपले

| | | |
|---|---|---|
| **शंकर पाटील** | **राजेंद्र बनहट्टी** | **गं. ना. जोगळेकर** |
| **अध्यक्ष** | **कार्याध्यक्ष** | **कोषाध्यक्ष** |

**राजा फडणीस, म. वि. गोखले, प्रभाकर अत्रे**
**कार्यवाह**



महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २४२ ☆ जुलै–सप्टेंबर १९८७ ☆ मूल्य पाच रुपये

☆ ☆

## अनुक्रम

संपादकीय / दोन
व. दि. कुलकर्णी : गंधर्वलोकीचा राजहंस / १
ह. श्री. शेणोलीकर : मराठी संतांचे तत्त्वज्ञान (पूर्वार्ध) / ९
पुष्पा लिमये : ‘चंद्रिका’– एक अभ्यास (प्रथम वर्ष इ. स. १८५४–१८५५) / १९
डॉ. द. न. गोखले : भाषा-शोधन (भाषिक व्यवहारातील विवेक) लेखांक दुसरा / ३०
डॉ. गंगाधर वार्चे : ‘तसे काही नाही मनी...’ / ३३
प्रा. रुस्तुम अचलखांब : तमाशातील एक घटक : “नाच्या” / ३८
डॉ. गो. रा. कामतकर : लोकहितवादी, दिल्ली दरबार व राववहाद्दूर पदवी... / ४२
ल. रा. नसिराबादकर : अजुनी चालतोचि वाट ! माळ हा सरेना / ४४

**ग्रंथपरीक्षण**

वसंत सावंत : फकिराचे अभंग / ४९
दत्तात्रय पुंडे : लर्निंग मराठी / ५१
एस्. एम्. कानडजे : एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र : एक दृष्टिक्षेप / ५४
पत्रसंवाद / ५५
परिषदवार्ता / सतरा
वार्षिक सभेची सूचना, वार्षिक कार्यवृत्त, वार्षिक जमाखर्च, ताळेबंद आणि अर्थसंकल्प / एक ते सत्तावीस

☆ ☆

संपादक : **वसंत स. जोशी**
संपादन समिती : **ज्योत्स्ना देवधर, राजा फडणीस, म. ना. अदवंत**
सल्लागार : **राजेन्द्र बनहट्टी, गो. म. कुलकर्णी**
मुखपृष्ठ : **अनिल अवचट**
प्रकाशक व मुद्रक : **म. वि. गोखले**, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरध्वनी : ४४२९६३
मुद्रण स्थळ : सौ. कमल रामचंद्र घळसासी, संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

☆ ☆

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत



# संपादकीय

**' एकला नयनांचा / श्रवणाचा विषय तो झाला '**

बालगंधर्व (नारायण श्रीपाद राजहंस) हे महाराष्ट्राच्या गेल्या पिढीने अनुभवलेले एक स्वप्न होते आणि आजच्या पिढीची ती आख्यायिका आहे. मराठी नाटक, रंगभूमी आणि प्रेक्षक यांवर जबरदस्त प्रभाव असणाऱ्या गेल्या पिढीतील या रूप आणि गुणसंपन्न अभिनेत्याची जन्मशताब्दी या वर्षी साजरी होत आहे. (जन्म दि. २६ जून १८८८. मृत्यू १५ जुलै १९६७.)

रसिकांना स्वरगंधाने आकंठ तृप्त करणारा, त्यांना मायबाप मानणारा, मराठी रंगभूमीला अपूर्व वैभव प्राप्त करून देणारा एक लोकविलक्षण कलावंत बालगंधर्वांच्या रूपाने महाराष्ट्राला लाभला होता. या थोर पुरुषाने अपार वैभव भोगले, तशी विपन्नावस्थाही अनुभवली; परंतु या दोन्ही अवस्थांत त्यांची वृत्ती समाधानी होती. आलेले अपयश किंवा वाट्याला आलेले दुःख यांविषयी कधी त्यांनी तक्रार केली नाही. ज्या अभिनयाने आणि गाण्याने रंगभूमीवर त्यांनी शृंगार फुलविला, तितक्याच उत्कटतेने संतांची अभंगवाणी गाऊन रसिकमने भिजविली. राजवैभव ल्यालेली रुक्मिणी जशी रसिकमने रिझवीत होती, तशीच फाटक्याविटक्या वस्त्रात जात्यावर दळत असलेली गडकऱ्यांची सिंधू रसिकहृदयांना पाझर फोडत होती.

अपूर्व स्वरविलासांचे इंद्रधनुष्य निर्माण करणारे बालगंधर्व, प्रदीर्घ संवादांचे इंद्रधनुष्यही लीलया पेलत असत. किंबहुना देवयानीसारख्या भूमिका बालगंधर्वांखेरीज इतरांना पेलण्यासारख्या नव्हत्या. गायन आणि संवाद यांतील दमसास त्यांच्याकडून सारख्याच तोलाने साधली जात असे. मराठी सांगीतिक रंगभूमी बालगंधर्वांनी वैभवसंपन्न बनवलीच; परंतु मराठी नाट्यलेखनावरही त्यांचा प्रभाव पडला. त्यांच्यामुळेच श्री. काकासाहेब खाडिलकरांची नाटके नायिकाप्रधान बनत गेली. विष्णुदास भाव्यांच्या काळातील मराठी रंगभूमीचे स्वरूप त्यांनी आमूलाग्र पालटून टाकले. नाट्यगृहाबाहेर प्रतिष्ठित व्यक्तींचा वावर, रसिकांचे दिमाखदार स्वागत, अत्तरांच्या सुगंधाने दरवळलेले नाट्यगृह, पाहताच टाळी मिळविणारे आणि एका आगळ्या वातावरणात नेणारे पडदे, भरजरी वस्त्रे, अस्सल दागिने, गायनाला साथ देणारे साथीदार आणि दाद देणारे प्रेक्षक हा सोहळा पाहणारे सारेजण गंधर्वलोकीचा संजीवक अनुभव घेत असत.

नारायण राजहंस या बालकलाकाराला १८९८ मध्ये लो. टिळकांकडून 'बालगंधर्व' ही पदवी मिळाली. १९२९ मध्ये पुणे येथे भरलेल्या महाराष्ट्र नाट्यमहोत्सवाचे ते अध्यक्ष होते. १९४४ मध्ये मुंबईच्या नाट्यशताब्दी-महोत्सवाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. १९६४ मध्ये भारत सरकारने 'पद्मभूषण' हा किताब त्यांना दिला. तरी प्रारंभापासून अखेरपर्यंत ते 'रसिकहृदय सम्राट'च राहिले. त्यांच्या 'धर्मात्मा' या चित्रपटातील किंवा अन्य काही नाटकांतील पुरुष भूमिकांपेक्षा त्यांच्या स्त्रीभूमिकाच अधिक गाजल्या. स्त्रीपार्टीनट ही कल्पना आता इतिहासजमा झाली आहे; परंतु बालगंधर्वांच्या स्मृतींची कोरीव लेणी रसिकहृदयांना अनंतकाळपर्यंत त्यांचा अवीट प्रत्यय देत राहील.

**' उघडि नयन रम्य उषा हसत हसत आली '**

या रम्य पंक्तीने प्रारंभ झालेली सुप्रसिद्ध कविता लिहिणारे कै. एकनाथ पांडुरंग रेंदाळकर यांची जन्मशताब्दी याच वर्षी पूर्ण होत आहे. (जन्म : १ जुलै १८८७, मृत्यू : २२ नोव्हेंबर १९२०.) संस्कृतच्या उत्तम अध्ययनाने

भाषाप्रभुत्व आणि रचनाप्रभुत्व लाभलेल्या कै. रेंदाळकरांनी विपुल काव्यरचना केली. बंगाली आणि इंग्रजी साहित्याचाही त्यांचा व्यासंग होता, याचे प्रत्यंतर त्यांच्या कित्येक कवितांतून येते. ' उघडि नयन...... ' ही त्यांची कविता खूप गाजली. कै. वा. सी. मर्ढेकरांनाही तिचे विडंबन करण्याचा मोह झाला. त्यांना लाभलेल्या केवळ तेहतीस वर्षांच्या अल्पायुष्यात कवी, लेखक, संपादक या नात्यांनी त्यांनी चांगले नाव कमावले. त्यांच्या कवितांचे दोन खंड प्रसिद्ध झाले असून ' उघडि नयन ' या नावाने प्रा. भ. श्री. पंडित यांनी त्यांच्या निवडक कवितांचा संग्रह संपादित केला आहे. ' मनोरंजन ', ' करमणूक ', ' विविधज्ञानविस्तार ', ' धर्मविचार ' (कोल्हापूर) यांसारख्या तत्कालीन प्रतिष्ठित नियतकालिकांचे संपादन करण्याची संधी त्यांना लाभली. काही कादंबऱ्या, कथा, ' अन्योक्ति मुक्तांजली 'सारखे संग्रह, सुनीते, ' सारजा ' व ' यमुनागीत ' ही खंडकाव्ये, बंगाली नाटकांची भाषांतरे इ. लेखनही त्यांनी केले. आपल्या संपादकत्वाखालील नियतकालिकांतून स्वतःच्या कवितांना वारंवार स्थान देणे अर्थात अवघड होतेच; परंतु ज्यांच्या कवितांना स्थान देणे शक्य झाले नाही, ते त्यांचे विरोधक बनले आणि रेंदाळकरांना टीकेचे प्रहार झेलावे लागले. त्यांचे प्रापंचिक जीवनही सुखाचे नव्हते. विवाहानंतर काही वर्षातच त्यांच्या पत्नीचे देहावसान झाले. उपजीविकेसाठी शिक्षक, मुद्रितशोधक, संपादक, कीर्तनासाठी आख्याने लिहून देणे अशी अनेक प्रकारची कामे त्यांनी केली. क्षयासारख्या असाध्य रोगाने ग्रस्त झाल्याने शेवटी रेंदाळ या कोल्हापूरपासून चौदा-पंधरा मैलांवर असलेल्या मूळ गावी दि. २२ नोव्हेंबर १९२० रोजी त्यांचे निधन झाले.

रेंदाळकरांच्या निर्यमकरचना पद्धतीवर टीकाकारांनी काहूर माजविले. त्यात त्यांची कविता ही कविताच नव्हे, येथपर्यंत आरोप केले गेले; परंतु त्यांच्या काव्यरचनेविषयी आदर बाळगणाऱ्यांनी हे आरोप खोडून काढले. हिंगणे येथील ' महिलाश्रमा 'त काही दिवस शिक्षकाची नोकरी त्यांनी केली. स्त्रीविषयक आणि अन्य सामाजिक सुधारणांच्या संदर्भात त्यांनी हिरीरीने लिहिले. त्यांचे पूर्वकालीन आणि केशवसुतांसारखे समकालीन कवी यांच्याविषयी त्यांच्या मनात मोठा आदरभाव होता. ' गंगौघापरि भव्य केशवसुता ! सावेश वाणी तुझी ' असे गौरवोद्‌गार त्यांनी काढले आहेत. राष्ट्रीय, सामाजिक, निसर्गपर, स्तोत्रसदृश, भावगीतात्मक अशी अनेकविध काव्यरचना त्यांनी केली. पारंपरिकतेचे संस्कार लाभूनही पुरोगामित्वाचा पुरस्कार करणारी त्यांची कविता होती. वृत्तीने हळवे असल्यामुळे वैयक्तिक आणि सामाजिक जीवनात त्यांना सोसाव्या लागलेल्या आघाताचे प्रतिसाद त्यांच्या काव्यात उमटले आहेत. खडतर हालअपेष्टांनी थकलेले आणि क्षयाने पोखरलेले त्यांचे शरीर त्यांना फार काळ साथ देऊ शकले नाही. ते ज्या सुखी, शांत जीवनाच्या प्रतीक्षेत होते, ते त्यांना कधी लाभलेच नाही. मृत्यूपूर्वी केवळ चार-पाच महिन्याआधी (मे १९२०) ' मासिक मनोरंजन ' मध्ये प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या ' अजुनि चालतोचि वाट ' या कवितेत आपल्या साऱ्या व्यथा-वेदना त्यांनी अभिव्यक्त केल्या आहेत.

अजुनि चालतोचि वाट ! माळ हा सरेना !
विश्रान्तिस्थल केव्हा यायचे कळेना !
त्राण ना देहात लेश, पाय टाकवेना
गरगर शिर फिरत अजी होय पुरी दैना !
......
कुठुनि निघालो, कोठे जायचे न ठावे
मार्गातच काय सकल आयु सरुनि जावे !
......
पुरे पुरे ही असली मुशाफरी आता
या धूळित दगडावर टेकलाच माथा !

या कालखंडातील केशवसुत, गोविंदाग्रज, बालकवी यांसारख्या कवींचे जीवन नैराश्याने झाकोळलेले होते आणि



अनुक्रमणिका

अल्पायुष्य हा त्यांना लाभलेला शाप होता. रेंदाळकरांचे जीवनही दुर्दैवाने याच अवस्थेशी निगडित होते. त्यामुळेच 'रम्य उषे'ची चित्रे रंगविणाऱ्या या कवीला विश्रान्तिस्थलाचा शोध घेताना 'अजुनि चालतोचि वाट माळ हा सरेना' ही अगतिकता अनुभवीत वाटचाला आलेल्या धुळीतील परिस्थितीच्या दगडावर माथा टेकण्याचे हताश उद्गार काढावे लागले !

नाट्य आणि काव्य या क्षेत्रांत कर्तृत्व गाजविणाऱ्या 'बालगंधर्व' आणि 'एकनाथ पांडुरंग रेंदाळकर' यांना त्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त आमचे विनम्र अभिवादन.

### संमेलनाध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर

६१ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी सुप्रसिद्ध नाटककार आणि कथा–कादंबरीकार प्रा. वसंत कानेटकर यांची बहुमताने निवड झाली आहे. यापूर्वी कुर्ला येथील नाट्य संमेलनाचे आणि बडोदा, इंदूर येथील साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पुणे येथे मे १९८६ मध्ये भरलेल्या चौथ्या विभागीय साहित्य संमेलनाचेही ते अध्यक्ष होते. भारतातील अनेक भाषात त्यांच्या नाटकांची भाषांतरे झाली असून अशी सहा नाटके वाराणसी येथे भरलेल्या नाट्यमहोत्सवात सादर करण्यात आली होती. नवसाहित्यातील संज्ञाप्रवाही आणि मनोविश्लेषणात्मक लेखनाच्या काळात त्यांच्या 'घर', 'पंख'. आणि 'पोरका' या कादंबऱ्या गाजल्या. याच धर्तीवरील 'वेड्याचे घर उन्हात' या नाटकाने त्यांना नाटककार म्हणून स्थान व यश मिळवून दिले. या वाङ्मयप्रकाराचे माध्यम त्यांना सर्वस्वी अनुकूल आणि यशोदायी ठरले. त्यांची अनेक नाटके प्रायोगिक आणि व्यावसायिक रंगभूमीवर गाजली आणि आजच्या मराठी रंगभूमीवरील प्रा. कानेटकर हे अत्यंत लोकप्रिय नाटककार ठरले आहेत. साहित्य क्षेत्रातील संमेलनाध्यक्षपदाचा सर्वोच्च मान प्राप्त झाल्याबद्दल आम्ही प्रा. वसंतराव कानेटकर यांचे हार्दिक अभिनंदन करतो.

### अभिनंदन

महाराष्ट्राचे आवडते साहित्यिक श्री. पु. ल. देशपांडे यांचा मध्यप्रदेश शासनाने कालिदास पुरस्कार देऊन सन्मान केला आहे. ज्येष्ठ कथालेखक श्री. अरविंद गोखले यांना बिहार शासनाचे अहिंदी साहित्यिकाला देण्यात येणारे पारितोषिक मिळाले आहे. ज्येष्ठ संशोधक आणि समीक्षक डॉ. वि. रा. करंदीकर यांच्या 'भगवान रामकृष्ण आणि स्वामी विवेकानंद' या ग्रंथाला स्वामी स्वरूपानंद यांच्या स्मत्यर्थ पारितोषिक देण्यात आले आहे. या सर्व साहित्यिकांचे साहित्य परिषदेतर्फे मनःपूर्वक अभिनंदन.

म. सा. परिषदेशी कोषाध्यक्ष, कार्यवाह अशा विविध नात्यांनी निगडित असलेले आणि मराठी शुद्धलेखनविषयक अधिकारी लेखक श्री. मो. रा. वाळंबे यांच्या वयास ७५ वर्षे पूर्ण झाली. त्याचप्रमाणे सुप्रसिद्ध साहित्यिक आणि पुण्याच्या गरवारे महाविद्यालयातील मराठीचे प्राध्यापक द. मा. मिरासदार यांच्या वयास ६० वर्षे पूर्ण झाल्याने ते सेवानिवृत्त झाले. या उभयतांचे आम्ही अभिनंदन करतो आणि त्यांना निरामय दीर्घायुष्य इच्छितो.

— संपादक













व. दि. कुलकर्णी

# गंधर्वलोकीचा राजहंस



बालगंधर्वांना मी प्रथम पाहिलं ते बार्शीला १९३३ मध्ये. त्यावेळी त्यांच्या नाटक मंडळीचा बार्शीला एक महिनाभर मुक्काम होता. मी तेव्हा दहा वर्षांचा होतो. गंधर्वांना पाहावं, त्यांची नाटकं पाहावीत, असं मला फार फार वाटे बार्शी गाव हे नाटकवेडं गाव होतं. स्वत: अण्णासाहेब किर्लोस्कर पूर्वी बार्शीत खेळ करून गेले होते. कृ. आ. गुरुजींचे कुटुंबीय बार्शीत राहत होते. गावात अनेक दत्तगुरुवार क्लब होते व त्यांची नाटकं सारखी होत असत. किर्लोस्कर, देवल, खाडिलकर, गडकरी, वीर वामनराव जोशी यांची नाटकं या क्लबांतून यथासांग केली जात. बार्शीचे खेळ 'हाऊस–फुल' जात असत. कुर्डुवाडी, माढे, पंढरपूर, लातूर, उस्मानाबाद, परांडा, तुळजापूर इकडून लोक येत असत. गंधर्वांचे खेळ म्हणजे महापर्वणीच !

लहान गावात बाहेरची मोठी माणसं आली म्हणजे त्यांना बघायला सर्व गाव लोटतं आणि ही मोठी माणसं अशा लहान गावात अगदी जवळून भरपूर पाह्यला मिळतातही. बालगंधर्वांना मी बार्शीत भरपूर पाह्यलं. औंधकर थिएटरात नाटकाचे खेळ होत. तिथं बालगंधर्वांना पाहण्यासाठी लोकच लोक जमत. नाटका-आधी संध्याकाळी श्मश्रू करवून बालगंधर्व स्नानाला जात. तो मार्ग थिएटरबाहेरून जात असे. बालगंधर्व दिसले की "आले ! बालगंधर्व आले ! !" असं लोक उद्गारत आणि साक्षात बालगंधर्वांची पय:फेनधवल मूर्ती शांतपणे पावलं टाकीत समोरून येई आणि समोरून निघून जाई. बालगंधर्व 'डोळां बैसले, बैसले' ते या रूपात–या पुरुषाकारात !

......आणि एके दिवशी, म्हणजे एके रात्री, मला अचानकपणे गंधर्वांचं नाटक पाह्यला मिळालं. थिएटर-मध्ये प्रवेश करतानाच माझ्या देहामनात काहीतरी अद्‌भुतरम्य घडतं आहे, असं वाटत होतं. थिएटरमध्ये धूप दरवळला होता, तिसरी घंटा घणघणत थांबली होती आणि दर्शनी पडदा वर गेला होता. रंगमंचावर कोणीएक तरुण माणूस टेलिफोनवर बोलत होता. टेलिफोन हे त्या काळात एक अद्‌भुत नवलच होतं. थोडयाच वेळात तो तरुण माणूस आत बघत, "सिंधू, जरा इकडं ये पाहू सिंधू" म्हणून सिंधूला हाक मारू लागला. सिंधू आतून बाहेर रंगमंचावर आली. 'बालगंधर्व', 'बालगंधर्व' म्हणून लोक उद्गारू लागले. रोज थिएटराबाहेर पुरुषाकारात पाहिलेला तो गोरापान पुरुष असा नऊवारी साडीत–अंगावर अलंकार, केसात फुलांची वेणी–अशा स्त्रीरूपात पाहून मला अद्‌भुत नवलच नवल वाटलं. बालगंधर्व स्त्रीभूमिका करतात, हे आम्हांला चांगलं तोंडपाठ होतं; पण प्रत्यक्ष स्त्रीभूमिका म्हणजे काय, ते आज दिसत होतं. बालगंधर्व सुंदरातल्या सुंदर स्त्रीहूनही सुंदर दिसत होते. "पुणे–मुंबईतल्या सौंदर्यसम्राज्ञी बालगंधर्वांसारखं दिसायचा, बोलण्या-चालण्याचा प्रयत्न करतात," असं थोरला भाऊ सांगत होता तो पुढं म्हणाला, "दहा–पंधरा वर्षांपूर्वी तर बालगंधर्व स्वर्गातल्या अप्सरेप्रमाणं दिसायचे !" बालगंधर्वांचं ते सुंदर रूप अजूनही माझ्या डोळ्यांत साचलेलं आहे.

नाटक चालूच होतं. माझ्या डोक्यावरून ते जात होतं, पण डोळ्यांपुढून हलत नव्हतं. पहिल्या अंकातली सुंदर वस्त्रालंकारातली, सतेज, सुंदर सिंधू हळूहळू कोमेजत जात असलेली दिसत होती. तिचं तेज हरपलं होतं. अंगावरची उंची वस्त्रं गेली होती. ती मळकं, विटकं, जाडंभरडं लुगडं नेसली होती. तिचा नवरा दारू पिऊ लागला होता आणि तिचा छळ करीत होता, हे चांगलं कळत होतं. नवऱ्याची लाथ खाऊनही सिंधू आपल्या पतीची सेवा करीतच होती. लहान गावात, सगळ्यांना सगळ्यांचं सगळं माहीत असतं. बार्शीतल्या दारुबाजांचे संसार आम्हा लहान मुलांनाही ठाऊक होते. काही तर जवळून पाहिले होते. कसलं

तरी, धडोतंही नव्हे, फाटकं नेसून, आसवं गाळत दळत असणाऱ्या सिंधू आम्हाला तशा अनोळखी नव्हत्या. पण दळण दळत असताना शांत सुरात

चंद्र चवथिचा
रामाच्या ग बागेमधि। चाफा नवतिचा।

असं गाणं गाणारी सिंधू आम्ही पाहिली नव्हती. सिंधूचं गाणं ऐकण्यात मी रमलो होतो. पण तेवढ्यात, शेजारीच झोपविलेलं तिचं बाळ उठलं आणि रडू लागलं. सिंधू आता त्या बाळाला घेते, त्याच्याशी बोलते; बोलतच राहते. ते बोलणं बाळाला तर कळतच नसतं; मला ते कळतं; आणि कळतही नाही. एक नक्की कळत होतं की, आई बाळाशी अगदी प्रेमानं काही कानगोष्ट करीत आहे... मंद निळसर प्रकाशातलं हे एकान्त दृश्य......जात्याची घरवर संपलेली, निम्मं अधिक पीठ जात्याच्या पाळीतून ओघळलेलं, जवळच सुपात काही धान्य उरलेलं, गुडघ्यात मुडपलेला उजवा पाय आणि जात्याच्या बाजूनं पसरलेला डावा पाय तसाच, अन् बाळाला उचलून छातीशी घेत, त्याचे पापे घेत घेत, त्याच्याशी ब्रह्मांड बोलणारी ती आई–ती सिंधू–ते बालगंधर्वरूप–माझ्या बालनेत्रात जे साचलं, ते अजूनही साचलेलं आहे. पुढे तिचा तो नवरा येतो· तिला मारतो, बाळाला तर काठीनं ठार करतो...फार भयानक, भीतिदायक ! ... सुधाकराच्या मांडीवर डोकं ठेवून प्राण सोडणारी सिंधू मी कधीही विसरू शकत नाही वयाच्या दहाव्या वर्षी पाहिलेल्या त्या 'एकच प्याला' मधली सिंधूची रूपं—ती बालगंधर्वरूपं–आज 'एकच प्याला' वाचताना चांगली जागी होतात; अधिक स्पष्ट होतात, पूर्ण रूपात प्रकटतात. त्यांना आता अर्थच अर्थ प्राप्त होतात. मूळ शब्दरूप सिंधू माझ्या मन:चक्षूंपुढं बालगंधर्वरूपानं अवतरतं.

माझ्याकडं 'एकच प्याला'ची पहिली आवृत्ती आहे. तिच्यामध्ये फोटो आहेत. गणपतराव बोडस सुधाकर, आणि बालगंधर्व–सिंधू ! या फोटोत सिंधूच्या मुद्रेवर जे भाव प्रकटलेले आहेत, त्यावरूनही बालगंधर्वांच्या अभिनयाची 'जात' ध्यानी येते. कोणतीही साहित्यकृती ही भावप्रकटीकरणातून जीवनार्थ व्यक्त करीत असते. साहित्यकृतीतील शब्दांतून प्रतीत होणारे हे भाव नाट्यप्रयोगात नट आपल्या अभिनयातून साकार करीत असतो. नटाची देहाकृती, अवयवांची हालचाल, मुद्रेवरील स्नायूंचं चलनवलन, आवाज, शब्दोच्चारण, वाक्याची फेक आणि सर्वांहून महत्त्वाचं आणि अवश्यमेव असं त्याच्या डोळ्यांतील भावदर्शन – त्यांतून नाटकाची शब्दरूप संहिता प्रयोगरूपात प्रवर्तित होत असते, म्हणजेच आंगिक, वाचिक आणि सात्त्विक अभिनयातून नाट्य उमलत, फुलत पूर्ण विकास पावत जात असतं. अभिनयाची ही तिन्ही रूपं बालगंधर्व मोठ्या सहजतेनं प्रकट करीत. त्यांचा आवाज रेशमासारखा मृदु-मुलायम होता; त्यात जणू मधाचं माधुर्य मिसळलं होतं. भूमिकेशी ते इतकं तन्मय होत की देहामनानं जणू ते भूमिकाच बनून जात असत, मग ती वैदर्भीय राजकन्या रुक्मिणी असो की अन्नाला मोताद झालेली सिंधू असो ! बालगंधर्वांचा सारा देह त्या भूमिकेनं अभिमंत्रित होई आणि मुद्रा हृदयस्थ भावांनी उफरंडून जाई. "सिंधू, मी आजपासून दारू पिणं सोडलं," असं सुधाकर सिंधूला सांगतो, त्या क्षणीचा बालगंधर्वांचा फोटो पाहावा. सुधाकराचे हे अमृतबोल ऐकून सिंधूला आनंदाचं जे भरतं येतं, ते शब्दावाटे प्रकटू शकतच नाही. गडकऱ्यांसारख्या शब्दप्रभूनं इथं सिंधूच्या तोंडी 'खरंच का हे ?' हा एवढाच एक उद्गार घातला आहे. बाकी सर्व जागा बालगंधर्वांसाठी मोकळी ठेवली आहे; मुक्त ठेवली आहे. हृदयाकाशात न मावणारा तो आनंद सिंधूच्या डोळ्यांवाटे किती ओसंडून बाहेर पडत आहे, ते त्या छायाचित्रात पाहून घ्यावं. पुढं 'प्रभु अजि गमला...' या गाण्यानं सारं थिएटर आनंदानं भरभरून येतं.

"दादा, ते आले ना ?" हा 'स्वयंवर'मधील रुक्मिणीचा उद्गार किती संमिश्र भावांनी दाटून भरून आलेला आहे, हे बालगंधर्वांच्यामुळंच ध्यानी येतं. पुण्याला डॉ. सोमण यांच्या घरी बालगंधर्व मुक्कामास असताना मी कामानिमित्त त्यांच्या घरी गेलो होतो बालगंधर्व कोणाशी तरी बोलत होते. खरं तर, ते फारसं बोलत नसत. शांत बसूनच असत. पण त्या दिवशी ते 'स्वयंवर'संबंधी काहीसं सांगत होते. सांगता सांगता ते त्या व्यक्तीला म्हणाले, "काय सांगू देवा, रुक्मिणीचा मेक्-अप केला, केशभूषा-वेषभूषा झाली आणि एकदा नाकात नथ घातली की मला 'कृष्ण कधी दृष्टीस

पडतो ?' असे होऊन जाई. मी रंगपटातल्या माझ्या खोलीत, एकांतात कृष्णमय होऊन जात असे. कृष्णाच्या ध्यानानं तुडुंब भरलेल्या त्या मनोवस्थेनं माझा रंगमंचावर प्रवेश होई आणि 'दादा, ते आले ना !' हा उद्गार सहजच बाहेर पडे." बालगंधर्वांचा अभिनय आंगिक आणि वाचिक होता; पण तो सर्वाधिक 'सात्त्विक' होता. किंबहुना तो मूलतःच सात्त्विक असल्यानं त्याला तदनुषंगिक आंगिक व वाचिक आविष्कार आपोआप मिळे !

बालगंधर्व जगले ते नाट्यकलेसाठी; त्यांनी मनोभावे पूजा केली ती रंगदेवतेची. प्रयोगापूर्वी ते दर्शनी पडद्यास आतून मस्तक टेकवून नमस्कार करीत. प्रेक्षक ही रंगदेवतेची माणसं- तिची प्रातिनिधिक रूपं· त्यांचा संतोष हा रंगदेवतेचा संतोष ही त्यांची अविचल श्रद्धा होती.

'आपरितोषाद् विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्' ही कालिदासाची भावना बालगंधर्वांच्या ठायी अशा रूपानं प्रकट होई. ऐन तारुण्यात–वयाच्या पंचविशीत ज्या अनन्यभावानं त्यांनी रंगभूमीची पूजा बांधली, तो अनन्य पूजाभाव त्यांच्या वयाच्या साठी–पासष्ठी-मध्येही तसाच टिकून राहिला होता. एकदा कृष्णराव चोणकर यांनी 'स्वयंवर'मधलं 'गवळण होऊनिया फिरता' हे शेवटच्या अंकातलं भैरवी रागातलं आपलं हमखास 'वन्स मोअर' घेणारं पद केवळ 'आऊट लाईन' घेऊन संपवलं. बुकिंग फारसं नव्हतं म्हणून त्यांनी आपली वेळ मारून नेली. पडदा पडल्यावर बालगंधर्वांनी 'हे असं का केलंत ?' म्हणून विचारलं. तेव्हा 'हाऊस नव्हतं,' असं चोणकरांनी उत्तर दिलं. त्यावर बालगंधर्व म्हणाले, 'त्याची काळजी तुम्हांला की मला ? तुमचं हे हातखंडा पद, काही प्रेक्षक केवळ याच पदासाठी येत नसतील कशावरून ? आज तुम्ही लोकांचा विरस केलात. अशानं कंपनीच्या नावाला बट्टा लागेल."[१] बालगंधर्व हे प्रेक्षागारातील प्रेक्षक हा शिवरूप आहे, नटेश्वर-रूप आहे असं मानीत. प्रेक्षागारात एक जरी प्रेक्षक असला तरी नाटक शंभर टक्के झालं पाहिजे, ही त्यांची निष्ठा होती. 'त्या एका प्रेक्षकाच्या रूपानं तो नटेश्वर आपली सत्त्वपरीक्षा कशावरून पाहत नसेल ? असं त्यांना वाटे, 'प्रेक्षक अन्नदाते मायबाप' यामागं त्यांची ही परम उदात्त भावना होती. नाटक हे प्रेक्षकांसाठी हे खरं...पण म्हणून ते प्रेक्षकांच्या पातळीवर उतरणारं हवं, असं नव्हे, तर ते प्रेक्षकातील नटेश्वराचं समाराधन करणारं हवं, अशी त्यांची उपजत निष्ठा होती. बालगंधर्वांना अमाप पैसा देणारी रुपेरी पडद्याची जवळीक परवडली नाही. स्वतः कर्जाच्या खाईत असतानासुद्धा परवडली नाही, ते का, ते इथं ध्यानी येतं.

बालगंधर्व देहामनानं आपली भूमिका जगत. त्यावेळी त्यांचं अंग-अंगांग, सारी हालचाल, आवाज, शब्दोच्चार, स्वरोच्चार, दृष्टी–हे सारं काही, त्यांचं असूनही त्यांचं नसे. ते सुभद्रेचं असे, रुक्मिणी–भामिनीचं असे, रेवती–द्रौपदीचं असे, कान्होपात्रा-देवयानीचं असे, सिंधूचं–असे. त्यांचं शरीर हे मनातील भावनांचा आकार घेत असे आणि मन शरीराकारांतून प्रकटू पाहत असे. शिल्पकार करमरकरांची इथं आठवण होते. ते म्हणत, "आमच्या हाताची बोटं मातीशी, पाषाणाशी, पहाडाशी बोलत असतात. आमचं मनोगत आमच्या बोटांतून त्यांना कळतं; आणि मग ती माती, तो पाषाण, तो पहाड आमच्याशी बोलू लागतो; आमच्या मनोगताचं रूप घेऊ लागतो." नटाचा सारा देह, त्याची सारी दैहिक चेतना, हेच त्याचं अभिव्यक्तिद्रव्य असतं. हृदयस्थ-भाव डोळ्यांतून, मुद्रेतून, अंगांगातून, कणाकणातून अंतःप्राणानिशी प्रकटत असतात. स्फटिकगृहातल्या डोलत्या दीपज्योतीप्रमाणं यासंबंधीचा एक अनुभव सांगावासा वाटतो.

बालगंधर्वांना मी प्रथम पाहिलं, त्यावेळी ते ४५ वर्षांचे होते. त्यांना त्यानंतर रंगमंचावर पाहिलं ते १९४८ मध्ये. त्यावेळी ते साठीत आलेले होते अकलूज-सारख्या खेड्यात, कसलीही विशेष सुविधा नसलेल्या रंगमंचावर, म्हणजे केवळ ८–१० फूट उंचीच्या एक दोन निळ्या सरकपड्यांवर काम करताना त्यांना मी पाहिलं. 'सं. सौभद्र'चा प्रयोग होता, नांदी–प्रस्तावना संपून अर्जुनाची गाणी सुरू झाली ती ठीक झाली. अर्जुन-नारद-संवादही बराच बरा झाला. त्यातली काही गाणी रंगली...यानंतर राक्षस निश्चेष्ट झालेल्या सुभद्रेला खांद्यावर घेऊन येतो, असा मूळ प्रवेश आहे...पण त्यादिवशी मधला पडदा सरकल्यावर पल्लवराशीवर

आधीच झोपविलेली सुभद्रा आम्हांस पाहावी लागली. बालगंधर्वांना–सुभद्रेला खांद्यावर उचलून आणणार कोण ? बालगंधर्वांचं वजन वाढलेलं, अंग सुटलेलं, पोट सुटलेलं, लुगडयांच्या निऱ्यांवर जाड रुंद पट्टा करकचून आवळलेला, त्यावर पदर घेतलेला, पाय थोराड झालेले, टाचांना चिरण्या पडलेल्या......ही सुभद्रा पाहून फार फार धक्का बसला; अति वाईट वाटलं; दुःख झालं. सुवर्णकेतकीसारखा जिचा वर्ण आहे, विद्युल्लतेप्रमाणं जिचे अवयव मधून मधून चमकताहेत, जिचा बांधा सडपातळ नाजुक आहे. जिचे पदतल पाहून संध्यारागाचा भास होतो, अशी लावण्यवती युवती सुभद्रा–अर्जुनानं जिचं असं वर्णन चालविलेलं आहे ती सुभद्रा कुठं आणि समोर पडलेलं तिचं हे विटंबित रूप कुठं ! या विटंबनेत भर पडते ती पुन्हा सुभद्रेच्या गाण्याची. आवाज गेलेला...खोकला साथीला ...पाहवेना; ऐकवेना. वलसागर तुम्हि वीर शिरोमणी,' या गाण्याची तर राळ झाली. सार कीव करण्यासारखं, केविलवाणं !

पहिला अंक संपला; दुसरा सुरू झाला. कृष्ण–विदूषक प्रवेश ठीक झाला. कृष्ण–बलराम यांचा पुढच्या प्रवेशातला संवाद छानच झाला. पुढं सुभद्रा व तिची सखी यांचा प्रवेश आला. सुभद्रा आपल्या जिव्हारीचं दुःख जिवाभावाच्या सखीला सांगू लागली, आणि तिच्या तोंडून

व्यर्थ मी जन्मले थोर कुळी

हा उद्गार संगीतो आवेगानं बाहेर पडला. बालगंधर्वांच्या आतून, खोल कुठून तरी हा सूर उठत होता. आवाज लागला होता. आतलं दुःखाचं, अतिदुःखाचं गाणं सहजतेनं उमटत होतं; उमलत होतं. 'वद जाऊ कुणाला शरण' हे गाणं स्वरांच्या आणि अभिनयाच्या अंगानं रूप घेत होतं. बालगंधर्व अंतर्यामीच्या वेदनेनं, जणू विव्हल होऊन गात होते. 'सौभद्र'चा दुसरा अंक सुभद्रेचा आहे. तिला एकाहून एक सरस, वरचढ अशी गाणी आहेत. मनाचा आर्त, करुण, अगतिक भाव व्यक्तविणारी ही गाणी आहेत. बालगंधर्वांच्या सहसर्जक कलासंवेदनांची ही गाणी आहेत. 'अरसिक किती हा शेला', 'किती सांगू तुला' ही पुढची गाणी अशीच. अंतर्यामातून, तळातून बाहेर उन्मळून पडत असणारी. बालगंधर्वांची मुद्रा त्यांचे नेत्र, ऐन विशी–पंचविशीतल्या तरुणीसारखे भावनिर्भर, भावदर्शी दिसू लागले. त्यांचं वार्धक्य म्हणून काही उरलंच नव्हतं प्रतीत होत होतं ते एका युवराज्ञीचं खोल खोल, तळातलं अपरंपार दुःख ! संगीत–रूपानं प्रकटलेलं !! गंधर्वांचं गाणं आणि त्यांचा अभिनय एकात्म कसा आहे, याचा प्रत्यय मला आला; पण एवढच नाही, तर वृद्ध मुद्रा वा शरीर हे भावाविष्काराच्या आड येऊ शकत नाही, ह्याचीही साक्ष पटली. 'सात्त्विक' अभिनय हा शरीराश्रयी असला तरी तो अखेरीस शरीरोत्तीर्ण असतो, याची खात्री पटली. आज ९४ वर्षांचे राजाराम कदम याची साक्ष देतच आहेत. "उत्तरवर रुक्मिणीचं स्वयंवर डोळयांनी पहायला गेलेले प्रेक्षक, साठी उलटलेल्या, पण जन्मभर पुरेलच गात असलेल्या त्या रुक्मिणीकडं (बालगंधर्वांकडं) आपल्या कानांनी पाहतात, आणि डोळयांना 'जरा गप्प बसा' म्हणून सांगतात, ते उगाच नाही," असं रसिकाग्रणी बाबूराव देशमुखांनी उद्गार काढले आहेत ते खरेच आहेत [२] 'पण कानांनी पाहता पाहता, डोळयांनाही तेच भावत जातं,' हे नजरेआड करून चालणार नाही.

बालगंधर्व भूमिका करीत नसत, तर ते ती भूमिका जगत असत. याचा अर्थ ते भान हरपून किंवा भावविवश होऊन काम करत, असा नव्हे. नाटयधर्मित्व हरवून ते लोकधर्मित्वाच्या पातळीवर कधीही आले नाहीत. नट हा रंगमंचावर नाटयधर्मित्वाशी इमान पाळीत असतो लौकिकातले बालगंधर्व वेगळे आणि सिंधू–भामिनीच्या भूमिकेतले वेगळे. 'मानापमान' नाटकात एका प्रवेशात भामिनी, धैर्यधराचे जोडे प्रेमभावाने हृदयाशी कवटाळते असा प्रसंग आहे. 'संयुक्त मानापमान'च्या प्रयोगाच्या वेळी, हा प्रवेश सुरू होण्यापूर्वी, केशवराव भोसले (धैर्यधर) यांनी बालगंधर्वांना (भामिनी) विनंती केली की, "आपल्यासारख्या थोर नटानं माझे चढाव उचलावेत व ते छातीशी कवटाळावेत हे मनाला योग्य वाटत नाही." बालगंधर्वांना 'लोकधर्मी' व 'नाटयधर्मी' यातला भेद पूर्णपणे माहीत असल्यानं त्यांनी ती अभिनयकृती नित्याप्रमाणे भावपूर्णतेनं केली. या उलटच्या संदर्भातही,

बालगंधर्वांच्या कलेशी इमान दर्शविणारा एक प्रसंग पाहण्यासारखा आहे. बालगंधर्वांच्या बरोबर शरद तळवलकरांनी जी पहिली भूमिका केली होती ती एकच प्याला नाटकात तळिरामाची. त्याआधी तळवलकरांची बालगंधर्वांशी ओळखही नव्हती. तळवलकर यांना अजून नावही मिळालेले नव्हते. पण नाटकाच्या सुरुवातीला बालगंधर्वांनी तळवलकरांना जवळ बोलावून सांगितले, "हे पहा, तिसऱ्या अंकात माझ्या गळ्यातलं मंगळसूत्र ओढताना, मी बालगंधर्व आहे, हे मनात घ्यायचं नाही. मी सिंधू आणि तू तळिराम, एवढंच लक्षात ठेवायचं; तसंच मंगळसूत्र ओढण्याच्या अगोदर माझ्या खांद्यावर हात ठेवायला विचकू नकोस; कारण पुढं सुधाकराचं वाक्य आहे, 'तळिरामसारख्या नरपशूला तुझ्या अंगाला स्पर्श करायला लावलं.' या त्यांच्या वाक्याला, तू मला हात लावला नाहीस तर काही अर्थ उरणार नाही."[३]

बालगंधर्व भूमिका जगत, भूमिकांशी जागत ते हे असं !

गाणं हा बालगंधर्वांच्या अभिनयकलेचा आत्मा होता; आणि हा आत्मा साहित्याचा आत्मा जो 'रस' त्याचा सहोदर–सहचर होता. गाणं आणि अभिनय यांच्या सहसर्जक भावक्रियेतून बालगंधर्वांचा नाट्यरस उत्कर्ष बिंदूला पोहोचत होता. बालगंधर्वांची गायकी नुसती रसानुकूलच होती असं नव्हे, तर ती रससंपृक्त होती. बालगंधर्वांचा हा 'संगीतात्म अभिनय' आता कुठं आणि कसा पाहायला मिळणार ? त्यांची गाणी ध्वनिमुद्रित झाल्यानं ती उपलब्ध तरी आहेत त्या ध्वनिमुद्रिकांवरून त्यांच्या गाण्याच्या सूक्ष्मातिसूक्ष्म सौंदर्याचा शोध घेता आला नाही, तरी त्याची प्रकृती निकोपपणे जाणून घेता येते. अभिनयाबाबत असं प्रत्यक्ष साधन कोणतंही नाही. त्यांची पडद्यावरील कामं किंवा त्यांच्या नाटकाची 'स्टेज–टॉकी' याबाबत गैरसमजच निर्माण करणारी आहेत. बालगंधर्वांच्या आठवणी, त्यांच्यावरील लेख, त्यांची चरित्रं यावरच आपणांस विसंबून राहावं लागेल. त्यांचे अनेकविध फोटो प्रत्यक्षपणे साहाय्यक ठरणारे आहेत. या साधन-सामग्रीतून कणाकणानं बालगंधर्वांच्या अभिनयाच्या खुणा गोळा करीत, आपल्या कल्पनाशक्तीच्या बळावर तो अभिनय अंत:चक्षूंनी पाहाणं, एवढाच मार्ग आता उरला आहे. माझं सद्भाग्य हे की, बालगंधर्वांचा अभिनय, अल्पांशानं का होईना, मला पाहायला मिळाला आहे. हा अल्पांशच, बालगंधर्वांचा अभिनय दृष्टिगोचर करण्यासाठी मला आधारभूमीसारखा, संदर्भभूमी-सारखा साहाय्यक ठरणार आहे. लेण्यातल्या तुटक्या-फुटक्या मूर्तीही आपला संपूर्ण सौंदर्याकार व्यञ्जित करीत असतात; त्या भग्न रूपातही आपल्या मूळ अप्रतिम लावण्याची साक्ष पटवीत राहतात. तसं बाल-गंधर्वांच्या विविध भूमिकांतील फोटो आणि त्यांच्या संबंधीच्या आठवणी यातून त्यांच्या अभिनय–कलेचं मनोगम्य रूप उभारता येण्याची शक्यता आहे. अभिनय ही प्रत्यक्ष अनुभविण्याची गोष्ट आहे. ती सांगून कळत नसते, हे खरं असलं तरी अखेर शब्द हेच असं चिरंजीव साधन आहे की ते मूर्त–अमूर्ताला कवटाळून घेऊ शकतं ! वसंत शांताराम देसाई यांनी 'बालगंधर्व : व्यक्ती आणि कला' या आपल्या ग्रंथात बालगंधर्वांच्या अभिनयरूपाची कितीतरी सुंदर शब्दचित्रं काढली आहेत; (पृ. १०६ ते १८७, आवृत्ती पहिली) ती बारकाईनं पाहण्यासारखी आहेत.

'संगीतात्म अभिनय' ही अभिनयाची फार प्रभावी, परिणामकारक जाती आहे बालगंधर्वांच्या ह्या संगीतात्म अभिनयाचा प्रभाव गद्य नाटकं लिहिणाऱ्या काकासाहेब खाडिलकरांच्यावर इतका पडला की त्यांनी गद्य नाटकाचं लेखन बंद करून संगीत नाटकांची रचना करायला घेतली. वसंत शांताराम देसाई यांनी आपल्या 'बालगंधर्व : व्यक्ती आणि कला' या ग्रंथात यासंबंधी विस्तारानं लिहिलं आहे. (आवृत्ती १, पृ. १६ ते ४३). श्रीपाद कृष्णांच्या विनंतीवरून 'प्रेमशोधन' नाटकाच्या तालमी घेण्याकरता १९१० साली काकासाहेब खाडिलकर किर्लोस्कर नाटक मंडळीत येऊ लागले होते. त्या आधी 'महाराष्ट्र नाटक मंडळी'साठी त्यांनी 'कांचनगडची मोहना', 'सवाई माधवरावांचा मृत्यू', 'बायकांचे बंड', 'कीचकवध' आणि 'भाऊबंदकी' अशी प्रभावी गद्यनाटकं लिहिली होती या 'पंचशरे गद्यवरे' त्यांनी नाट्यकलेला वश केलं होतं. पण किर्लोस्कर मंडळीतील वास्तव्यात बालगंधर्वांच्या 'गोड आणि गुंगविणाऱ्या' गायनामुळं ते संगीत



अनुक्रमणिका

रंगभूमीकडं आकर्षिले गेले आणि किर्लोस्कर नाटक मंडळीकरता एखादं संगीत नाटक लिहावं, असं त्यांना वाटू लागलं. 'प्रेमशोधन' नाटकाच्या तालमी चालू असतानाच, खाडिलकरांनी 'मानापमान' नाटकाचं लेखन पूर्ण केलं आणि 'प्रेमशोधन' रंगभूमीवर आल्यानंतर लगेच 'मानापमाना'च्या तालमी सुरू केल्या. काकासाहेव अभिनयाच्या तालमी घेत; तर संगीताच्या गोविंदराव टेंबे घेत. 'मानापमाना'चा पहिला प्रयोग कल्पनातीत यशस्वी झाला.

'मानापमान'च्या या पहिल्या प्रयोगाने मराठी रंगभूमीवर कितीतरी गोष्टी नव्यानं पुढं आल्या. एक क्रांती घडली. बालगंधर्व आणि जोगळेकर यांना नटाचा दर्जा प्राप्त झाला व बोडसांचा विनोदी नटाचा दर्जा पूर्णपणे प्रस्थापित झाला. 'मानापमान' नाटकाइतकंच काकासाहेव खाडिलकरांचं शिक्षण यास कारणीभूत होतं. गद्य रंगभूमीवर यश मिळविलेले खाडिलकर आपलं पहिलंच संगीत नाटक किती संगीतानुकूल लिहू शकतात याची प्रचीती आली. एक सुंदर नट, अभिनयकुशल नट, रंगभूमीवरील गाणं रसपूर्ण पद्धतीनं गाणारा गंधर्वतुल्य आवाजाचा गायक नट असा बालगंधर्वांचा लौकिक या प्रयोगानं प्रस्थापित झाला. 'मानापमाना'चं प्रयोगदृष्ट्या महत्त्वाचं वैशिष्ट्य हे की, जोगळेकर, बालगंधर्व आणि बोडस या तीन प्रमुख पात्रांच्या दर्शनाला आणि अभिनयाला सर्वस्वी अनुरूप अशा भूमिका खाडिलकरांनी रंगविल्या... हे सारं पाहिल्यानंतर मला असं विधान करावंसं वाटतं की, 'मानापमाना'च्या निमित्तानं खाडिलकरांनी मराठी रंगभूमीला 'बालगंधर्व' जसे दिले, तसे बालगंधर्वांनीही मराठी रंगभूमीला खाडिलकर 'एक संगीत नाटककार' म्हणून दिले. यानंतर खाडिलकर गद्य नाट्यलेखनाकडं वळले नाहीत; ते संगीत नाटकंच लिहीत राहिले आणि तीही बालगंधर्वांसाठी-अगदी अखेरीच्या 'द्रौपदी'–' मेनके' पर्यंत !

मराठी रंगभूमीवर आपण गंधर्वयुग मानतो. त्यांच्या गायकीला 'गंधर्व-घराणं' म्हणून काहीजण संबोधतात. खरोखर गंधर्वांनी अभिनयामध्ये कोणते नवे प्रकार, कोणत्या नव्या रीती आणल्या, त्या रूढ केल्या हे अभ्यासायला हवं. तसंच त्यांनी गानकलेला नवे काही राग दिले किंवा काही शास्त्रीय सिद्धान्त निर्माण केले, हेही शोधक बुद्धीनं पाहायला हवं ! गंधर्वांनी जाणीवपूर्वक असं यातलं काही केल्याचं मात्र दिसून येत नाही. ते घडून गेलं. सहजता आणि स्वाभाविकता हीच बालगंधर्वांची चालण्या-बोलण्याची अभिनयाची-गायनाची शक्ती होती. ते एकदा राग गाता-गाता निषिद्ध स्वर त्यांत उमटून जाई. आणि तो इतका सुंदरपणे येऊन जाई की मूळ रागाला जणू नव्या, अनोख्या रागाची डूब येई. गंधर्वांना त्याचं शास्त्र माहीतही नसे. नाट्यानुकूल आणि रसानुकूल आपलं गाणं होत आहे की नाही, यावर त्यांची खडी नजर असे. त्यांना हे उपजत ज्ञानच असे. मेक-अप् पूर्ण झाल्यानंतर ते भूमिकामय बनून रंगपटातील आपल्या खोलीत एकांतात बसत असत. नाटक संपेतो ते कोणाशी बोलतही नसत. आपली भूमिका आपल्या अंगामनात भिनविण्याचं हे तंत्र अलीकडचं आहे...बालगंधर्व जुन्या काळात उपजत बुद्धीनंच हे करून गेले !

बालगंधर्व जगले ते 'स्वत:'चं जीवन जगले. स्वत:ला जे जे वाटलं ते ते त्यांनी केलं. त्यासाठी कुणाचा सल्ला घेतला नाही की कोणाची मदत स्वीकारली नाही. त्यासाठी जे भोगायचं ते स्वत: भोगलं. त्याचं ओझं दुसऱ्यावर टाकलं नाही. पुतण्याची मुंज केली. पाऊण लाख खर्च केला. एखाद्या संस्थानिकाच्या कार्यासारखं खानदानी कार्य केलं, सुभद्रा, रुक्मिणी, द्रौपदी ह्या राजकन्या–राण्या. त्यांच्यासाठी जरतारी शालू-पैठण्या आणि सोन्या-मोत्याचे अस्सल अलंकार करायचे म्हणजे करायचे. ते केले. 'स्वयंवर–' च्या नेपथ्यासाठी १६००० रुपये खर्ची पडले, 'कान्होपात्रामध्ये' पंढरपूर विठ्ठल मंदिरातील सोळा खांबी गाभारा उभा केल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे. १९२९--३० मध्ये यासाठी त्यांनी ८–९ हजारांचा खर्च केला. एका बैठकीत सतराशे रुपयांची अत्तरं त्यांनी खरेदी केली. सारा रंगमंच आणि सारं प्रेक्षागृह सुगंधित करून टाकलं. आपल्याबरोबर आपल्या साथीदारांसाठीही ते पैसा मोकळा सोडीत. उत्तमोत्तम साथीदार, सारंगिये, तब्वलजी, पेटीवादक हवेत म्हणून एकेक वेळेला दोन-दोन तीन-तीन वाद्यकार ते कंपनीत ठेवीत असत. आपले कलावंत आपले कुटुंबीय समजून

त्यांच्याबरोबर ते जे जेवतील तेच बालगंधर्वही जेवत असत. कोणी एखाद्या प्रयोगात काही विशेष अभिनय केला तर त्यानं न मागताच त्याची पगारवाढ ते करीत. सर्वांना घेऊन मुक्कामाच्या गावी एखाद्या मंदिरात जाऊन अभंग-भजन करीत... एक गुणज्ञ, दिलदार, सत्त्वशील, शांत असं हे व्यक्तिमत्त्व !

असं हे व्यक्तिमत्त्व शांतपणे बसलेलं मी अनेकदा पाहिलं ते पुण्यात डॉ. आर. एच. सोमण यांच्या घरी· तिथं दिवाणखान्यात घातलेल्या एका छोट्या पांढऱ्या शुभ्र गादीवर ते बसलेले असत. पांढरी हाफ पॅंट, जाड रुंद पट्टा पोटाशी बांधलेला; वर मलमलीचा अर्ध्या बाह्यांचा पांढरा अंगरखा, डोक्याला पांढरी टोपी... पायाची घडी घातलेली. पाय कामातून गेल्याचीच अवस्था. १९५३-५४ मधली गोष्ट. सारं हरवून बसलेला हा शुभ्र-धवल राजहंस ! निर्धन ! निष्कांचन !! निर्धन निष्कांचन झाला, म्हणून दरिद्री झाला असं नव्हे. या माणसानं कधीच कशाचाही हिशेब केला नाही. पैसा येतो आणि जातो, हे त्यांना चांगलं ठाऊक होतं. खोऱ्यानं पैसा मिळविला आणि आकाशाएवढी ओंजळ करून तो त्यानं खर्चला. त्यांचे हात सदैव स्वच्छ होते गंगाजळानंच त्या हातांकडून स्वतःस निर्मल करून घ्यावं. बालगंधर्व कर्जात होते. चारुदत्त कर्जातच असणार ! आणि कर्जात असूनही तो देत राहाणार. कर्जफेडीसाठी मित्रमंडळींनी नाटक उभं केलं. नाट्य प्रयोगाला चांगलं उत्पन्न झालं. कर्ज वजा जाता उरलेली सर्व रक्कम महोदार, महाभागानं स्वतः कर्जात असून-ही एका फंडाला देऊन टाकली. लौकिक नफा-तोट्यांची गणितं मांडत बसणारी ही माणसं नसतात कृपणता आणि हिशेबीपणा यांच्या सावलीतही येत नाही. ही माणसं जगतात ते मनोदेवतेला स्मरून; त्याच्या बऱ्यावाईटाची जबाबदारी स्वतःवर घेऊन. यामुळं इथं पश्चात्ताप नसतो; दैन्य-दुःख नसतं, कोणाविरुद्ध तक्रार नसते; काही नसतं. हे जगणं एका परीनं अस्तित्ववादी वृत्तीचं जगणं आहे. संकल्प करण्याचं स्वातंत्र्य आणि त्याची कडू-गोड फळं चाखण्याची तयारी. हे अस्तित्व-वादाच्या मूळ सूत्रांतील एक महत्त्वाचं सूत्र आहे. यामुळं बालगंधर्वांचं प्रत्येक कृत्य हे त्यांचं स्वतःचं, authentic कृत्य होय ! गोहर-कर्नाटकी प्रकरणाचा अन्वयार्थ या दृष्टीनं बराचसा लागण्यासारखा आहे.

मुळात नेमकं काय घडलं आणि बालगंधर्वांनी गोहर कर्नाटकीला आपलं सर्वस्व का देऊन टाकलं, ते कळा-यला मार्ग नाही. पण एकदा स्वतःचं संपूर्ण दान देऊन टाकल्यानंतर त्यातून त्यांनी पळवाट काढली नाही. बालगंधर्व आणि गोहर कर्नाटकी हे अनेक अंगांनी, अनेक अर्थांनी फार मोठं प्रकरण आहे. इतका सौम्य, मृदू, अबोल माणूस इतकं लोकविलक्षण कृत्य करतो आणि निमूटपणे, शांतपणे आपल्या जागी स्थिर राहू शकतो, हे आश्चर्यकारक आहे. एकाएकी घरदार सोडून देवधर्म टाकून एका परधर्मीय, परसंस्कृतीच्या कला-वतीच्या मोहल्ल्यात हा माणूस जाऊन राहतो कसा; याचं कोडं पडतं.

बालगंधर्वांनी हे जे केलं ते इतकं सहजतेनं की त्यांचे आप्तस्वकीय आणि जिवलग दिङ्मूढ झाले. एक राग गाताना निषिद्ध असा स्वर बालगंधर्व ज्या सहजतेनं गाऊन जात, तसंच हे घडलं याची इथं आठवण होते. पण या निषिद्ध स्वरानं नवा राग जन्मास येई; दुर्दैवानं इथं नवं तर काही जन्माला आलंच नाही; पण जुनं जे होतं तेही हळूहळू अस्तंगत पावू लागले. माहीमच्या मोहल्ल्यातून बालगंधर्वांना सोडवून नेण्यासाठी येणाऱ्या जिवलगांना ते चारच शब्द उच्चारताना दिसत... शक्य नाही .. सुटका नाही ! बालगंधर्वांसारखे जीव एकदा एखाद्याला आपलं मानलं की त्याला अखेरचा श्वास सोडितो आपलं मानतात; मग ते माणूस त्याच्याशी क्रूर खेळ खेळो की प्रेमाचा वर्षाव करो ! यांना कशाचीच दाद ना फिर्याद ! त्यात पुन्हा गोहरबाईंना 'गोहरबाबा' ची प्रतिष्ठा दिलेली ! मागं पंडितांनी बुडविलं; जणू काही घडलंच नाही अशा निर्विकारतेनं बालगंधर्व वागले. हीच गोष्ट गोहरबाबांची ! ही अनन्यनिष्ठा आत्मविनाशक असली, तर या आत्म-विनाशातच एक विलक्षण सौंदर्य आणि सुख असतं ! highly romantic मनाला हे असं वाटत असतं. बालगंधर्व अस्तित्ववादी की रोमँटिक प्रश्न विचारण्यात अर्थ नाही. सहजपणे आणि स्वाभाविकपणे सदैव जगणारा हा जीव कोणत्याच तत्त्वप्रणालीनं समजून घेता येणार नाही गडकऱ्यांच्या 'प्रेम आणि मरण' मधील गगनातील चंचल आकाशातून खाली बाळा येते आणि

विराट वृक्षाला प्रेमालिंगनसुख देते, पण त्याबरोबरच मरणमिठीही घालते; तसं काहीसं जाणवतं! पण हे तरी खरं कशावरून?...... एक खरं की बालगंधर्व एका रात्रीत स्वजनातून ताडकन उठून गेले, पुढं नाटच-विश्वातून हळूहळू लोपत गेले, त्यांची गायनी कळाही त्यांना सोडून गेली– आणि बालगंधर्वांचं सर्वस्व हरपून गेलं. बालगंधर्व माहीमच्या मोहल्ल्यात, एका विचित्र महालात, अखेर अखेर एकटेच पडून राहिले; कशाबद्दल काही न बोलता, कुणाला काही न सांगता पडूत राहिले. अंत्यक्षणी हे सांगण्याचा मोह होऊ नये म्हणून त्यांची शुद्धही हरपली. शुद्ध हरपलेल्या अवस्थेत काही दिवस राहून अखेर दुनियेकडे न पाहता ते तडक निघून गेले ते कायमचेच!

बालगंधर्वांनी अनन्यभावानं मानलं ते एका नाटच-देवतेला आणि तिच्या रसिक प्रेक्षकांना. तिच्या पूजेसाठी त्यांनी स्वरांच्या मालाच्या माला गुंफल्या. नाटक हा बालगंधर्वांचा प्राण होता आणि नाटचांतर्गत गायन हा त्यांचा आत्मा होता. नाटक आणि गाणं ज्या क्षणी त्यांना सोडून गेलं, त्या क्षणीच हा राजहंस 'मानस' पार झाला. आपल्या गंधर्वलोकी पोहोचला होता! आपल्या व्यावसायिक आणि लौकिक मोजपट्टयांनी मोजता यावेत असे या राजहंसाचे पंख नाहीत की त्याचं दिगंतही नाही! जे जे या परमहंसाला मोजायला गेले ते ते त्याच्या चरणी लीनच झाले!

**संदर्भ**


१. महाराष्ट्र टाइम्स बालगंधर्व जन्मशताब्दी विशेषांक, १९८७ पृ. १०७

२. तत्रैव, पृ. ९९

३. तत्रैव, पृ. ५९


□

## साभार स्वीकार

### कादंबरी

**मन्तरलेली...अन्तरलेली** : हेरंब देशपांडे; प्रपंच प्रकाशन, पुणे ३०; १९८७; रु. ३० **साक्षी** : मानसी कर्णेकर; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८७; रु. ३० **डॉ. यमुना** : वी. एम्. लोणकर सौ. विमलाबाई लोणकर, पुणे ९; १९८७; रु. ४० ▭ **तुंबाडचे खोत** श्री. ना. पेंडसे; कॉंटिनेंटल प्रकाशन; पुणे ३०; १९८७; रु ९५ □ **वन्हि तो चेतवावा**; डॉ. श्यामकांत कुलकर्णी; सुपर्ण प्रकाशन, पुणे ३०; १९८७; रु. ३० ▭ **घडयाळाचे काटे** : शंकर इनामदार; सुपर्ण प्रकाशन, पुणे १९८७; रु. २५ ▭ **आपुले आपणासी अनोळखी** : अज्ञेय/पद्माकर जोशी; सुपर्ण प्रकाशन, पुणे १९८७; रु. ३० □ **अमावास्येचा चंद्र**; ना. वा. फडके; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७; रु. ४५ **एका जवान नावाच्या माणसाची कहाणी** : लीलाधर हेगडे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई १९८७; रु. २५

▭

### कथा

**छक्केपंजे** : वसंत मिरासदार; सुपर्ण प्रकाशन, पुणे १९८७; रु. ३० ▭ **धून** : डॉ. चंद्रकांत वर्तक; सुपर्ण प्रकाशन, पुणे १९८७; रु. ३० ▭ **तारेवरची कसरत** : ललिता गंभीर; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८७; रु. ४५ ▭

ह. श्री. शेणोलीकर

# मराठी संतांचे तत्त्वज्ञान

## (पूर्वार्ध)



[ विद्यापीठ अनुदान मंडळाने दिलेल्या—अनुदानाचा उपयोग करून प्रा. हरी श्रीधर शेणोलीकर (धुळे) यांनी मराठी संतांच्या तत्त्वज्ञानासंबंधीचा एक प्रकल्प परिश्रमपूर्वक पुरा केला आहे. **'मध्ययुगीन मराठी वाङ्मयातील तत्त्वज्ञानात्मक संज्ञांचा वर्णनात्मक कोश'** (टंकलिखित पृष्ठे ९००) या नावाने प्रसिद्ध झालेल्या या कोशामध्ये अकर्ता-अकर्मपासून ज्ञाता—ज्ञान—ज्ञेय एथपर्यंत सुमारे ५१८ संज्ञा असून, त्यांपैकी ३८५ संज्ञांवर संतवाङ्मयातील अवतरणांचा उपयोग करून लहानमोठे पण स्वयंपूर्ण असे लेख समाविष्ट करण्यात आले आहेत. या कोशाला प्राध्यापक शेणोलीकरांनी साठ पानांची प्रस्तावना जोडली आहे. तिचा काही भाग 'महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या वाचकांसाठी प्रसिद्ध करीत आहोत.— संपादक ]

### संतवाङ्मय आणि तत्त्वज्ञान :

सामान्य लोकांच्या उद्धारासाठी निघालेल्या भक्तिमार्गाला स्वतःचे असे काही स्वतंत्र तत्त्वज्ञान दिसत नाही असे उद्गार शि. म. परांजपे यांच्यासारख्या संस्कृत पंडिताने काढावेत, यात काही नवल नाही. गीतार्थ मराठीत आणल्याने आत्मज्ञान 'स्त्री शूद्रादीप्रतिभे। सामावले।।' (ज्ञाने. १८.१६९९) असे स्वतः ज्ञानेश्वरांना वाटते. त्याच कल्पनेने एकनाथही लिहितात—

'भावे करिता भगवत् भजन। अज्ञान जन उद्धरती।।' (ए. भा. २. ३१८) किंवा 'भागवत धर्माचिये स्थिती। बाळी भोळी भवाब्धि तरती।।' (ए. भा. २. ३२९.) यासारख्या उद्गारांनी ज्ञानाभिमानी तर्कपंडितांची तशी समजूत व्हावी हे साहजिकच होय. शिवाय ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, अमृतानुभव वा दासबोध या ग्रंथांची टीकापद्धती तर्कनिष्ठेपेक्षा भावनिष्ठ आहे. तार्किक पद्धतीच्या खंडनमंडनापेक्षा आत्मानुभवाच्या सहजाविष्काराकडे संतांनी अधिक लक्ष पुरविले आहे. पंडिती वळण, पंडिती भाषा किंवा पंडिती वृत्ती यांचे मराठी संतांना अगदी वावडे आहे. महानुभाव पंडितांप्रमाणे भाष्यकारांच्या तर्ककर्कश व विद्वत्‌जड शैलीचे अनुकरण करण्याच्या भरीस न पडता ज्ञानेश्वरादी संतांनी व्यासवाल्मिकींच्या पौराणिक शैलीचा अवलंब केल्यामुळे त्यांचे ग्रंथ प्रासादिक व रसपूर्ण झाले आहेत. परंतु त्यांचा आशय तत्त्वज्ञानात्मकच आहे.

'इये मराठीचिये नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळू करी।' (ज्ञा. १२. १६) किंवा 'ज्ञानदीप लावूं जगीं।' (नामदेव) हीच त्यांची प्रतिज्ञा होती. ती या ग्रंथांनी सिद्धीस नेली आहे, यात शंका नाही.

'तर्कमुद्रा' सोडून 'रसिकमुद्रेने' म्हणजेच काव्यात्मक पद्धतीने ग्रंथलेखन केल्याने 'लोकु वाक्चातुर्ये। सुखिया होई।।' (ज्ञाने. १८.१७४९) किंवा (तैसा) वाग्विलास विस्तारू। आनंदाचें आवारू। मांडू जगा।।' (ज्ञाने. १३.११६०) ही संतसाहित्याची प्रतिज्ञा आविष्काराच्या बाजूने जशी सिद्धीस गेली आहे, तशीच 'गीतार्थेसी विश्व भरू।' किंवा 'दिसो परतत्त्व डोळां।' हीहि आशयासंबंधीची प्रतिज्ञा या ग्रंथांनी पूर्ण केली आहे. या सर्व ग्रंथातील काव्याची आभरणे बाजूला करून त्यातील गर्भित आशयाचा उलगडा करावयाचा झाला तर, आपण आपले लक्ष ग्रंथातील तात्त्विक संज्ञांवर केंद्रित करावयास हवे. संतवाङ्मयाने काटेकोर शास्त्रीय पद्धतीने एखाद्या विशिष्ट दर्शनाला अनुसरून आपले तत्त्वज्ञान मांडले नसले, तरी त्यावर झालेल्या वैदिक—अवैदिक दर्शनांच्या संस्कारांचा मागोवा घेत ज्ञानशाखापरत्वे त्यांचे विचार एकत्रित केल्यास संतसाहित्याचे तत्त्वज्ञान सिद्ध होऊ शकेल, असा विश्वास वाटतो.

### योगदर्शनाचा संतकाव्यावरील प्रभाव :

महाराष्ट्र संस्कृतीच्या प्रारंभकाळी चातुर्वर्ण्याधिष्ठित

हिंदू समाज हा बहुतांशाने वैदिकधर्माचा–तदंतर्गत कर्ममार्गाचा पुरस्कर्ता होता. ‘ श्रुतिस्मृतिपुराणोक्त ’ अशा आचारधर्मामध्येच सारे गढून गेले होते. वैदिक कर्मकांड, क्षुद्र दैवत-भक्ती आणि आगमोक्त तंत्रसाधना यांच्या आहारी गेलेल्यांना योग्य मार्गावर आणण्याचा प्रयत्न त्या काळातील गोरक्षादी नाथसंप्रदायी सिद्धांनी सुरू केला होता. तेच कार्य चक्रधरप्रणीत महानुभाव-पंथाने व वारकरीपंथी ज्ञानेश्वरादी संतमंडळींनी पुढे चालविले. ज्ञान, योग, कर्म व भक्ती या चारही मार्गांचे वैयक्तिक व सामाजिक पातळीवर शुद्धीकरण करणे हेच त्यांचे त्यांच्या काळातील महत्त्वाचे कार्य ठरले. नाथ-संप्रदायी सिद्धांनी आत्मशुद्धीसाठी योगमार्गाची कास धरली होती. आसने बंध, मुद्रा, प्राणायाम व ध्यान-धारणा-समाधी इत्यादी यौगिक प्रक्रियांचा काटेकोरपणे अवलंब करणाऱ्या मूठभर सिद्धांबद्दल सामान्यांच्या मनात भीतियुक्त आदर निर्माण होई. यौगिक सिद्धी प्राप्त झालेल्या पुरुषांच्या चमत्कार–सामर्थ्यापुढे सामान्य माणसे नतमस्तक होत. या सिद्धींच्या बळावर जारण-मारण, वशीकरणादी अघोर कर्मे करून दाखविणारे तांत्रिक, पंचाक्षरी, भगत, देवऋषी इत्यादी मंडळींनीही योगमार्गाबद्दल सामान्यांच्या मनामध्ये भलताच दरारा निर्माण केला होता. अशा परिस्थितीत यौगिक प्रक्रियांचे यथार्थ ज्ञान करून देऊन योगमार्गाच्या मर्यादा दाखवून देण्याचे कार्य संतमंडळींनी कसे पार पाडले हे या कोशा-तील योगविषयक संज्ञांवरून स्पष्ट होणार आहे.

चक्रधरस्वामी, विवेकसिंधूकार मुकुंदराज, निवृत्ती-नाथ, ज्ञाननाथ, मुक्ताई, विसोबा खेचर, जनार्दनस्वामी, एकनाथ इत्यादींच्या चरित्रात शक्ति-दीक्षेची जी उदाहरणे मिळतात त्यावरून ही सारी मंडळी यौगिक समाधियोगापर्यंत पोहोचलेली होती, हे स्पष्ट होते. योगप्रक्रियेमध्ये ती चांगली निष्णात होती म्हणून तर त्यांच्या लेखनात वज्रासन, त्रिबंध, षट्चक्रभेदन, मुद्रा, कुंभकरेचकादी प्राणायामक्रिया, ध्यानधारणा, सविकल्प-निर्विकल्प समाधी इत्यादी संज्ञांचा त्यांनी जाणतेपणाने उपयोग केलेला दिसतो. मात्र पातंजलीच्या अष्टांग-योगाचे तंतोतंत अनुसरण ज्ञानेश्वर–एकनाथांनी केलेले दिसत नाही. उलट ‘ अष्टांगयोगु न सिणीजे ।’ असाच ते उपदेश करतात. ज्ञानेश्वरीमध्ये काही रूपकातून यम-नियमांना योगांगापेक्षा नैतिकतेचे संवर्धन करणारे सद्गुण म्हणूनच मराठी संतांनी इतरत्र महत्त्व दिलेले आढळते. ज्ञानी माणसाची वा साधुत्वाची लक्षणे या दृष्टीने त्यांनी यमनियमांना गौरवले आहे. बाकी त्यांच्या दृष्टीने योगदर्शनाचा विचार षडांगयुक्तच ठरतो.

हठयोग, लययोग, मंत्रयोग, राजयोग इत्यादी योगप्रकार व षट्चक्रांचे विशेष यासंबंधी ‘विवेकसिंधू’, ‘वरद नागेश’ व ‘ बालबोध ’ या ग्रंथांमध्ये बराच तपशील आला आहे. ‘ ज्ञानेश्वरी’, ‘ एकनाथी भागवत,’ दासबोध ’ या ग्रंथांत तसा तपशील आढळत नाही. मात्र गीतेमध्ये कुंडलिनीचा उल्लेख नसताही ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात ‘ कुंडलिनीयोगाची ’ सविस्तर मांडणी केली आहे. एकनाथांनी कुंडलिनीयोगच पुरस्कारला असून त्यासंदर्भात ‘ आकुलागमा'चा हवाला ते देतात. त्यावरून शिवसूत्रप्रणीत काश्मिरी शैवसंप्रदायाकडून कुंडलिनी जागृतीचा योगमार्ग ज्ञानेश्वरांनी घेतला असे दिसते. षट्चक्रांबाबत पूर्वमार्गी व पश्चिममार्गी अशा दोन्ही गटांचा उल्लेख मराठी संत करतात. प्रत्येक चक्राबद्दलचा तपशील देताना. ‘ बालबोध ’ ग्रंथाने दळसंख्येइतकी देवता व अवस्था यांची नोंद केली आहे. त्याचा नीट उलगडा होत नाही. त्या देवतांची नावे मूळ कोठून आली ते समजत नाही. ‘ वरदनागेश ’ ग्रंथातील चक्रांसंबंधीचे काही उल्लेख असेच गूढ वाट-तात. तंत्रमार्गातील देवतांशी त्यांचा संबंध पोहोचत असावा. ज्ञानेश्वर–एकनाथ इत्यादींनी गूढ वाटणाऱ्या असल्या नोंदींचा आदर केलेला दिसत नाही. उलट आत्मज्ञान व भक्तियोग यांच्या तुलनेने योगमार्गाला त्यांनी गौणच लेखले आहे.

‘ प्राणापानजय ’ किंवा ‘ षट्चक्रभेदन ’ ही योग-प्रक्रिया सर्वसाधारण माणसाच्या आवाक्याबाहेरची आहे. योगमार्ग हा खडतर आहे. सिद्धींच्या मोहाने जे त्या मार्गाकडे जाऊ पाहतात, त्यांनी योगमार्गाचे काठिण्य आणि सिद्धींचे क्षुद्रत्व लक्षात घेऊन आसन-प्राणायामादींच्या नादी न लागता मनोजयाच्या मार्गा-कडे वळावे. किंवा यमनियमांचे परिपालन निष्ठेने करून सुलभ अशा भक्तिमार्गाची कास धरावी ’ असे संत सांगतात. त्यादृष्टीने ध्यान, धारणा, समाधी या यौगिक प्रक्रियांना मराठी संतांनी भक्तियोगाच्या



अनुक्रमणिका

संदर्भात नवा अर्थ दिला आहे. संप्रज्ञात किंवा असंप्रज्ञात समाधी आणि सविकल्प–निर्विकल्प समाधी या पारिभाषिक शब्दांची योग्य ती जाण ठेवूनही भक्तिमार्गातील सहजसमाधीला अंतिम मूल्य म्हणून मराठी संतांनी गौरविले आहे. हे करताना तप, शौच, स्वाध्याय, सत्य, ध्यान, समाधी यांसारख्या यौगिक संज्ञांच्या अर्थांमध्ये त्यांनी कितीतरी बदल केल्याचे दिसून येते. ' हा भजनमार्ग योग्यांचा ।' असे म्हणत त्यांनी योगाची भक्तीशी सांगड घातली. हठयोग प्रक्रियेने समाधी लावणारा योगी वा अवधूत हा योगदर्शनाचा आदर्श होय. परंतु शरीरसमाधीपेक्षा आत्मानुभूतीचा आनंद श्रेष्ठ आहे. म्हणून

' जो आत्मबोधे तोखला । तोचि स्थिर प्रभु भला ।'

किंवा

' अहं धुई ' तो अवधुतु । तोचि योगी तोचि पुनीतु ।'

असा ज्ञानीभक्ताचा आदर्श संतांनी लोकांपुढे ठेविला, स्वप्रयत्नाधारित व कष्टप्रद अशा रूढ अष्टांगयोगमुक्त पातंजल योगावर मराठी संतांनी टीका केली असली तरी, त्यांनी योग आणि भक्ती, तसेच ज्ञान आणि भक्ती यांची जी सांगड घातली, तिचा उगम त्यांच्या गुरुभक्तीच्या संकल्पनेत आणि सद्गुरुकृपाप्राप्त सहजयोगात आहे. संतांचा सहजयोगच शिवसूत्रप्रणीत कुंडलिनी महायोग किंवा सिद्धयोग म्हणून ओळखला जातो. संतांच्या अंतरंगसाधनेत या योगाचा अभ्यास होत असल्याने योगप्रक्रिया, योगपद्धती, योगसाधने या सर्वांचे त्यांनी मर्मग्राही स्पष्टीकरण केलेले आढळते. या समन्वय भूमिकेमुळे योगमार्गाचे प्रबोधन ते करू शकले असे दिसते.

### महानुभावदर्शनाचे विशेष :

ज्ञानेश्वरांआधी पंचवीस वर्षे चक्रधरांनी लोकांना भक्तियोगाचा मार्ग दाखविला. स्वत: चक्रधर सिद्धावस्था प्राप्त झालेले सिद्धसंप्रदायी ' अवधूत ' म्हणून ओळखले जात. आपल्या परमार्गाची (महानुभाव पंथाची) दीक्षा देताना शिष्यांच्या संबंधात शक्तिपात तंत्राचा अवलंबही चक्रधर करीत. परंतु त्यांनी आपल्या पंथाच्या तत्त्वज्ञानात योगमार्गाचा पुरस्कार केलेला दिसत नाही. षट्चक्रभेदन, प्राणायामसाधन किंवा कुंडलिनी-जागरण इत्यादी यौगिक प्रक्रियांचा त्यांच्या सिद्धांतसूत्रपाठात कुठेही उल्लेख नाही. ' अष्टांगयोग संपूर्ण । कलियुगी नव्हेची जाण ॥ ' ( वे. मू ७.२१७ ) ह्या श्रीधराच्या उक्तीप्रमाणे ' कलियुगी आगम न वेतंती । ' असे चक्रधर सांगतात. पातंजलयोग आणि आगमोक्त तंत्रमार्ग दोन्ही त्यांना अमान्य दिसतात. ज्ञान, कर्म आणि भक्ती या तीन खांबांवरच त्यांच्या तत्त्वज्ञानाची इमारत उभी आहे. मात्र वैदिक किंवा भागवतधर्मी संज्ञांपेक्षा काहीशा वेगळ्या प्रकारच्या संज्ञा महानुभावपंथी तत्त्वज्ञानात आल्या आहेत. म्हणून ' महानुभाव मत ' अशा उल्लेखाने त्या संज्ञांचा विचार स्वतंत्रपणेच केला आहे.

आदि मळ, मळ, पाचपिशी, असतिपरो, सन्निधान, बहिर्याग, अंतर्याग, संलग्न यांसारख्या संज्ञा खास महानुभावीय म्हणाव्या लागतील. मळ, आदिमळ या संज्ञांचे मूळ लिंगायत, जैन या पंथांच्या तत्त्वज्ञानात असावे. वेदांतातील ' पंचकोश ' संज्ञेसारखी ' पाचपिशी ' ही संज्ञा वाटते, पण तिची संकल्पना वेगळी आहे. जीवस्वरूपाच्या ठिकाणी असलेल्या पाच दोषांना ' पाचपिशी ' म्हटले आहे. त्यांपैकी अनादी अविद्या ही इतर चारींचे मूळ असते. तिची संकल्पना वेदांत्यांच्या ' माया ' कल्पनेशी जुळणारी आहे. महानुभावांची ' माया ' मात्र त्यांनी स्वीकारलेल्या स्वतंत्र देवतावर्गातील सर्वश्रेष्ठ देवता होय. मूलतत्त्वाच्या वर्गात देवतावर्गाची नित्य आणि स्वतंत्र तत्त्व म्हणून गणना करणे, हे महानुभावपंथाचेच खास वैशिष्टय होय. देवतांचे नऊ थोबे (स्तर) कल्पून त्यांची ८१ कोटी १० लक्षामध्ये गणना करणे, तितक्याच त्यांच्या विद्या कल्पिणे, त्यांचे उच्चनीचत्व मानणे, प्रत्येक थोब्यातील देवतांचा परिसर, त्यांचे स्वरूप, सामर्थ्य व त्यांच्या मर्यादा सांगणे ही सगळी मांडणी पौराणिक विश्वशास्त्रासारखी वाटते. स्वर्ग देवता, अंतराळीच्या देवता, सत्य–कैलास–वैकुंठीच्या देवता ही सारी भाषा पुराणातील विश्वरचनेचीच आठवण करून देणारी आहे. देवतावर्गातील माया हीच जगाचे उत्पत्तिकारण असून तिच्या परिसरातच परमेश्वर ' मायापुरी ' जन्म घेतात. महानुभावांच्या अवतार कल्पनेत वैदिक व पौराणिक कल्पनेपेक्षा बराच वेगळेपणा आहे. श्रीकृष्ण, दत्त यांना महानुभाव मानत असले तरी त्यांच्या चरित्रकथात

बराच फरक आहे. अवतारी पुरुष म्हणून गुरुस्थानी असलेले 'पंचकृष्ण' ही संकल्पना खास महानुभावीय आहे. जैनांच्या पंचपरमेष्ठी किंवा वीरशैवांच्या पंचाचार्य या संज्ञेशी पंचकृष्ण ही संज्ञा जुळती वाटते. चांगदेव राऊळ, गुंडम राऊळ, (श्रीगोविंदप्रभू) व चक्रधर हे कलियुगातील मानवी पुरुष अवतारी गणले गेल्याने महानुभाव पंथ हा सिद्धसंप्रदायी ' गुरूमार्गच ठरतो. उत्कट गुरुभक्ती, असीम शिष्यप्रेम हे गुरुमार्गाचे विशेष येथेही आढळतात.

महानुभावपंथातील अविद्या, जीव, कर्म, ब्रह्म, माया, परमेश्वर, प्रपंच आणि विज्ञान इत्यादी महत्त्वाच्या संज्ञा इतरांशी समान वाटतील अशाच आहेत. अविद्या, माया यांच्या संबंधीची चक्रधरांची वचने संकलित करून पाहिल्यास या पंथाने पारंपरिक मायावादाचा पाठपुरावा केला आहे असे वाटले, तरी या पंथाला विवर्तवाद किंवा परिणामवाद दोन्ही मान्य नाहीत. महानुभवांचे परमेश्वर तत्त्व त्र्यंशात्मक आहे. 'ब्रह्म-माया-ईश्वर' मिळून परमेश्वर होतो, महानुभावांचे ब्रह्मतत्त्व परमेश्वराहून कमी प्रतीचे दिसते. माया ही परमेश्वराची प्रमुख शक्ती आहे. त्याच्याच प्रेरणेने माया सर्व ब्रह्मांडाचा व्यापार करते. या ठिकाणी 'माया' म्हणजे भगवंताची लीला या भक्तिमार्गी कल्पनेचा पडसाद ऐकू येतो. 'अनंतशक्ती परमेश्वरू।', 'ईश्वरी आती ते अन्यत्र नाही।' 'परमेश्वरू जीवाते उद्धरिती।' यांसारख्या सूत्रांतून परमेश्वराचे कर्तुम-कर्तुम सामर्थ्य प्रकट केले जाते. परमेश्वराला श्रेष्ठत्व देणे, ही भक्तिमार्गाची गरज असते, ती महानुभावपंथाने भागविली आहे. 'ज्ञानापसी प्रेम उत्तम।' अशी या पंथाची धारणा आहे. कर्म, धर्म, विधी, विषय या सर्वांचा त्याग करून ज्ञानी माणसानेही परमेश्वराला अनुसरले पाहिजे. तरच त्याला परमेश्वरप्राप्ती किंवा अच्युतपदाची प्राप्ती होते. 'सर्व धर्मान् परित्यज्य। मामेकं शरणं व्रज।' या गीताधर्माचेच परिपालन करण्याचा आग्रह महानुभाव पंथाने धरला आहे.

बहिर्याग म्हणजे युगधर्म, अंतर्याग म्हणजे विद्यामार्ग, तसेच कर्मराहाटीच्या क्रिया व देवराहाटीच्या क्रिया या दोन्ही मार्गांचा तपशील बराच गुंतागुंतीचा आहे. 'अनुसरण' संज्ञेने या पंथाची भावप्रधानता व्यक्त केली असली, तरी 'असति परी' या संज्ञेने कर्मकांडाला फाजील प्राधान्य दिले आहे. या संज्ञेखाली येणारा आचारधर्म संन्यासप्रवण व आत्यंतिक निवृत्तीमार्गी आहे. अहिंसा आणि संन्यास ह्या दोहोंचा आग्रहाने पुरस्कार करण्यामध्ये जैन धर्माचा प्रभाव पडलेला दिसून येतो. शिवाय ईश्वरप्राप्तीच्या दृष्टीने कर्ममार्गाला गौणच लेखले आहे. कर्मप्रकार, कर्मफल या संज्ञांबाबतच्या वैदिक व महानुभवीय संकल्पनांमध्ये बराच सारखेपणा आढळतो. 'विज्ञान' ही संज्ञा मात्र विपरीत ज्ञान (अन्यथाज्ञान) याअर्थी वापरलेली दिसते. पुराणातील प्रलयाच्या संकल्पनेशी 'संहार' या संज्ञेचे साधर्म्य दिसून येते. प्रलयात सर्वकाही नष्ट होते. पण महानुभावांच्या संहारात मात्र वस्तूंचे, मळांचे विघटन होते. 'नित्यवर्गी जीव, देवता, परमेश्वरू उरेति।' (संहार १०) जीव, देवता, प्रपंच नि परमेश्वर या चार वस्तू स्वतंत्र व नित्य मानल्याने महानुभावपंथ अनेकतत्त्ववादी व द्वैतवादी म्हटला जातो. इतर वैदिकमार्गांशी याबाबत त्याचा मूलभूत विरोध आहे. सर्वस्वी भिन्न असे तत्त्वज्ञान आणि खडतर आचारधर्म यामुळे हा पंथ लोकांमध्ये अप्रिय होत गेला सांकेतिक लिप्यांच्या अवलंबामुळे तर या पंथाचे वाङ्मय अदृष्ट राहिले. आणि या पंथाच्या शिकवणीपासून सारा समाज बराच काळ अलिप्त राहिला, ही प्रत्यक्ष वस्तुस्थिती आहे. परिणामतः महानुभावांच्या द्वैती तत्त्वज्ञानाचा व निष्प्रपंचवादी आचारधर्माचा म्हणावा इतका प्रभाव महाराष्ट्रामध्ये दिसून येत नाही. उलट ज्ञानेश्वर नामदेवांच्या अद्वैती भक्तियोगाने मराठी माणसाच्या मनावर गेली अनेक शतके अधिराज्य केल्याचे दिसून येते. अर्थात तत्पूर्वीचा वैदिक धर्माचा संस्कार आणि शांकरमताचा पगडा अजिबात नष्ट झाला असे नाही. महाराष्ट्रीयांच्या आचारविचारात वेदोपनिषदांचा अद्वैती ज्ञानमार्ग, पारंपरिक स्मृतिप्रणीत कर्ममार्ग आणि पौराणिक भक्तिमार्ग या साऱ्यांचे मिश्रण झालेले आढळेल, ज्ञानेश्वर–एकनाथादी विचारवंतांनी आपल्या समन्वय बुद्धीने ज्ञान, कर्म, भक्ती व योग या चारही मार्गांनी अद्वैतनिष्ठ कर्मप्रधान भक्तियोगाच्या उद्दिष्टापर्यंत कसे पोहोचता येते, ते दाखवून दिले. त्याची साक्ष त्यांच्या ग्रंथातून मिळते. त्यासाठी त्यांनी या



अनुक्रमणिका

चारही क्षेत्रातील तात्त्विक संज्ञांचा नवा अर्थ लोकांपुढे ठेविला आणि आचारविचाराची नवी दिशा दाखविली.

मराठी संतांना ज्ञानाची थोरवी पटते, पण पढिकतेचा वडेजाव मानवत नाही, ' कर्माचे डोळे ज्ञान । ते निर्दोष होआवे गा ।। ' असे म्हणणाऱ्या ज्ञानेश्वरांनी लौकिक विद्या, शास्त्रे, कला यांना ' खंडज्ञान ' म्हटले असून आत्मज्ञानाखेरीज हे सारे पदार्थज्ञान मोराच्या अंगावरील डोळ्यांप्रमाणे दृष्टिहीन आहे, आंधळे आहे, असे म्हटले आहे. कर्माशिवाय जगणेच अशक्य आहे, हे माहीत असल्याने त्यांनी कर्मत्याग व कर्मसंन्यासाचा निष्प्रपंचवाद सांगितला नाही. उलट देहधाऱ्याने कर्मे केलीच पाहिजेत. पण म्हणून त्याने अकर्माचा वा दुष्कर्माचा मार्ग न चोखाळता स्वधर्माने सांगितलेली कर्मे निष्ठेने करावीत. ' सुखे प्रपंच करावा । ' पण ' माजी विठ्ठल आठवावा । ' असे संत सांगतात. प्रवृत्ती-निवृत्तीचा मेळ घालण्याकडे त्यांनी लक्ष दिले. रुक्ष ज्ञानाप्रमाणे तंत्राचा वडेजाव माजविणारे कर्मही त्यांना संमत नाही. कर्माच्या बाह्याचरणापेक्षा त्यापाठीशी असलेल्या आंतरिक भावनेला ते अधिक मानतात. ज्ञान व कर्म यांची उंची भावबळानेच उंचावते अशी त्यांची धारणा असल्याने भावनेच्या शुद्धीकरणासाठीच नैतिक सद्गुणांवर त्यांनी विशेष भर दिला आहे अंधश्रद्ध अशी भाबडी भक्ती त्यांना मान्य नाही. सगुण-निर्गुण हा भेदही ते करत नाहीत. आत्मज्ञानाचे अधिष्ठान आणि सदाचाराचे आविष्करण असलेल्या ज्ञाननिष्ठ कर्मप्रधान भक्तीनेच जीवनातील साफल्य मिळविता येते, अशी मराठी संतांची निष्ठा दिसते.

**प्रमाण–प्रमेय विचार** (Logic) :

संतवाङ्मय हे प्राधान्याने आध्यात्मिक वाङ्मय आहे. ब्रह्मविद्या किंवा आत्मज्ञान हा त्याचा मुख्य वर्ण्यविषय आहे. आत्मतत्त्व हे अप्रमेय मानल्याने संतांनी न्यायदर्शनातील प्रमाण–प्रमेय विचाराचा अवलंब काटेकोरपणे केलेला दिसत नाही. कार्यकारण-संबंधावरही त्यांनी विशेष भर दिलेला नाही. म्हणूनच न्यायदर्शनातील संज्ञा त्यांच्या विवेचनात विशेष आढळत नाहीत विवेकसिंधुकार मुकुंदराज आणि दासोपंत, एकनाथ, वामनपंडित यांसारखे पंडितो वळणाने लिहिणारे काही ग्रंथकार यांनी शाब्दिक कोटिक्रम वा युक्तिवाद करताना अनुमानादी प्रमाणांचा उल्लेख केला असला, तरी त्याची शास्त्रशुद्ध मांडणी केलेली आढळत नाही. (पाहा–' प्रमाण ' पृष्ठ ४११–४९२) प्रश्न, शंका, आक्षेप व त्यांचे निरसन या पद्धतीने लिहिणाऱ्या रामदासांनी तर कधी कधी ' अनुमाना '-सारखी तर्कशास्त्रीय संज्ञा शंका किंवा अंदाज अशा सामान्य अर्थाने वापरली आहे. संतांनी आपल्या प्रतिपादनात एकूण प्रमाणविचाराला स्वतंत्र वा स्वायत्त स्थान न देता त्याला त्यांनी गौणच लेखले आहे.

मीमांसकांच्या अर्थापत्ती व अनुपलब्धी या प्रमाणांची दखलही संतविचाराने घेतलेली नाही. आत्मतत्त्वाच्या दृष्टीने ' अभाव ' हा पदार्थच संभवत नसल्याने अभावाचे ज्ञानसाधन असलेल्या अनुपलब्धी या प्रमाणाची गरजच त्यांना वाटली नसावी. तसेच साक्षात्कारी प्रत्यक्षाच्या मार्गानेच आत्मतत्त्वाची अनुभूती मिळते असा ठाम विश्वास असलेल्या संतांना सूचितार्थाशी संबद्ध असलेल्या अनुमानावलंबी ' अर्थापत्ती 'ची गरज पडली नाही, यात नवल ते काय? मायेच्या सत्–असत् स्वरूपाविषयी करता येणाऱ्या वारा विधानांचे खंडन करून मायेची अनिर्वचनीयता पटविताना विवेकसिंधू आणि वरदनागेश या ग्रंथांतील विवेचन अनुमान प्रमाणाच्या आधाराने केले गेले आहे. तसेच अमृतानुभवादी ग्रंथांतून शब्दखंडन, अज्ञानखंडन, अविद्यानिरसन इत्यादी प्रकरणे आली आहेत. त्यात काही ठिकाणी ' अनुमान ' प्रमाणाचा आधार घेतलेला आढळतो. अर्थात तेथेही अनुमानाची ' पंचावयवी ' मांडणी स्पष्टपणे केलीच आहे, असे दिसत नाही. संतांनी आपले आध्यात्मिक विवेचन काव्याच्या माध्यमाने केले आहे, व्याकरणव्युत्पत्ती, तर्क यांच्या माध्यमाने नव्हे. ज्ञानेश्वरादिकांचे प्रतिपादन शाब्दिक चिकित्सेपेक्षा निरूपण पद्धतीचे असल्याने ते उपमा दृष्टांतासारख्या अलंकारांनी व प्रतिमांनी वहरलेले दिसते. त्यांचा आधार ' उपमान ' हे प्रमाणच आहे. ब्रह्म, आत्मा, माया यांसारख्या अमूर्त कल्पनांना मूर्त करण्यासाठी, जिज्ञासूला विविध बाजूंनी ' वस्तूच्या ' सन्निध नेण्यासाठी कवी जेव्हा अनेक उपमा–दृष्टांतांची खैरात करतो, रूपकांची माला गुंफतो, तेव्हा ' उपमा ' हे प्रमाणच त्याला जवळचे वाटते.

ब्रह्म किंवा ईश्वर यांसारख्या अमूर्त कल्पनांबाबत श्रुतिवचने वा गुरुवचने यावर म्हणजेच शब्दप्रमाणावर संतांचा विशेष भर दिसतो. मात्र आत्मानुभव हाच याबाबतीतील अखेरचा शब्द असल्याने संतांनी इंद्रिय-प्रत्यक्ष वा मानसप्रत्यक्ष यांना अप्रमाण मानून योगच प्रत्यक्ष व त्याहीपेक्षा कवींच्या प्रातिभ प्रत्यक्षाशी सदृश असलेल्या 'प्रज्ञा-प्रत्यक्षा'ला आत्मज्ञानाचे सर्वश्रेष्ठ साधन मानले आहे. ज्ञानेश्वर जिला 'सिद्ध-प्रज्ञा' म्हणतात, तिलाच रामदासांनी 'आत्मप्रचीती', 'आत्मप्रतीती' अशा संज्ञा उपयोजिल्या आहेत. रामदासांचा 'प्रत्ययज्ञानी' हाच 'आत्मानुभवी संत' होय. तो सद्गुरुकृपेने प्राप्त होणाऱ्या प्रज्ञाप्रत्यक्षाच्या बळावर आत्मानुभवांच्या कक्षेत आणतो, याच मार्गाने जाऊन ज्ञानेश्वरादी संतांनी महाराष्ट्रात 'ब्रह्मविद्येचा सुकाळ केला.

## आधार दर्शने :

गीता, भागवत व योगवासिष्ठ ही मराठी तत्त्वज्ञानाची प्रस्थानत्रयी म्हणावी लागेल. संस्कृतातील हे तीन ग्रंथ व त्यावरील भाष्यग्रंथ यांमधून आलेला षड्दर्शन प्रतिपादित तत्त्वविचारच मराठी संतांनी आधारभूत मानला आहे. संतांनी सर्व आस्तिक दर्शने प्रमाण मानली तरी वेदांताला त्यांनी अधिक मान दिला आहे. 'वेदांतरूपी सिंहापुढे अन्य दर्शने कोल्ह्यासारखी आहेत.' (वि. सि. ७. १२) किंवा 'वेदांत हा गणेशाच्या हातातील मोदक आहे.' (ज्ञाने. १.११) एवढी मान्यता संत वेदांतदर्शनाला देतात. सांख्य आणि योग ही दर्शनेही त्यांची आवडती दिसतात. 'सत्कार्यवादी सांख्यमत म्हणजे गणेशाच्या हातातली पद्म' असून पूर्वमीमांसेला म्हणजेच जैमिनीच्या धर्मसूत्राला त्यांनी गणपतीचा 'अभयहस्त' म्हटले आहे. बौद्ध दर्शन हा गणेशाचा खंडित दात असून तो त्याच्या योगदर्शनरूपी हातात दिला आहे. चार्वाकादी नास्तिकांचा देहात्मवाद व शरीरसुखवाद यावर संतांनी कडक टीका केली आहे. माध्यमिक बौद्धांचा अनात्मवाद किंवा जैनांचा अनेकांतवाद संतांना बिलकूल मान्य नाही. बौद्ध-जैनांचे अतिरेकी अहिंसा तत्त्व व शारीरसंन्यास हेही संतांच्या टीकेचे विषय झाले आहेत. न्याय वैशेषिकांचा अनेकतत्त्ववाद आणि मध्वमतानुयायी वैदिक व महानुभाव यांचा द्वैतवाद मराठी संतांनी अमान्य केला आहे. ते आत्मसातवादी एकत्वाचेच पुरस्कर्ते आहेत. महानुभावपंथ तेवढा अनेकतत्त्ववादी आहे. इतर भक्तिपंथियांनी मात्र वेदांतातील एकतत्त्ववादाशी भक्तिविचार जुळवून घेतला आहे.

षड्दर्शनांचाही मूलाधार असलेल्या औपनिषदिक तत्त्वविचारावरच मराठी संतांच्या तत्त्वज्ञानाची उभारणी झाली आहे. 'नाही श्रुतीपरौती माऊली जगा।' हे ज्ञानेश्वरांचे वचनच मराठी संतांच्या तत्त्वविचाराचा प्रारंभबिंदू ठरते. 'अहं ब्रह्मास्मि', 'तत्त्वमसि' आणि 'सोऽहं हंसः' यासारख्या औपनिषदिक महावाक्यांच्या पायावर संतवाङ्मयातील तत्त्वविचाराची इमारत उभी आहे. गुरुपरंपरेने आलेला समाधिबोध (एवं गुरुक्रमे लाधले। समाधिधन जे आपुले।' (ज्ञाने. १८. १७६३.) आणि शास्त्रसिद्धांत (कार्याकार्य–विवेकी। शास्त्रेंचि करावी पारखी।') (ज्ञाने. १७.४६६) यांचा मेळ घालून आत्मप्रचीतीशी त्याचा पडताळा पाहावा असे संत सांगतात. केवळ शब्दज्ञान (पांडित्य) अगर लौकिकशास्त्र, विद्या यांनी प्राप्त होणारे 'खंडज्ञान' यापेक्षा अनुभवनिष्ठ आत्मज्ञानाला ते सर्वात अधिक महत्त्व देतात. त्यासाठी शब्दच्छल करणाऱ्या प्रमाण–प्रमेय विचारापेक्षा प्रातिभ प्रत्यक्षाची वा साक्षात्काराचीच आवश्यकता संतांना वाटते. त्या दृष्टीने योग आणि वेदांत या दर्शनातील ज्ञानशास्त्राचाच संत आपल्या ग्रंथांतून पुरस्कार करतात.

सारा ज्ञानव्यवहार हा 'ज्ञाता–ज्ञात–ज्ञेय' या त्रिपुटीने बद्ध आहे. ही त्रिपुटीच साऱ्या विश्वाचे बीज असून कर्मप्रवृत्तीलाही तीच कारण असते. पाचभौतिक सृष्टी व देहांतर्गत मानस सृष्टी अंतःकरणपंचकाकडून इंद्रियार्थसंनिकर्षाने जाणली जाते, तेव्हा ती 'ज्ञेय' होते. त्या ज्ञेयाला जाणून घेणाऱ्या अंतःकरणपंचकाकडे ज्ञातृत्व येते. मन, बुद्धी किंवा अहंकार ही जेव्हा देहालाच मी समजून वागतात, तेव्हा त्यांचा ज्ञानकर्म व्यवहार लौकिक दृष्टीने सत्य वाटला, तरी तो बाधित होणारा असल्याने भ्रम किंवा भास म्हणूनच ओळखला जातो. हे भ्रमस्वरूप ज्ञान एक प्रकारचे अज्ञानच होय. या अज्ञानामुळेच जीव जन्म-मरणाच्या चक्रात सापडतो. हे वेदांती मत मराठी संतांनाही मान्य आहे. ज्ञानेंद्रिये,



अनुक्रमणिका

मन यांच्याकडून प्राप्त होणारे जड जगताचे ज्ञान म्हणजे नाना शास्त्रे, विद्या, कला यांना रामदासांनी 'पदार्थज्ञान' म्हटले आहे. या पदार्थज्ञानाने पांडित्याची प्रतिष्ठा व लौकिक प्राप्त झाला, तरी 'आत्मसाधन साचार। तयास न घडे कल्पान्तीं।' (वै. सू. २ श्लो. ११६) सायुज्यप्राप्ती करून देणाऱ्या ज्ञानालाच खरे ज्ञान म्हणावे. 'ओळखावे आपणासी आपण' यालाच आत्मज्ञान म्हणतात. स्वरूपज्ञान, वस्तुज्ञान, अपरोक्षज्ञान, परा विद्या अशी अनेक पर्यायी नावे या ज्ञानाला आहेत

'सद्वस्तू (म्हणजेच आत्मरूप) दाखवी तो सद्गुरु।' आत्मज्ञान प्राप्त होण्यासाठी साधनचतुष्टयसंपन्न असा अधिकारी शिष्य हवा आणि 'सद्वस्तू' दाखवील असा सद्गुरु हवा. शास्त्रग्रंथांचे श्रवण–पठण–मनन हे तर आवश्यकच आहे पण त्याचबरोबर नित्यानित्यविवेक आणि वैराग्य या दोहोंनी संस्कारित झालेली मन आणि बुद्धी ही आत्मज्ञानप्राप्तीसाठी समर्थ व पात्र होतात, तेव्हाच सद्गुरू भेटतो. 'शक्तिपात' प्रक्रियेने आत्मज्ञानाचा साक्षात्कार घडवितो. जीव आणि परमात्मा दोन्ही एक आहेत हे जाणणे म्हणजे ज्ञान. आणि ते अनुभविणे म्हणजे विज्ञान होय. आत्मज्ञानाची परिणती आत्मानुभवात झाली. अद्वैतबोधाचा प्रत्यय आला की त्यानुसार व्यक्तीचे आचरणही बदलते.

आत्मज्ञान केवळ बुद्धीचा वा पांडित्याचा विषय नाही. तो आत्मानुभवाचा विषय आहे. जाणीव, तर्क, विचार यांच्या कक्षेमध्ये जे येते ते प्रपंचविज्ञान होय. त्याही पलीकडे अनुभवगम्य असे जे 'निखळज्ञान' आहे, ते स्वस्वरूपज्ञान किंवा आत्मज्ञान होय. त्रिगुणांच्या भाषेत त्यालाच सात्त्विक ज्ञान म्हणतात. देहालाच मी समजून वागणारा पदार्थविज्ञानाचा हव्यास धरतो, तो तामस ज्ञानी होय. पदार्थभेद जाणून भेदबुद्धी वाढविते ते राजस ज्ञान. शिवापासून तृणापर्यंत ऐक्यभावाने पाहायला शिकवते ते सात्त्विक ज्ञान होय या ज्ञानाने ज्ञाता ज्ञेयाशी एकरूप होतो. 'सोऽहं' किंवा 'अहं ब्रह्मास्मि' अशी जाण त्याला येते. पण या ज्ञानातही 'ते मी आहे, मी ब्रह्म आहे' असा अहंभाव शिल्लक राहतो. या पुढची पायरी म्हणजे 'हे सारेच ब्रह्म आहे' (खलु इदं ब्रह्म). प्रपंच किंवा हे विश्व ब्रह्मतत्त्वापासून वेगळे झालेच नाही, असा विश्वब्रह्मभाव वाढणे म्हणजेच 'पूर्णाद्वैता'ची अनुभूती प्राप्त होणे होय. हेच खरे आत्मज्ञान. हाच खरा योग आणि हीच खरी अद्वैती भक्ती होय. असा पुरुषच 'हे विश्वचि माझे घर' या भावनेने चराचराशी एकरूप होऊन जातो. असे ज्ञानेश्वर, एकनाथादी संतमंडळी सांगतात.

**संतांची वस्तुमीमांसा ( Metaphysics ) :**

मराठी संतांच्या दृष्टीने ब्रह्म किंवा आत्मा हीच अपरिवर्तनीय म्हणून सनातन अशी सद्वस्तू आहे. तीच पिंडब्रह्मांडाचे मूलतत्त्व वा आदीकरण वा सर्वांचा मूलाधार आहे. हीच वस्तू किंवा कल्पना एकाच वेळी सद्रूप व चिद्रूप व आनंदरूप असल्याने 'सच्चिदानंद' हीच त्या वस्तूची वाचक अशी संज्ञा (=शब्दप्रतिमा) ठरते. या सद्रूपाच्या बाजूने पाहिले असता सत्ताशास्त्राच्या भाषेत ज्ञानेश्वरादी संतांची अंतिम भूमिका 'अजातवादा'ची दिसते. एका चिद्वस्तूखेरीज दुसरे काही–म्हणजे विविध नामरूपात्मक विश्व–झालेच नाही. सर्वत्र नि सदोदित एक ब्रह्मरूपच तेवढे अस्तित्वात आहे. 'ब्रह्मादिपिपीलकावरी। मी वांचूनी दुसरी। गोठी नाहीं।' (ज्ञाने १०.१०५०)
किंवा दिवसा आणि रात्री सूर्यात काही फरक पडतो असे नाही, त्याप्रमाणे 'विश्वपणें' होये वा 'विश्वलोपीं जाये' असे ह्या मूलतत्त्वाच्या सद्रूपाच्या बाबतीत काही घडतच नाही. आत्मतत्त्वाव्यतिरिक्त वेगळे असे जगत् वा जीव काही निर्माणच झाले नाही. म्हणून ज्ञानेश्वरांचे आत्मतत्त्व म्हणते, 'सेंघ आम्हीच दाटलों। ना लोपलों ना प्रगटलों। कोणा होऊनि॥' (अमृता. १०.१५)

अद्वैताच्या दृष्टीने अगदी पराकोटीचा असा हा 'अजातवादा'चा सिद्धांत मराठी संतांनी आत्मानुभवातून मान्य केला आहे

मराठी संतांचाही अध्यात्मविचार 'तत्' आणि 'त्वम्' या दोन पदांवर उभा असून या दोहोतील ऐक्य पटविण्यासाठी 'तत्त्वमसि' या महावाक्याचे विवरण करताना त्यांनी अनेक विचारप्रणालींचा स्वीकार केलेला दिसतो. म्हणून त्यांच्या प्रतिपादनात रज्जू–सर्प, शुक्ती रजत, मृगजळ यांसारख्या मायावादी



अनुक्रमणिका

दृष्टिकोनाच्या उदाहरणांबरोबर सूर्य आणि प्रभा, पाणी व कल्लोळ, सुवर्ण नि अलंकार, गूळ आणि गोडी यांसारखी चिद्विलासवादी उदाहरणेही येतात. शंकराचार्यांच्या विवर्तवादाबरोबर रामानुजाचार्यांचा विशिष्टाद्वैती परिणामवाद अन् ज्ञानेश्वरांचा चिद्विलास-वाद हेही पाठोपाठ एकदमच येतात. मराठी संतांची विवेचनपद्धती तर्कशास्त्रीय नसल्याने त्यांच्या काव्यात्मक निरूपणपद्धतीमध्ये अशा प्रकारचा विचारसंकर चालू शकतो. आपला पूर्णाद्वैती अद्वैतविचार भिन्न भिन्न पातळींवरील जिज्ञासू श्रोत्यांना निरनिराळ्या बाजूने पटवून देण्यासाठी मायावाद, चिद्विलासवाद, अजातवाद अशा विविध विचारप्रणालींचे टप्पे मराठी संतांनी बुद्धिपुरस्सरपणे स्वीकारलेले दिसतात. विवेकसिंधू, वरदनागेश, बालबोध, दासबोध इत्यादी ग्रंथात अद्वैतसिद्धीसाठी मायावादाच्या व्यतिरेक पद्धतीवर अधिक भर दिला आहे, तर ज्ञानेश्वर-एकनाथांसारखे ग्रंथकार सर्व प्रणालींचा यथायोग्य रीतीने परामर्श घेत चिद्विलासवादाच्या आधाराने, अन्वयात्मक पद्धतीने अद्वैताचे प्रतिपादन करीत असलेले दिसतात.

विवेकसिंधूकारांनी व त्याचे अनुसरण करणाऱ्या ग्रंथकारानी 'त्वं पद शोधन विवेक' ( तू कोण आहेस याचा शोध) या नावाने ओळखल्या जाणाऱ्या आन्विक्षिकी विद्येच्या आधाराने स्थूल, लिंग, कारण (अज्ञान), महाकारण (माया), या चौदेहांचा पद्धतशीरपणे निरास करून आत्मस्वरूपाचा शोध घेतला आहे. त्यावेळी चार्वाक, बौद्ध, नैय्यायिक, वैशेषिक आणि क्षपणिक यांच्या आत्म्यासंबंधीच्या मतांचे खंडनही केले गेले आहे. जडदेहापासून ज्ञप्तिरूप परमात्म्यापर्यंत हा शोध-प्रवास घडला आहे 'नेति-नेति' (न इति) ही विचार प्रकटीकरणाची अतिरेक पद्धती झाली. तसेच 'तत्पदाचा शोध' घेता घेता नामरूपात्मक विविधतेला आभास ठरविणाऱ्या विवर्तवादापासून प्रारंभ करून अद्वैताच्या दृष्टीने पराकोटी ठरणाऱ्या 'अजातवादा'पर्यंत ज्ञानेश्वरादी संतांनी मजल मारली आहे. सर्व विश्वाला आत्म्याच्या पोटात सामावून घेणारी ही विवेचनाची अन्वयात्मक पद्धती झाली. हे सगळे वाद परस्परविरोधी वा परस्परच्छेदक नसून साधकाला अद्वैत शिखरापर्यंत पोहोचविणाऱ्या त्या पायऱ्या आहेत, अशी मराठी संतांची धारणा दिसते. नाहीतरी सप्तभूमिका [ किंवा चारी भूमिका ) या संज्ञांचे विवरण करताना ब्रह्माभ्यासाच्या पायऱ्याच विवेकसिंधूकर्त्यांनी व वेदांतसूर्यकारांनी दाखविल्या आहेत.

केवलाद्वैतसिद्ध करण्यासाठी शंकराचार्यांनी उपयोगात आलेली 'अयास' ही विशेष संज्ञा ज्ञानेश्वरीत कुठे आढळत नाही. संसाराला मिथ्या ठरविणारा अध्यात्मवाद एकनाथी भागवतात मात्र भास, अभास, अध्यासिकता या शब्दांच्या रूपात स्पष्टपणे प्रकटतो. तीच गोष्ट 'विवर्त' या संज्ञेची. माया, अविद्या, अज्ञान भ्रम या संज्ञा संतवाङ्मयात आधिक्याने आढळतात, पण त्यामानाने 'विवर्त' ही संज्ञा क्वचित प्रसंगी उपयोजिलेली दिसते. ज्ञानेश्वर–नामदेवांनी संवर्धित केलेला महाराष्ट्रातील भागवतधर्म (वारकरी पंथ) चिद्विलासवादी पूर्णाद्वैताच्या पायावरच उभा आहे. ('ज्ञानदेवे रचिला पाया।') विश्वातील यच्चयावत वस्तुजातामध्येच विश्वात्म्याचे दर्शन घेता येते, त्यासाठी जगाला दूर सारण्याची गरज नाही. सारे विश्व हेच ब्रह्मरूप आत्मरूप आहे.

जग परौते । सारून पाहिजे मातें ।

ऐसे नोव्हे उखिते । आघवें मीचि ।। (ज्ञाने. १४.१२७)

कारण हे विश्व म्हणजे परमात्म्याची–चित्स्वरूप ब्रह्मतत्त्वाची आत्मक्रीडाच होय अशी संतांची प्रतीती आहे 'जनीं जनार्दन', 'विश्वींविश्वेश', 'भूतीं भूतेष', 'चित्तीं चैतन्य' यासारखी वचने चिद्विलासवादी पूर्णाद्वैतच व्यक्त करतात या दृष्टिकोनातूनच संतांचे 'प्रपंच विज्ञान' समजून घेणे इष्ट होय.

**प्रपंच–विज्ञान :**

ब्रह्मांडाच्या चार देहांइतकी 'तत्' पदार्थाची व्याप्ती आहे. 'तत्' पद हे एका बाजूने संसाराचे वाचक आहे, तर दुसऱ्या बाजूने लक्ष्यार्थाने ते परमात्म्याचे (परब्रह्माचेही) वाचक ठरते. 'त्वम्' पद हे एकीकडे पिंडाचे चार देह दाखविते आणि दुसरीकडे लक्षणंने जीवात्म्याचाही निर्देश करते. शबल तत् पदार्थ म्हणजे परमेश्वरासकट सारा संसार–सारे विश्व होय शबल त्वं पदार्थ म्हणजे अविद्यावेष्टित जीव होय. 'जीवेश्वर ऐक्या' चा उल्लेख विवेकसिंधूमध्ये येतो, पण तत्त्वज्ञान

दृष्टीने तो बरोबर नाही. कारण जीवाला कर्मबंध आहे, ईश्वराला तो नाही. त्यामुळे जीव-ईश्वर हा भेद राहणारच त्यांचे ऐक्य संभवत नाही. मात्र जीवाच्या ठिकाणचे अविद्यारहित शुद्ध चैतन्य आणि ब्रह्मांडाच्या ठिकाणचे 'मायोपाधी वेगळं' परब्रह्म तत्त्व यामध्ये ऐक्य संभवते. जीवाने ते ओळखून 'तत्त्वमसि' या महावाक्यातील लक्ष्यार्थाप्रमाणे 'जीवो ब्रह्मैव नापरः' ह्या सूत्राचा अर्थ अनुभवावा, असे संतांच्या अध्यात्म-विचाराचे सांगणे आहे. एकनाथी भागवत, दासबोध यांसारख्या ग्रंथात लौकिक जीवनाचे-संसाराचे चित्रण बऱ्याच ठिकाणी आले आहे. ज्ञानेश्वरीतही क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार, दैवी-असुरी संपदा, अज्ञान लक्षणे यांची वर्णने करताना त्रिगुणात्मक संसाराची स्फुट चित्रणे भेटतात. पण त्या साऱ्यांचा रोख जीव आणि आत्मा, विश्व आणि विश्वात्मा यांच्या एकात्म संबंधावर प्रकाश टाकण्याचाच आहे. ल. रा. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणे 'ज्ञानेश्वरीतील दृष्टांतात प्रपंच आहे, तर सिद्धांतात अध्यात्म भरलेले आहे.' प्रपंच आणि परमार्थ (अध्यात्म) यातील ऐक्य हेच संतवाङ्मयाचे प्रतिपाद्य असून संतचरित्रांचे सारही तेच आहे.

प्रपंचाच्या घडणीबाबत लिहिताना संतांनी चार खाणी, चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी, त्यांचा उत्पत्तिक्रम-पिंड-ब्रह्मांडाची भौतिक रचना, चतुर्दशभुवने, सप्तलोक, सप्तपाताळ इत्यादीबाबत पौराणिक कल्पनांचा स्वीकार केला आहे. दशावतार कल्पनेत आणि प्रलय व्यवस्थेत त्यांनी प्राचीनांच्या उत्क्रांतिवादाचा आदर केलेला दिसतो. पिंड-ब्रह्मांडातील अष्ट देहव्यवस्थेवर वेदांतातील पंचीकरण कल्पनेचा आणि सांख्यदर्शनातील पुरुष-प्रकृतिजन्य तत्त्व-विचाराचा प्रभाव पडलेला दिसून येतो. सांख्यांचा द्वैतवाद बाजूला ठेवून सृष्टीतील विविधतेच्या स्पष्टीकरणासाठी त्यांच्या घटक तत्त्वांचा संतांनी उपयोग केला आहे. प्रकृतीचा तत्त्वविस्तार आणि पंचीकरण कल्पना यांचे सुंदर चित्रण येथे झाले आहे. सांख्यांच्या 'पुरुष' आणि वेदांत्यांचे 'ब्रह्म', सांख्यांची प्रकृती आणि वेदांत्यांची माया यांची परस्पर-पूरक अशी सांगड संतांनी आपल्या प्रपंचविज्ञानात घातली आहे. त्या दृष्टीने ज्ञानेश्वरीतील व एकनाथी भागवतातील प्रकृति-पुरुष संबंधातील उतारे लक्षात घ्यावेत. म्हणजे त्यांच्यातील एकात्मतेच्या क्रीडावर्णनाला त्यांनी वेदांती वळण कसे खुबीने लावले आहे ते स्पष्ट होईल (पृष्ठे ४७०-४७४)

'ब्रह्माहून पुरुष भिन्न । हे सर्वथा मिथ्या वचन ।
माया प्रकृती अभिधान । दोहीं नावीं मायाचि पूर्ण ॥
(ए. भा. २४.४७७)

शुद्ध तात्त्विक दृष्टीने हे मिश्रण योग्य नसेलही. परंतु भिन्न भिन्न विचारपरंपरांचे सातत्य टिकविणे व त्यांचा समाजहितदृष्टीने उपयोग करून घेणे हे सामाजिक दृष्टीने इष्टच म्हणावे लागेल. अर्थात असे करताना ज्ञानेश्वरादी संतांनी आपल्या मूळ 'अद्वैती' दृष्टिकोनाला किंवा अध्यात्मविचाराला धक्का लागणार नाही याची काळजी घेतलेली दिसते. म्हणूनच प्रकृति-पुरुष, ब्रह्ममाया यांच्या संमिश्रणातून ज्ञानेश्वरांची शिवशक्ती, देवोदेवी ही एकात्मता दर्शविणारी जोडी निघाली. त्यांच्या क्रीडेतून निर्माण होणारे व लय पावणारे जग हे काही निराळे असे तिसरे तत्त्व आहे, असे संत मानत नाहीत. जीव, जगत् आणि जगदात्मा यांच्यातील अद्वैत हेच संतांच्या प्रपंचविज्ञानाचे फलित आहे, यात विलकूल शंका नाही.

### संतांचे धर्मसुधारणेचे कार्य

वैयक्तिक अभ्युदय किंवा निःश्रेयस यासाठी धर्म-कल्पना निघाली असली, तरी संतांनी वैयक्तिक मोक्ष-साधनेसाठी केवळ आत्माभिव्यक्तीपर लेखन केले असे नाही. ज्ञानेश्वर-एकनाथ, तुकाराम-रामदास यांच्या-पुढे त्यांच्या त्यांच्या काळातील समाजसुधारणेचे ऐतिहासिक कार्य उभे होते. आपल्या लेखनकर्तृत्वाने व चारित्र्याने हे त्यांनी यशस्वीपणे पार पाडले असे महाराष्ट्राचा इतिहास सांगतो. त्यासाठी त्यांचा चिद्विलासवादी अद्वैताचा तत्त्वबोधच त्यांना उपयोगी पडलेला दिसतो. संतांची भूमिका आध्यात्मिक असली तरी त्यांचे कार्य सामाजिक, धार्मिक स्वरूपाचे आहे. महाराष्ट्राच्या धर्मविषयक कल्पनात बदल घडवून आणण्याचे महत्कार्य संतांच्या ग्रंथरचनेने केले आहे. ज्ञानेश्वरांचा चिद्विलास-वादी दृष्टिकोन आणि त्यांचा वैशिष्ट्यपूर्ण भक्तिमार्ग हाच मराठी संतांच्या सामाजिक कर्तृत्वाचे मुख्य अधि-ष्ठान आहे. त्याच्या आधारानेच लोकांच्या धर्म, नीती यासंबंधीच्या कल्पनात एकनाथ-तुकारामादी संतांनी



अनुक्रमणिका

परिवर्तन घडवून आणले. मात्र हिंदू समाजाच्या आधारभूत तत्त्वांना धक्का लावून सामाजिक क्षेत्रात ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न मराठी संतांनी केला नाही. कर्मसिद्धांत, पुनर्जन्म, अवतारवाद, जन्मसिद्ध जातिव्यवस्था आणि वर्णाश्रमधर्म या मूलतत्त्वांना न डावलता मराठी संतांनी दैववाद, निष्क्रियता आणि समाजघटकातील विषमता या दुष्परिणामांना दूर सारणारी ज्ञानकर्म-भक्तीची शिकवण त्या त्या काळात लोकांपुढे ठेवली. त्यामुळे धार्मिकक्षेत्रातील अराजक दूर होऊन लोकातील ऐक्यभावाचे दृढीकरण होत गेले. त्यामुळेच मस्लिम अमदानीतही वैदिक धर्माचा पाया बळकट राहिला. जैन, लिंगायत, महानुभाव यांसारखे अवैदिक धर्म निष्प्रभ झाले. परधर्मी मुसलमानांची राजसत्ता महाराष्ट्राच्या धार्मिक, सामाजिक नि सांस्कृतिक जीवनावर विशेष परिणाम करू शकली नाही. उलट संतांची नैतिक शिकवण धार्मिक एकजूटीला उपकारक ठरली. त्यातूनच राष्ट्रीय ऐक्याचा व सामुदायिक पुरुषार्थाचा मार्ग शिवकालात चोखाळला गेला.

हे धर्मसुधारणेचे कार्य ज्ञानेश्वर-एकनाथांनी मोठ्या जबाबदारीने व फार सावधगिरीने पार पाडले असे त्यांच्या ग्रंथातील समन्वय दृष्टीने व हळुवार प्रतिपादनावरून दिसून येते. बौद्ध, जैन यांच्या फसलेल्या क्रांतिकारक प्रयत्नांपासून व लिंगायत, महानुभाव यांच्या वर्णाश्रमाविरोधी सवंगोलंकारी समतेच्या शिकवणुकीपासून ज्ञानेश्वरादींनी योग्य तो धडा घेतलेला दिसतो. या साऱ्यांच्या तुलनेने मराठी संत धर्मसुधारणेच्या प्रयत्नात अधिक वास्तववादी ठरतात. वैदिकधर्मियांपासून फुटून, वेगळाच पंथ काढण्याचा आततायीपणा त्यांनी केला नाही. उलट उच्चवर्णियांच्या विरोधाला शांतपणे व सहिष्णुवृत्तीने ज्ञानेश्वर-एकनाथांनी तोंड दिले, म्हणूनच ते या कार्यात यशस्वी झाले.

अगोदरपासून लोकात प्रचलित असलेल्या वैदिक धर्मांतर्गत भक्तिपंथाला भागवतधर्मी वारकरी संप्रदायाला मराठी संतांनी हाताशी धरून त्याच्याकरवी दुहेरी कार्य घडवून आणले. एका बाजूने पारंपरिक वैदिक धर्माला अधिक व्यापक नि उदार असे स्वरूप देण्याचा त्यांनी प्रयत्न केला, तर दुसऱ्या बाजूने सर्वसामान्य हिंदुधर्मीयांच्या आचरणाला नैतिक अधिष्ठान प्राप्त करून दिले. त्यांच्या आचरविचारातील विसंगती दूर होऊन त्यांची नैतिक पातळी उंचावली. हीच संतांच्या धार्मिक कार्याची सामाजिक फलश्रुती होय. या दृष्टीने वर्णाश्रमधर्म आणि कर्मसंबंधी संज्ञांचे संतांनी केलेले विवरण लक्षणीय ठरते. गीताप्रणीत वर्णधर्माचे प्रतिपादन ते करतातच. कारण त्यांच्या काळात समाजधारणेचा दुसरा नमुना त्यांच्यापुढे नव्हता. उलट वर्णधर्म उच्छिन्न केल्याने अराजकापलीकडे काही पदरात पडत नाही, असा पूर्वानुभवाचा दाखला त्यांच्यापुढे होता. धार्मिकक्षेत्रात तरी समता नि बंधुता प्रस्थापित व्हावी म्हणजे सामाजिक विषमतेची नांगी मोडली जाईल, या हेतूने महाराष्ट्रीय भक्तिमार्गाला नैतिकतेची डूब देण्याचा त्यांनी यशस्वी प्रयत्न केला. त्यामुळेच जीवनाची आसक्ती मोहवशता व सुखाचा हव्यास कमी होत जाऊन ध्येयप्रवणता, सर्वस्वत्यागाची तयारी इत्यादी रूपात व्यक्त होणारी जीवननिष्ठा मात्र बळावली, महाराष्ट्र संस्कृतीचा हा विशेष संतांच्या भागवतधर्मी शिकवणुकीचा परिणामच म्हणावा लागेल ▭

## साभार स्वीकार

### कविता

**कैवल्याचे झाड** : वा. भ. बोरकर; सुरेश एजन्सी, पुणे; १९८७; रु. ३० ▭ **शततारका** : वंदू ग. जोशी-संपा; राधाकृष्ण प्रकाशन, शिरूर; १९८०; रु. १२-५० ▭ **हे दान पाणकळ्याचे** : शांताराम भास्कर; सुनीति प्रकाशन, पुणे ४; १९८७ रु २६ ▭ **मधुबन** मधुकर पु. पाराशन; सौ. मंदाकिनी पाराशर, औरंगाबाद; १९८७ रु. १५ ▭ **एक हुंदका यासाठी**; भगवान भोईर; स्वप्नील प्रकाशन, कल्याण; १९८६ रु. १५ ▭

पुष्पा लिमये

# ' चंद्रिका '–एक अभ्यास

## (प्रथमवर्ष इ. स. १८५४–१८५५)

एकोणिसावे शतक हा महाराष्ट्राच्या इतिहासातील महत्त्वाचा कालखंड. आधुनिक महाराष्ट्राच्या जडण-घडणीचा पाया याच कालखंडात घातला गेला. जीवनाच्या सर्वच क्षेत्रात या काळात एक अभूतपूर्व स्थित्यंतर घडून आले. त्या काळातील विविध प्रवृत्ती, विचार-प्रवाह, मतमतांतरे, श्रद्धा-समजुती–एकूणच समाजजीवन यांवद्दलची कितीतरी माहिती त्या काळातील मासिक-पुस्तकांतून दडलेली आहे. त्या काळात लिहिल्या गेलेल्या पुस्तकांपेक्षाही ही मासिक पुस्तके तत्कालीन समाजाचे अधिक प्रतिनिधित्व करणारी, अधिक बोलकी, अधिक जिवंत ! समाजहिताची जाण असणाऱ्या आणि त्या-बद्दल जागरूक असणाऱ्या, त्या काळातील सर्वसामान्यांचे मनोगत त्यातून प्रकटले आहे. त्या काळातील मासिकपुस्तके आजच्या तुलनेने संख्येने थोडी व त्यातील बहुसंख्य अल्पजीवी. पण त्यात विखुरलेले माहितीचे असंख्य छोटे छोटे कण त्या काळाबद्दलचे आपले ज्ञान अधिक स्पष्ट, अधिक सूक्ष्म, अधिक सम्यक व परिपूर्ण करावयास साहाय्यभूत ठरतात. त्याचीच अंशतः झलक म्हणून एकशे तेहतीस वर्षांपूर्वीच्या चंद्रिका मासिकाच्या प्रथम वर्षाचा मार्च १८५४ ते फेब्रुवारी १८५५ आढावा घेण्याचा एक प्रयत्न येथे केला आहे.

इंग्रजी राजवटीच्या मागोमाग ज्या नवीन गोष्टींचा एतद्देशीयांना परिचय होत गेला त्यांपैकी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे मुद्रणकला. आणि तिच्या पाठोपाठ एकोणिसाव्या शतकाच्या दुसऱ्या चरणात पाठ्यपुस्तकांवरोबर नियतकालिकांनाही आरंभ झाला. जानेवारी १८३२ मध्ये ' दर्पण ' हे पहिले मासिक सुरू झाले. जानेवारी १८३२ ते जानेवारी १८५४ या बावीस वर्षांच्या काळात सुमारे अकरावारा मासिकांना आरंभ झाला. मार्च १८५४ मध्ये त्यात ' चंद्रिका ' या आणखी एका नव्या मासिकाची भर पडली. अर्थातच तोपर्यंत ' चंद्रिके 'च्या आधी सुरू झालेल्या मासिकांपैकी बहुतेक मासिके त्यांच्या आरंभापासून चार-सहा वर्षांच्या वा त्याहीपेक्षा कमी कालावधीत निजधामाला गेली होती. जून १८४२ मध्ये सुरू झालेले अमेरिकन मराठी मिशनतर्फे निघणारे ' ज्ञानोदय ' आणि एप्रिल १८५० मध्ये आरंभ झालेले उपयुक्त ज्ञान प्रसारक सभेतर्फे निघणारे ' मराठी ज्ञानप्रसारक ' एवढीच फक्त इ. स. १८५४ पर्यंत टिकून होती.

इ. स. १८५४–५५ चा सुमार म्हणजे इंग्रजी राजवट येथे रुळू लागली होती, एतद्देशीयांच्या अंगवळणी पडू लागली होती असा काळ. नव्या राजवटीतील स्वास्थ्य, शिस्त, शांतता यांनी प्रजाजन भारावले होते. भौतिक विषयांचे ज्ञान देणाऱ्या शाळा उघडल्या जात होत्या. पण अजून विद्यापीठाची स्थापना झाली नव्हती. शिक्षणाने नवी जाग येऊ लागली होती. ज्ञानार्जनाची ओढ प्रबळ होत होती. आपल्या अधिकारांची जाणीव पुसटशी का होईना होऊ लागली होती. राज्यकर्त्यांच्या काही गोष्टी खटकत होत्या. पण सामोपचाराने त्या दूर होतील असा विश्वास वाटत होता. किंबहुना इंग्रजांच्या राज्यामुळेच प्रगतीच्या नव्या वाटा दिसू लागल्या, खुल्या झाल्या असा एक कृतज्ञ भाव सर्वसामान्यांच्या मनात वाटत होता असा हा कालखंड. त्याचे वेधक दर्शन काही अंशी ' चंद्रिके 'तूनही होते.

' चंद्रिका ' हे सौम्य शीतल प्रकाशाचे सूचक नाव मासिकांच्या जगात लोकप्रिय असावे.[१] इ. स. १८५४

१ मराठी नियतकालिक सूचीत ' चंद्रिका ' नावाची आणखीही नियतकालिके आढळतात. अश्विन शु. १०, शके १८०४, एप्रिल १९१५ आणि १९३१ मध्येही ' चंद्रिका ' नियतकालिक मासिक सुरू झाल्याची नोंद त्यात आहे.

मधील 'चंद्रिका' हे मासिक-पुस्तकाचे शीर्षक त्याच्या कर्त्यांना कदाचित त्यापूर्वीच सुरू झालेल्या व बंद पडलेल्या 'उपदेशचंद्रिका' (इ. स. १८४४) यावरून सुचले असण्याचा संभव आहे.

'चंद्रिका' या मराठी मासिकपुस्तकाच्या मुखपृष्ठावर त्या काळच्या रीतीप्रमाणे प्रथम इंग्रजीत व त्याखाली मराठीत शीर्षक दिले आहे. मासिककर्त्यांचे, संपादकांचे नाव कोठेही दिलेले नाही. नियतकालिक सूचीत प्रस्तुत मासिक 'सन्मार्गदर्शक मंडळींच्या छापखान्यात (मुंबई) छापले अशी नोंद आहे. प्रथम वर्षाच्या सर्वच अंकांवर तशी नोंद आहे. प्रत्यक्षात मात्र ऑक्टोबर १८५४ पासून वर्षअखेरपर्यंतच्या सर्वच अंकात "'चंद्रिका' हें पुस्तक 'चंद्रप्रकाश' छापखान्यांत छापत असतें. परंतु याचीं कवरें आधीं छापून ठेवली आहेत त्यामुळें त्यांवर 'सन्मार्गदर्शक मंडळीच्या छापखान्यात छापिलें' असें छापलें गेलें, तें व्यर्थ आहे." अशी सूचना शेवटी दिलेली आहे. 'कवरें पुष्कळ असल्यामुळें ती रद्द करवत नाहींत.' ही याबाबतीतील आपली अडचणही चंद्रिकाकारांनी वाचकांपुढे ठेवली आहे.

वर्गणीदारास प्रत्येक अंकास चार आणे व फुटकळ घेणारास 'साहा आणे' किंमत ठेवली आहे. प्रत्येक अंकांची पृष्ठसंख्या बत्तीस असून वर्ष अखेरपर्यंत सलग पृष्ठक्रमांक दिलेले आहेत. फक्त एप्रिल १८५४ च्या अंकातील पृष्ठसंख्या छत्तीस आहे.

पहिल्याच अंकात आरंभी उपोद्घात असून त्यात 'प्रतिमासी एक अति सुरस विषयांनी भरित पुस्तक काढण्यास' आरंभ केल्याचे जाहीर केले आहे. 'या पश्चिम हिंदुस्थानांत सुमारे २० स २५ स वर्षांपासून आपल्या प्रिय बंधुजनांचा ठाईं विद्यासंपादन करण्याची व तीस यथाशक्ती आश्रय देण्याची इच्छा झाली आहे ही साधारण संतोषाची गोष्ट नव्हे.' असा संतोष प्रकट करून "गेल्या वर्षापासून येथे दोन नवीन वर्तमानपत्रे[२] निघू लागलीं. आहेत; तर देशसुधारणुकीचा जो एक भाग त्यांणीं उचलला आहे त्याच रीतीचा दुसरा भाग उचलून आपले अति नम्र प्रयत्नांचे फल प्रियकर बांधवांस अर्पण करून आपल्या देशांतील अज्ञानग्रस्त लोकांस ज्ञानप्रभेंत आणण्याचें जें एक कार्य तें नेववेल तितकें सिद्धीस नेण्याची उमेद येऊन आम्ही पुढें सरलों आहों. तर ते (वाचक) आम्हांस उदार आश्रय देणार नाहीत की काय? (पृ. १)" असा मासिकपुस्तक काढण्यामागील आपला उद्देश व लोकाश्रयाबद्दल विश्वास व्यक्त केला आहे. नंतर हाच आशय थोड्याफार फरकाने आर्याबद्ध पद्यात मांडला आहे.

शेवटी 'ताजा कलम' असून त्यात 'या पुस्तकाच्या ३०० प्रती काढून आज वांटल्या आहेत, त्या एप्रिलच्या अखेर तारखेच्या आंत ज्या लोकांकडून आम्हाकडे परत येणार नाहीत ते आमचे वर्गणीदार आहेत असें समजून त्यांस प्रतिमासी हें पुस्तक पाठवण्यांत येईल' (पृ. ४) असे निवेदन आहे. त्याखाली तारीख आहे '३१ वी मार्च १८५४.' म्हणजे मार्चचा हा अंक प्रत्यक्षात कदाचित एप्रिलमध्ये निघालेला असणे अशक्य नाही.

वरील 'ताजा कलम' अनुसरून किती वर्गणीदार मिळाले हे कळावयास आज मार्ग नाही. पण वर्गणीदारांशी अशी जवळीक साधून त्यांच्या गळी पडणे याबद्दल 'प्रभाकर' मध्ये कोणा एकाने बहुधा बऱ्याच तीव्रपणे आपली नापसंती व्यक्त केलेली असावी; कारण 'चंद्रिके'च्या दुसऱ्याच अंकात चार पाने जास्तीची घालून 'चंद्रिकेविषयी प्रभाकरांतील पत्र' या शीर्षकाखाली त्याला रोखठोक पण संयमित शब्दात जबाब दिलेला दिसतो.

'चंद्रिका'कर्ते म्हणतात ...आम्हीं लोकांस तसदी दिली हें खरें आहे. त्याचकरितां आम्ही आपल्या चिठींत, आमचे अंक परत पाठविणारांची क्षमा मागितली होती. (याचा) विचार आमच्या सुज्ञ वाचणारांनीं करावा...आम्ही 'पोट भरण्याकरितां हा धंदा काढला असें ह्यानें लिहिलें आहे तर ह्यात आम्हांस किमपि दोष दिसत नाहीं. विचार करून पाहिलें असतां बहुतेक पत्रकर्त्यांचा धंदा तदर्थच आहे हें त्यांच्या लक्षांत येईल. परंतु इतर पोटाच्या धंद्यांपेक्षा हा पोटाचा धंदा बरा; कारण असल्या धंद्यापासून कधींतरी आपल्या देशाचें हित होईल अशी आशा असते. आणखी या गृहस्थानें दुर्भाषणाचा बराच उपयोग केला आहे. त्याविषयीं आम्ही लिहिणार नाहीं असें आम्हीं आपल्या प्रथम अंकात सुचविलेंच आहे.' (पृ. ६५–६६) चोख उत्तर देतानाही 'चंद्रिका'कर्त्यांनी स्वतःच स्वतःला घालून घेतलेली ही मर्यादाही लक्षणीय!

---

२. वर्तमानदीपिका व धुमकेतु.

पाचव्या अंकाच्या–जुलै १८५४–मलपृष्ठावर 'ज्यास हें पुस्तक पाहिजे असेल त्यांनी "वर्तमानदीपिकेच्या हापिसात चंद्रिकेचे कर्ते यांस प्रविष्ट कीजे" असा पत्ता लिहावा; असे सांगून 'तें पत्र हशील भरून पाठवावें नाहींपेक्षा घेतलें जाणार नाहीं' असेही खणखणीत बजावले आहे. यावरोबरच 'आम्हांस कोणी नीतिपर कविता व चांगले विषय लिहून पाठवल्यास ते आभारपूर्वक मान्य करुन आपले पुस्तकांत दाखल करूं' असे लेखनसाह्यावद्दल आवाहनही केले आहे. याच अंकात मुखपृष्ठाच्या मागील पानावर अनुक्रमणिका दिली आहे. प्रथम वर्षाच्या अन्य अंकात मात्र मलपृष्ठे प्राय: कोरी आहेत. 'कवरें आधींच छापून ठेवलेलीं' हेही त्याचे कारण असू शकेल. वर्गणीदारांच्या नावासहीत त्यांच्या वर्गणीची पोच, वर्गणी पाठविण्यावद्दल विनंती, मासिक पुस्तकाचे उद्दिष्ट यांसाठी मलपृष्ठांचा उपयोग नंतरच्या काळात प्राय: सरसकट केलेला दिसतो. तसा येथे केलेला आढळत नाही.

'चंद्रिके' च्या पहिल्या अंकातील लेखविषय पुढीलप्रमाणे आहेत. 'प्राचीन लोकांच्या समजुतीवर विचार,' त्याचाच परत पद्य अनुवाद, 'खरी सुधारणा,' 'नेटिव लोकांस अब्रूच्या व जबाबदारीच्या जागा द्याव्या किंवा नाही ?' 'मुसलमान व मराठे ह्यांच्या कारकीर्दीत प्रजेस जीं सुखदु:खें होत असत व इंग्रजांच्या कारकिर्दीत होत आहेत त्यांमध्यें फेर', 'सर विलियम जोन्स याचें चरित्र.' दुसऱ्या अंकात अशा वैचारिक लेखांच्या जोडीला 'मराठ्यांचा पद्यरूप इतिहास', 'विचारसार' हे स्वतंत्र नाटक यांना आरंभ झाला. सहाव्या अंकात 'ऋणनिषेधबोधक कविता,' 'शास्त्रीय विषय,' 'शकुंतला' हे भाषांतरित नाटक यांचा समावेश झालेला दिसतो. आठव्या अंकात याच्याच जोडीला 'सामान्यत: लोकांची गोष्टी वाचण्याविषयीं जशी अभिरुची असते तशी इतर गहन विषय वाचण्याविषयीं नसते. याकरितां सर्व लोकांचे ठाई वाचण्याची रुची उत्पन्न व्हावी, व त्यास नीतिपर उपदेश होऊन त्या योगानें त्यांनीं सदाचरण संपन्न व्हावें, या उद्देशानें मनोरंजक असून नीतिपर अशा काही गोष्टी घालण्यास कित्येक विद्वानांनी आम्हांस सुचविलें आहे', (पृ. २३३) असे निवेदन करून 'नीतिपर कादंबरी'ला आरंभ केला आहे. नवव्या अंकात 'लिहिण्याची काळी शाई' हिच्यावद्दल तयार करण्याच्या कृतीसह माहिती दिली आहे. अकराव्या अंकात 'कार्ले येथील देवळावरील प्राचीन लेख वगैरे' मराठी इंग्रजी अनुवादासह मुळातून दिले आहेत. बाराव्या अंकात 'चातुर्य' या मनोरंजक कादंबरीला सुरुवात केली आहे. वर्षभराच्या कालावधीत 'चंद्रिके' चे स्वरूप असे थोडे थोडे वदलत गेलेले दिसते, त्यात वैविध्य येऊ लागले.

'चंद्रिके' चे मूळ उद्दिष्ट ज्ञानप्रसारण. हळूहळू त्यात मनोरंजनही समाविष्ट झाले. अर्थात ते मनोरंजनही घटकाभर निखळ करमणूक असे विनोदमहदाख्यायिका वळणाचे नाही. त्यातही सदाचरणाचा संस्कार वाचकमनावर उमटविणे हा हेतू आहेच.

इंग्रज, त्यांची राजवट, त्यांच्या संपर्काने एतद्देशीयांना नव्याने होऊ लागलेली स्वस्थितीची जाणीव एतदसंवद्ध विषय हे त्या काळातले महत्त्वाचे चर्चाविषय. 'चंद्रिके' तील अनेक लेखांचा ते विषय झालेले दिसतात. वर उल्लेखिलेले प्रथमांकातील विषय, त्यांशिवाय 'देशाची उत्तम स्थिती' (अंक २), 'हिंदू लोकांस सूचना' (अं. ३, ४), 'राज्यक्रांति' (अं. ४), 'राजसत्ताक व लोकमतानुसारी राज्यातील सौकर्याविषयीं विचार' (अं. ५), 'ज्ञान संपादण्याविषयीं दृढ निश्चय' (अं. ५, ६), 'स्वदेशीय व परदेशीय लोकांच्या स्थितिविषयीं विचार' (अं. ९) ही सारी लेखशीर्षके त्याची निदर्शक म्हणता येतील. या लेखांचा सूर सामान्यत: इंग्रज राजवटीला अनुकूल आहे. उदा. 'प्राचीन लोकांचे समजुतीवर विचार' (अं. १) यात लेखक म्हणतो, 'सर्व लोकांची अशी समजूत पडून गेली आहे की, इंग्रजी राज्य झाल्यापासून लहानापासून थोरापर्यंत सर्व लोक दरिद्री झाले, पाऊस गेला, जमीन बरावर पिकेनाशी झाली. अशा तऱ्हेच्या गोष्टी ऐकून आम्हांस फार वाईट वाटते,...देश संपन्न होण्यास उपयुक्त विद्या, व्यापार, यंत्रें व कलाकौशल्य यांची फार वृद्धि झाली पाहिजे; लोकांनीं आळस व मानीव प्रतिष्ठा सोडून एकमतें वागण्याचा केवळ विडाच उचलला पाहिजे' (पृ. ५) या पत्रलेखकावर लोकहितवादींच्या शतपत्रांचा प्रभाव असावा असे हा लेख वाचत असताना अनेकदा जाणवत राहते. 'राज्यक्रान्ति' (अं. ४) यातही अशाच वळणाचा पुढील अभिप्राय व्यक्त झाला आहे. 'पुढें...मराठ्यांचें राज्य जाऊन इंग्रजांचें राज्य

झालें, ही गोष्ट फार वाईट झाली असें आरंभीं सर्वांचें मत होतें, परंतु उत्तरोत्तर ह्या राजसमंधाने वास्तविक सुखाचा अनुभव होऊ लागला तेव्हां हे विचार मनातून जाऊं लागले, बहुतेक अंशीं हें राज्य चांगलें असें विचारी पुरुष कबूल करितील'. (पृ. ११२–११३).

पण यावरोबरच स्वाभिमान, अस्मिता अंकुरित होऊ लागली होती याचेही दर्शन 'चंद्रिके'तील लेखांतून होते. भवानी विश्वनाथ यांनी मुळात एका सभेपुढे वाचलेला निबंध–'नेटिव लोकांस अब्रूच्या व जबाबदारीच्या जागा द्याव्या किंवा नाहीं (पृ. १८–२४) चंद्रिकेच्या पहिल्याच अंकात छापला आहे. त्यात आरंभींच निःसंदिग्ध शब्दांत 'हिंदुस्थानांतील लोकांस' अशा जागा द्याव्या असे आपले मत व्यक्त केले आहे.

याच लेखात हिंदुस्थानातील लोक पुरे विद्वान नाहींत या आक्षेपाचे खंडनासाठी 'मुंबईतील एलफिनिस्टन विद्यालयांतील अभ्यास इंग्लंडांतील विद्यासमूहालयांतल्या अभ्यासाइतका लिहिलेला आहे' असे मेजर हाग यांच्या हिंदुस्थानविषयक पुस्तकात वाचल्याचा हवाला देऊन पगाराने हलके असणारे नेटिव त्यांच्या तिप्पट पगार मिळविणाऱ्या युरोपियनांच्या तोडीचे काम करतात. इतकेच नव्हे तर 'सर्व हापिसात फार अवघड कामें नेटिव लोकच करतात' असे लेखकाने नमूद केले आहे.

काही नेटिव चोख काम करीत नाहीत हे मान्य करून लेखकाने त्याची कारणमीमांसाही केली आहे. या संदर्भात 'शिफारसपत्राने एक फार घाण करून टाकली आहे.' 'वशिला आहे तेथे सर्व आहे' ही म्हण मुंबईत नेटिव लोकांमध्यें अगदी साधारण होऊन गेली आहे... फाकलंड साहेबासारख्या मोठमोठ्यांच्या केवळ वशिल्यानेंच मूर्ख मनुष्यास चांगली जागा मिळते असें हमेशा घडतें. हे शिफारसीनें लागलेले मनुष्य आपल्या अल्पविद्येमुळें अपक्व–बुद्धीमुळें आपलें काम चालविण्यास कच्चे असतात...हा दोष नेटिवांचा नाही, तर निवड करणारांचा आहे' असे ठणकावून सांगावयालाही कमी केलेले नाही.

नेटिव लोक लाच खातात, खोटा पक्ष घेतात या त्यांच्यावरील आक्षेपाबद्दल लेखक म्हणतो, 'गौरकायांमध्यें लाचखाऊ असतां नेटिव लाचखाऊ आहेत असे म्हणणें व याच कारणावरून त्यास जबाबदारीच्या जागा न देणें म्हणजे शुद्ध अन्याय आहे. गोऱ्यांच्या गैरवर्तणुकीविषयीं आमच्या वाचण्यात हमेशा येत असते किंबहुना नेटिव लोकांच्या गैरवर्तणुकीपेक्षां अधिक म्हटल्यास चिंता नाही.' यावरोबरच लाच न घेणारे नेटिवही पुष्कळ आहेत हेही सांगितले आहे.

नेटिव या देशाचे रहिवासी म्हणून त्यांचा तेथील कामांवर अधिक हक्क म्हणून नोकऱ्यात त्यांचें प्रमाण व पगारही वाढवावेत आणि वरिष्ठ जागा त्यांना द्याव्यात अशी निबंधलेखकाने सूचनाही केली आहे.

'शिक्षणपद्धतीवर विचार' (पृ. ३३–३८) या लेखातही (अं. २) सरकारी नोकरीत काळेगोरे यात भेद केला जातो याबद्दल तक्रार केलेली दिसते. लेखकर्ता म्हणतो, 'शिक्षकांत काळ्या व गोऱ्या कातड्यावर लक्ष न देता केवळ विद्येवरच लक्ष देऊन, पगारांत फेरफार नसावा. हल्लीं किती एक शाळेवरील गोरे लोक शिक्षक असल्यामुळें त्यांस पगार अधिक व काळ्यांस कमी.. विद्येकडे पाहिलें असतां कांहीं उदाहरणें अशी आढळतात कीं काळे लोक चांगले.'

'चंद्रिके'च्या तिसऱ्याच अंकात 'गोऱ्या लोकांचा काळेपणा' (पृ. ७४ ते ७९) असा लेख शीर्षकांप्रमाणेच रोखठोक विचार तितक्याच सडेतोडपणे मांडणारा एक लेख आला आहे. 'गोऱ्या लोकांचीं सर्व कृत्यें गोरींच आहेत असें कित्येक आमचे लोक मानीत असतात, असें आमच्या अनुभवास आलें आहे; व कित्येक प्रसंगीं आम्ही ज्यांची स्तुती करितो आणि आपल्या लोकांस नांवें देतो, यांवरून आम्हांविषयीं कित्येकांचें असेंच मत असेल तर त्यास आमचें मत काय आहे हें कळविण्याकरता' लेखकाने हा 'विषय' लिहिला आहे. 'हेलिबरी विद्यालयात नावाला दोन वर्षे राहून मोठासा वशेला अगर पिशवीचें तोंड मोकळें करून हिंदुस्थानांतल्या जागांकरितां सनद मिळवून' आलेल्या गौरकायांबद्दलचा हा लेख आहे. हाल्ली त्यांच्या रीताभातींवर दीर्घ सहवासजन्य वास्तविक ज्ञानसूर्याचे स्वच्छ किरण पडून त्या वरच्या गोरेपणानें न झांकल्या जातां त्यांचा काळीमा नजरेस येतो तो काढून टाकण्याविषयीं आमच्या गौरकाय बंधूंनीं चांगलें लक्ष लावावें हें त्यास योग्य आहे' असा सल्ला देऊन, 'कित्येक साहेब लोक एकदा शपत घेऊन अधिकारपदावर आले म्हणजे, तघलख बादशाहाप्रमाणें पूर्वी ओतलेल्या पिशव्या कोणत्या रीतीनें लवकर भरतील इकडे आपलें लक्ष लावितात...' असे सांगून साहेबांचा काही

वेळ 'टिफीन' घेण्यात जातो, काही वेळ विश्रांती घेण्यात जातो, बिचाऱ्या नेटिवांनीं मात्र कसेंही करून तरफडत १० वाजता कचेरीत यावे, परंतु साहेबांचे १०, साहेब आल्याखेरीज वाजत नाहींत. हा कोणत्या रीतीचा न्याय?' असा प्रश्न करून इंग्रजांच्या न्यायप्रियतेला चांगलाच टोला दिला आहे. या लेखाची एकूणच भाषा प्रौढ व उपरोधप्रचूर आहे.

गौरकायांच्या अशा वर्तनाबद्दल एकतर नेटिव तक्रार करू शकत नाहीत, त्यांना तेवढे 'धैर्य', 'अगत्य' व 'माहीतगारी' नाही व दुसरे म्हणजे तक्रार केली तरी चौकशी करणारे गौरकायच, ते साहेबाबद्दल सहानुभूती बाळगणारे, त्यामुळे तक्रारींचा उपयोग होत नाही. गौरकायांचा हा काळेपणा उघड केल्यावर, सरकारचा वसूल वाढून लोकांसही संतोष व्हावा यासाठी 'एथील जाग्याविषयीं पाहिजे त्यानें परीक्षा द्यावी आणि तींत पसंत झालेल्यास त्या द्याव्या असें झालें असतां...केवळ पोटभरू साहेब लोक येऊन रंगाच्या जोरानें पाहिजे तसा अम्मल चालवितात तसेंही होणार नाहीं... आणि सरकारच्या बाह्यात्कारी बोलणें व त्याची कृति यात फार तफावत न राहता काळिमा निघून जाईल,' अशी विधायक सूचनाही शेवटी केली आहे. येथे एक लक्षात घेण्यासारखे आहे की इंग्रजी राज्यात एतद्देशीयांना समान वागणूक मिळावी म्हणून आग्रह आहे, पण इंग्रजी राज्य संपावे, इंग्रजांनी निघून जावे असा सूर कोठे आढळत नाही.

याच अंकात 'हिंदू लोकांस सूचना' यातही 'हे युरोपियन लोक आपणांस कसें नीचासारिखें वागवितात हें मनात आणा, आणि उठा, कंबर बांधून झराझर एकाएका कृत्यास हात घाला.' (पृ. ९७) असे लेखकाने आवेशपूर्ण शब्दांत सांगितले आहे. याच लेखात पुढे (अ. ४) लेखकाने 'अतिशुद्रांचा व आपला धर्म एक, देश एक, तेव्हा ते ह्या साहेबांपेक्षा व यवनांपेक्षा आपणास आलीकडचे (जवळचे?) आहेत. परंतु लोक त्यांचा स्पर्श झाला असतां मात्र स्नान करीतात' (पृ. १११) हा हिंदूंच्या वर्तनातील विसंवादाबद्दल मांडलेला पुरोगामी विचार लक्षणीय आहे.

'स्वदेशीय व परदेशीय लोकांच्या स्थितीविषयी विचार' (अं. ९) हाही काहीसा याच वळणाचा लेख आहे.

पाचव्या अंकात 'राजसत्ताक व लोकमतानुसारी राज्यांतील सौकर्याविषयीं विचार' आलेला आहे. लेखकाला इंग्लंडच्या राज्यपद्धतीचा परिचय आहे. लोकमतनुसारी राज्याबद्दल लेखकाने अनुकूल मत दिले आहे. पण 'आता तेथें (इंग्लंडमध्ये) राजा नेमण्याची जीं चाल आहे ती मात्र आम्हांस प्रशस्त वाटत नाही ती अशी जें वडील अपत्य असेल त्यास राज्य मिळतें. मग मुलगा असो किंवा मुलगी असो. आम्हांस असे वाटते की, स्त्रिया स्वभावत: पुरुषापेक्षां खालच्या पायरीच्या आहेत; तर तिला मुख्य करून तिच्या पतीनें व सर्व विद्वान मुत्सद्दी इत्यादिकांनीं नम्रतेनें वागावें हें अगदी अयोग्य होय. तस्मात राज्याधिकार पुरुषासच योग्य होय.' (पृ. १३८) असा स्वत:चा छोटासा मतभेदही कारणासहित नोंदविला आहे. म्हणजे विरोध राजाच्या नेमणुकीबद्दल नाही तर राजपदी स्त्रीला नियुक्त करण्याबद्दल आहे. राजकीय क्षेत्रात सुधारणा मान्य असली तरी सामाजिक क्षेत्रात सनातनी, परंपराप्राप्त विचारांची पकड किती घट्ट होती याचेच हे उदाहरण!

ह्या राजकीय, सामाजिक विषयांवरील लेखांच्या जोडीला भौतिकविषयांसंबंधी वाचकांचे ज्ञान वाढावे, त्यांच्या माहितीत भर पडावी असे 'टर्की देशांतील सांटिरिनी एथील भूकंप' (अं. ४), 'लिस्बन एथील भूकंप' (अं. ८), 'जेम्स वाट याने केलेला वाफेच्या यंत्रांचा शोध व त्याची सुधारणा' (अं. ८, ९, १०, १२), 'समुद्रांतील ओघ' (अं. १२), शनि गोलकावरील राहणारांस सूर्यग्रहण कसें दिसावें? (अं. ६, ७ ८, ९, १०) इ. लेख आलेले आहेत.

'चंद्रिके'च्या अं. २, ३, ४, ५ आणि ११ मधून 'विचारसार' या नाटकाचे अंक आलेले असून अंक ११ पृ. ३५१ यावर 'हें नाटक पुढें चालेल' अशी सूचनाही दिलेली आढळते.

नाटकाच्या आरंभी (अं. २, पृ. ५७) 'मराठी भाषेंत नाटकाचा अगदी अभाव असल्यावरून, आम्ही हें नाटक यथामति रचून विद्वज्जनांच्या नयनगोचर करण्याचा उद्देश चालविला आहे. ह्या क्रमास आम्ही हा पहिल्यानेंच हात घातला आहे. त्या करिता आमचे बंधुजन चुक्यांची आम्हांस क्षमा करतील असें आम्हीं इच्छितो' असे वगैरे निवेदन आहे.

इ. स. १८५१ मध्ये 'प्रबोध चंद्रोदय' ह्या संस्कृत

नाटकाचे मराठीत रूपांतर झाले. प्रस्तुत नाटकाचा कर्ताही त्याने प्रभावित झाला असावा. 'विचारसार' या स्वतंत्र मराठी नाटकातही 'प्रबोधचंद्रोदय' प्रमाणेच रूपकाचा आश्रय केलेला आहे.

'मोह' हा राजा, 'विमति' त्याची भार्या, 'अळस' व 'अंदाधुंदी' ही त्यांची अपत्ये. 'अहंकार' प्रधान तर 'विषय सेनापती,' 'विचार' हा राजाचा शत्रू 'सुमती' ही त्याची पत्नी, 'शांति' आणि 'एकी' या त्याच्या मुली. नाटकातील पात्रांची ही नावेही मोठी सूचक आहेत.

विचाराच्या देशांतर करण्याच्या बेताने सुमती मूर्च्छित होते, तेव्हा विचार तिला समजावितो की, 'एथे (हिंदुस्थानात) राहाण्यात आपली बूज नाही. त्यांचे कल्याण नाही, आणि उलट मनाला खेद मात्र. तर यांचे कल्याण करण्याचा आपला हेतू, अन्य देशांतील लोकांकडून यांचे डोळे उघडल्याशिवाय सिद्ध होत नाही.' (अं. २; पृ. ६४)

देशत्यागाच्या वेळी शांती म्हणते, 'हा आपला देश उत्तम दशेस आलेला व एथील लोक आपल्या आश्रयाने वागणारे असे पुनः पाहण्याचा प्रसंग आपणास येईल काय ?' त्यावर तिची आई सुमती उत्तरते, 'कालांतरेंकरून कधीं होईल तेव्हां होईल, होणार नाहीं असें माझ्यानें म्हणवत नाहीं.' (अं. ४, पृ. १२२)

देशांतराला निघालेल्या विचाराचा पाय आफ्रिकेला लागू नये म्हणून आफ्रिकेतील रानटी लोक मोह राजाचे आज्ञेवरून विचाराच्या प्रतिकारार्थ किनाऱ्यावर गोळा होतात. त्यांना पाहून विचार मोठ्या दुःखाने म्हणतो, 'आपल्या देशापेक्षा ह्या देशांत शत्रूचा मोठा जबरदस्त अंमल आहे असें दिसतें.' ह्यावर सुमती म्हणते 'ह्या पृथ्वीच्या पृष्ठभागावर ह्याप्रमाणें बहुत ठिकाणीं त्यांचा अंमल असावा' (अं. ४, पृ. १३०-३१).

तर दुसरीकडे 'मोह' राजाला त्याचा सेनापती 'विषय' आपल्या राज्याच्या बंदोबस्ताबद्दल माहिती देत असतो,-

'भूपालादिक सर्वहि वर्तति अवलंबूनी मला सतत ।
बैठकि नाच तमाशे ह्या माजी निशीदिनी,
आहेत रत ॥ १ ॥
ह्या वाचुनि दिन एकहि गेला तरि म्हणति,
धिक् जिणे अमुचे ।
सर्वस्वी नागवुनी कांहीं बनतीहि दास वेश्यांचे ॥ २ ॥
स्वस्त्री सुरूप सोडुनि मानिति वेश्या कुरूप ही बरवी ।
देती सर्वस्व तिला माझी सत्ता अशीहि समजावी'
(अं. ५, पृ. १५०)

आफ्रिकेत उतरता येणार नाही हे पाहून कल्पना नामक गलबताचा धनी विश्वास विचारास म्हणतो, 'मला असें वाटतें कीं आपण आता थेट युरोपचा रस्ता धरावा, हें बरें; तेथें जरी तुमचें शत्रू मोह, अळस इत्यादिकांचा आजतागाईत अंमल होता व अजूनही बराच आहे तरी तेथील लोक याचा आलीकडे तिरस्कार करू लागले आहेत व यांचें अनीतिमय व जुलमी राज्य त्यांस आवडत नाहीसें झालें आहे, असें माझा तेथील मित्र उद्योग याने मला लिहून पाठविलें होतें... माझा जिवलग मित्र उद्योग यानें तेथें एक बंड केलें आहे.' (अं. ११ पृ. ३३६)

वरील उताऱ्यांवरून भारतातील एतद्देशीय सत्ताधाऱ्यांचा आळशीपणा, निष्क्रियता, विषयांधता, त्यामुळे निर्माण झालेली अंदाधुंदी, विचारविवेक यांची फारकत या साऱ्याचा फायदा घेऊन ब्रिटिश राजवटीचे येथे झालेले आगमन, थोडक्यात येथे घडून आलेल्या राज्यक्रांतीची कारणमीमांसा या रूपकात्मक नाटकातून वाचकांपर्यंत पोचवायचा प्रयत्न त्याच्या लेखकाने केला असावा असे या नाटकाच्या तीन अंकातील 'चंद्रिके'च्या प्रथम वर्षात प्रसिद्ध झालेल्या कथाभागावरून वाटते. नाटककाराला युरोप, आफ्रिकेचा इतिहास-भूगोलही ज्ञात असावा. नाटकातील घटना केवळ भारतातच घडत नाहीत तर आफ्रिका-युरोप या अन्य खंडाचाही त्यात समावेश.

नाटककाराने हे नाटक केवळ वाचकांसाठी लिहिले की त्याला या नाटकाचा प्रयोगही अपेक्षित होता असा एक प्रश्न नाटक वाचताना मनात डोकावतो. 'पडदा पडून कांहीं वेळानें पुन्हां उघडतो' 'सर्व निघून जातात (अं ११ पृ. ३५०-५१), 'कचेरी बरखास्त होते आणि पडदा पडतो' (अं. ५, पृ. १५२) अशा सूचना आढळतात त्याप्रमाणेच 'मागे चित्र दाखविलें आहे. तशापैकीं कांहीं वऱ्हाडी व... वऱ्हाडणी जमून लग्नाचा जो समा-

रंभ झाला तो केवळ अपूर्वच होय !...सारांश रानटी-पणाची (मोह राजाचा आफ्रिकेतील कारभारी) मुलगी आकावाई हिचे आळसाशी लग्न, मग तिथें कोणतें कमी पडणार आहे !!' (अं. ११, पृ. ३५०) अशी कंसस्थ निवेदने अनेकदा येतात. ही कंसस्थ निवेदने सूत्रधाराने करणे अपेक्षित ? नाटकारंभी कथावस्तूला सूचक असे सूत्रधाराचे विषयप्रवेशात्मक निवेदन आहे. पण इतरत्र सूत्रधाराचा उल्लेख आलेला नाही.

रचनेत काहीसा ढिसाळपणा आहे, क्वचित पुनरावृत्तीही आहे. संस्कृत नाटकांप्रमाणें पद्ययोजनाही आहे. नाटक या नात्याने त्याचे मूल्यमापन करताना 'या नाटकाचे कथानक सूत्रावरून या तीन अंकी (?) नाटकाची रचना किती सामान्य असेल याची कल्पना येईल.' असा अभिप्राय वि. वि. पटवर्धन यांनी (मराठी वाङ्मयाचा इतिहास, संपा. रा. श्री. जोग, खंड ४, आ. २, पृ. ४१७) नमूद केला आहे. नाटक म्हणून 'विचारसार' सामान्य असले तरी नाटकाच्या माध्यमातून वाचकांना आपल्या देशकालस्थितीचे ज्ञान करून देण्याचा हा प्रयत्न लक्षणीय आहे. 'चंद्रिका'कर्त्यांच्या उद्दिष्टाशी सुसंवादी आहे. त्या काळात अनेक अंगांनी घडून येत असलेल्या प्रबोधनाचीच ही एक छोटीशी खूण म्हणता येईल.

नाटकाप्रमाणेच सुमारे तेवीस पृष्ठांची एक स्वतंत्र कादंबरीही 'चंद्रिके'च्या अं. ८ व ९ मधून प्रसिद्ध झालेली दिसते. 'नीतिपर कादंबरी' असेच तिचे शीर्षक आहे. पुढील काळातील आरंभीच्या कादंबऱ्यातून आढळणारी ताटातूट, वियोग, योगायोग, दुष्टांस शासन व सज्जनांचे रक्षण हे सारे या छोटेखानी कादंबरीतही आहे. मात्र यातील संकटे दैवी, अद्‌भूत वाटावीत अशी नाहीत, यातील प्रमुख व्यक्तिरेखाही तत्कालीन समाजाच्या सर्वसामान्य स्तरातील आहेत हे या कादंबरीचे लक्षणीय विशेष म्हणावे लागतील.

जनार्दन व शंकर हे जिवलग मित्र 'मोठमोठ्या शहरांतील शाळांविषयीं वर्तमानपत्रांत' वाचल्यामुळे चंद्रपूर शहरात विद्याभ्यासार्थ जातात. विद्या पूर्ण झाल्यावर जनार्दनास एका श्रीमान गृहस्थाने 'अति सुरूप व गुणानें फारच चांगली' अशी आपली मुलगी दिली. शंकररावांस शंभर रुपयांचा रोजगार लागल्यामुळे तिघेही त्या रोजगाराच्या गावी जाण्यास निघतात. तरुण स्त्री बघून दोन लुच्चे छिचोर त्यांच्या मागे जातात आणि त्यांना फसवून त्या तिघांची एकमेकांशी ताटातूट करतात, व त्या स्त्रीला पळवून नेतात. पुढे तिची सुटका होते व तिघांची भेट होते. पण इथे कथानक संपत नाही. मागचे लवाड लोक त्यांच्या पाळतीवरच असतात. नावाड्याला फितवून नाव बुडवून ते परत त्या तिघांची ताटातूट घडवून आणतात व पुन्हा एकदा त्या स्त्रीला पळवतात. पुढें तिच्या युक्तीने लुच्च्यांना शासन होतें आणि सर्वजण एकत्र येऊन आनंदी आनंद होतो. या कादंबरीत गद्याबरोबर पद्याचाही समावेश आहे. शेवटी क्रमवार 'या कथेची तात्पर्ये' दिली आहेत. बाराव्या अंकातही 'मनोरंजक कादंबरी चातुर्य' हिला आरंभ झाला आहे.

त्या काळात कथा व कादंबरी यांची सरहद्द निश्चित ठरलेली नव्हती. 'चंद्रिकां'कर्ते या गोष्टींना केवळ कथा म्हणून न संबोधता 'कादंबरी' म्हणत आहेत. तेव्हा कादंबरी ही कथेपेक्षा-गोष्टीपेक्षा काही वेगळा प्रकार याची त्यांना बहुधा अगदी स्पष्ट नसली तरी पुसटशी तरी जाण असावी. कादंबरी वाङ्मयाचा आरंभ सामान्यतः यमुनापर्यटन वा मुक्तमाला, मधुघोषा यांच्यापासून मानण्याचा प्रघात आहे. पण त्यापूर्वीच नियतकालिकातून 'कादंबरी' हा साहित्यप्रकार भाषांतरीत नव्हे तर स्वतंत्रपणे हाताळण्याचा असा प्रयत्न होऊ लागलेला दिसतो. अर्थात, ह्या गोष्टीवजा कादंबऱ्या कादंबरी—लेखनाचे दृष्टीने अगदी प्राथमिक असल्या तरी नवे साहित्यप्रकार मराठीत येऊ लागल्याच्या त्या खुणा आहेत.

वैचारिक निबंध, वर्णनपर निबंध, नाटक, कादंबरी यांबरोबरच पहिल्या अंकापासूनच पद्यालाही 'चंद्रिके'त स्थान मिळाले आहे. पहिल्या अंकात प्रस्तुत 'पुस्तक काढण्याचा हेतु' जसा परत पद्यात निवेदिले आहे, तसा 'खरी सुधारणा' या गद्य लेखाचाही पद्य-अनुवाद दिला आहे. पुढे हा प्रकार आढळत नाही, पण एकूणात पद्याचा ओढा गद्याची सुविधा उपलब्ध होऊनही जनमानसात कायम असलेला दिसतो. दुसऱ्याच अंकात 'मराठ्यांचा इतिहास' पद्यात दिलेला आहे. तो पद्यात देण्याचे कारणही त्याच्या प्रास्ताविकात 'साधारण लोकांस गद्य वाचण्यापेक्षां कविता वाचावयास विशेष चमत्कार वाटतो. गद्यरूपानें विस्तीर्ण लिहिलेल्या गोष्टीपेक्षा पद्यरूपानें संक्षिप्त लिहिलेल्या मजकुराची स्मृति अल्पाया-

सांनीं चांगली राहते' असें नमूद केले आहे.

इंग्रजी राज्य हा गद्याप्रमाणे पद्याचाही विषय झाला आहे.

'राज्य इंग्रजांचे झाले । कलाकौशल्य ऊदेले ॥ १ ॥
खऱ्यां विद्येचा प्रसार । झाला विस्तृत व्यापार ॥ २ ॥
अंदाधुंदी जबरदस्ती । ह्यांनीं सोडीली ही वस्ती ॥ ३ ॥
गाडी अगेची चालत । पाहतां सर्वही चकित ॥ १० ॥
आगवोट हातां आली । समुद्राची नदी झाली ॥ १२ ॥

असे इंग्रजी राज्याचे गोडवे गात—

काही न्यायामाजी दोष । पक्षपात आणि वेष (द्वेष ?)
ह्यांनीं कलंक लावीला । सर्व स्तुत्यची कृत्याला ॥ १७ ॥
राज्य नीतीनें चालत । ऐसें पुस्तकीं छापीत
करा खरा तोची लेख । म्हणती सन्मार्गदर्शक ॥ १९ ॥
(अं. ७, पृ. ११९–२०)

असे बजावायलाही कमी केलेले नाही.

अंक पाचमध्येही इंग्रजी राजवटीने प्रभावित झालेल्या कोणा कवीची 'स्फुट कविता' प्रसिद्ध झाली आहे, अंक दहामध्ये—

'होता इंग्लिश राज्य नीचही आले उदयास ।
नाही जुलूमजासती उगवले ज्ञानाचे दिवस ॥ १ ॥
मुसलमान पेंढारि लुटारू गेले विलयास ।
त्यांनि दिलेली दुःखें माहित असतील सर्वांस ॥ २ ॥
जाउनि जुलमी दुष्टकाळ तो न्याय उभा ठेला ।
व्हा तरुणांनो पुढती आतां स्तुत्य कृत्याला ...
शाळा स्थापावयास देतिल आश्रय जे सबळ
दिक्पालकही गातिल त्यांची कीर्ती चिरकाळ ॥
पारसिकांनी उदार हस्तें कृत्यें जीं केलीं ।
पाहुनिया तो नमुना जागृत व्हा तरि ह्याकाळीं ।
(पृ. ३२२–३२३)

अशी 'उत्तेजक सूचना' 'सन्मार्गदर्शकांनी' विनम्रपणे केलेली आहे.

इंग्रजी राज्याप्रमाणेच 'स्त्रीशिक्षण' 'स्त्रियांस वागविणे' हेही कविताचे विपय झाले आहेत. अंक आठमध्ये गीति, साकी, अभंग, गीत अशा विविध पद्यप्रकारातून एतद्विषयक 'स्फुट कविता' आल्या आहेत. त्याचे काही नमुने—

'करुनि श्रम बहुतापरि विद्यारस कन्यकांसि पाजाया,
शाळा स्थापित केल्या युक्तिवृद्ध्यर्थं,

काही योजा या ॥ १ ॥......
म्हणती शिखतां विद्या व्यभिचारादिक अनर्थ पावतिल ।
वृद्धी, परि हें खोटें उगवति गोधूम पेरिता न तिल ॥३॥
श्रम साधनाने विद्या शेत केले ।
धान्य त्यास आले गुणरूप ॥ १ ॥
आहेत जा स्त्रीया विद्येंत निपूण ।
शोभती सद्गुण त्यांचे ठांई ॥ २ ॥
स्त्रियास सर्वदा नीच मानू नका हो ।
तयांलागि काही नसे न्यूनता हो...
पती कोपता सर्व तैंसेचि होती ।
नसे सुख त्या फार होती विपत्ति
अशा यातना भोगुनी जीव देती ।
कितीक स्त्रिया लाज सोडून जाती
पाहि जरि स्त्री सहजस्वभावें ।
पराकडे, त्या क्षणि रुष्ट व्हावें;
हें सर्वथा युक्त नसे पतीशी ।
जो सर्वदा लंपट जारिणीशीं...'

हे सांगून स्त्रियांशी वागताना— 'पशू नव्हत अंगना मनुज, हेंचि चित्ती धरा' विचार बरवा करा, सतत शिक्षणाते धरा । सुनीति जडण्या त्वरा करुनि मौर्ख्य त्यांचे हरा । कठोर मनही जरा करू नका दया आदरा' असा 'निरंतर हृदि स्मरा सदुपदेश हाची खरा' हा कळकळीचा सल्ला दिला आहे. 'प्रतिपालन करणे आज्ञा हे श्रेष्ठ आईबापांची' (अं. ७) 'सत्य बीज रोवी मन आलवाली । पाणी त्यास घाली विचाराचे' (अं. ९) अशा उपदेशपर कविताही आढळतात, क्वचित 'जन हो आत्मविचार करा' हे कवितेचे शीर्षक कवितेच्या चरणारंभीच्या अक्षरात योजून रचलेली चमत्कृतिपूर्ण कविताही भेटते. हरिश्चंद्र चंद्रोवा जोशी यांची 'ऋणनिषेधबोधक' ही दीर्घ कविता सहाव्या व अकराव्या अंकात आहे क्वचित

'असती सप्तहि रंग. तेजीं परि तेंहि नियतमानांनीं,
न्यूटन शोधें कळलें, यास्तव त्या देति मान मानांनीं ।'

असा शास्त्रीय विषयही 'दर्शनानुशासन रंग' (अं. ९) या नावाने कविताबद्ध झालेला दिसतो, तर कधी मुंबईत ता. १ नोवेंबर १८५४ रोजी वादळ झाले त्यावर कटाव. '



अनुक्रमणिका

'वादळ सुटले अकस्मात, लोक झाले भयभीत...
वारा चाले वळावत, मेघराजे विमानांत,
आले बैसुनि गडगडत, कौलें पक्ष्यापरी उडत,
झाडें लोटांगण घालित जणु काय मारुतिताता नमित...
घरें लाटांपरी डोलत कांहीं होता जमिनदोस्त' (अं. ९)
अशी वास्तव घटनाधिष्ठित कविताही आलेली दिसते.

या कवितांतून काव्य बेताचेच आहे, किंबहुना वृत्तबद्ध रचना म्हणूनच त्यांस कविता म्हणावयाचे. पण त्यांचे विषय पारमार्थिक नसून लौकिक आहेत. तत्कालीन लोकजीवनाशी संबंधित आहेत. रचना पुष्कळशी सरळ, साधी, सोपी आहे. त्यात अलंकाराचा, कृत्रिमतेचा हव्यास नाही. समासघटित संस्कृत शब्दांचा फारसा वापर नाही. पंडिती काव्यापेक्षा सर्वस्वी वेगळा असा हा प्रवाह आहे. हे कवीही प्रायः जनसामान्यातील आणि त्यांचे काव्यही जनसामान्यांसाठी !

कधी 'लिहिण्याची काळी शाई' (नोव्हेंबर १८५४ अं. ९), 'कागदाच्या कृतीविषयी' (डिसेंबर १८५४, अं. १०) यासंबंधी माहिती आलेली दिसते, तर कधी 'साधारण विषय' या सदराखाली 'तपकिरीचे व्यसनाविषयीं' (ऑक्टोबर १८५४ अं. ८) 'जो तपकिरीचा अट्टल व्यसनी आहे, तो सरासरी हिशोब करून पाहिलें असतां प्रति अर्ध घटिकेस एक चिमूट ओढितो, ती चिमूट घेण्यास, डबी काढण्यास, नाक शिंकरण्यास आणि पुसण्यास सुमारे चार पळें लागतात...

'यावरून अनुमान करितां येतें कीं, जर हें तपकिरीचें व्यसन चाळीस वर्षपर्यंत एकसारखे चालविलें तर आयुष्यातून पूर्ण दोन वर्षे नाक शिंकरण्याप्रीत्यर्थ आणि दुसरी दोन शिंकण्याप्रीत्यर्थ जातील.

'तपकिरीच्या डब्यांचा आणि रुमालाचा जो कांहीं खर्च होतो, त्याविषयीं लिहिणें म्हटलें म्हणजे एक दुसरें पत्र लागेल...जर या वेळाचा व द्रव्याचा चांगला उपयोग केला तर...त्यापासून महत्कार्य होईल.' असे छोटेसे पण प्रभावी व परिणामकारक टिपण येते. या टिपणाखाली 'दिग्दर्शन' असा निर्देश आहे. कदाचित मराठीतील आद्य दिग्दर्शन मासिकातून ते पुनर्मुद्रित केलेले असावे. तसे असेल तर जुन्या, बंद पडलेल्या मासिकातील माहिती पुनरुज्जीवित करण्याचा–आणि तीही त्याचा ठावठिकाणा उद्धृत करून हा उपक्रम लक्षणीय म्हणावा लागेल.

काही अंकात 'पुस्तकांचे स्वीकार' आहेत. ऑगस्ट १८५४, (अं. ६) च्या अंकात 'बयोंल्डाचे मराठी भाषांतर' यावद्दलचा सुमारे सहा ओळींचा अभिप्राय आला आहे. त्यातील जवळजवळ चार ओळी आभार, किंमत, पृष्ठसंख्या सांगण्यात संपतात. आणि मुख्य अभिप्राय 'यातील भाषा बरीच प्रौढ आहे व विषयही चांगले. कित्येक ठिकाणीं नीतिपर, कित्येक ठिकाणी मनोरंजक आहेत.' असा चुटपुटता, जेमतेम दोन ओळीत येतो. तुलनेने याच अंकातील, 'बोर्ड ऑफ एज्युकेशनचा रिपोर्ट' यावद्दलचा अभिप्राय जरा अधिक विस्तृत (पृ. १९३–१९५) आलेला दिसतो. सप्टेंबर १८५४ च्या अंकात 'बुधबळांचा ग्रंथ' बद्दल किंमत दहा आणे ही 'नेमस्त' असल्याचे सांगून 'हा ग्रंथ मनोरंजक आणि नवीन शिकणारांस फार उपयोगी आहे. यात कित्येक पट वगैरे काढून बुधबळे खेळण्यांतील सिद्धांत लिहिले आहेत. याचा प्रस्तावनेंत ग्रंथकर्त्यांने बुधबळाचा मूळ पीठिकेविषयीं जो शोध लावला आहे तो मोठा महत्त्वाचा' असल्याचे सांगितले आहे. आधुनिक मराठी समीक्षेची ही आद्य रूपे.

'महिन्याची प्रसिद्ध वर्तमानें' हे चंद्रिकेचे खास सदर. त्यात तत्कालीन महत्त्वाच्या घटनांची नोंद येते. क्वचित त्यावर संपादकीय अभिप्रायही असतो. 'इंग्लिश लोकांचा जयाकरितां प्रार्थना' (जुलै १८५४, अं. ५) यात 'मुंबईस हिंदु, ख्रिस्ती, मुसलमान, पारसी, इस्रायल यांणी प्रार्थना केल्या' 'याप्रमाणे पुण्यातील पारसी लोकांनींही प्रार्थना केली' असे वृत्त येते. या छोट्याशा निर्देशावरून त्यावेळी पुण्या–मुंबईतील वातावरण कसे भिन्न होते यावर प्रकाश पडतो. हा लहानसा उल्लेख त्यामुळेंच आज महत्त्वाचा ठरतो.

'मुंबईमध्यें पाण्याचा खडखडाट' (एप्रिल १८५४ अं. २) 'पाणी आणण्याकरितां अनेक सभा' (जून १८५४ अं. ४), 'या महिन्याचे ८ वे तारखेस रात्रौ सुमारे ७॥ वाजता हलकासा भूकंप...मुंबई टापूत झाला' (डिसेंबर १८५४. अं १०) 'डाकेविषयीं नवा कायदा' (सप्टेंबर १८५४, अं. ७) 'कोल्हापुरकर म्हाराज बडोद्यास विवाह करण्याकरितां गेले' (एप्रिल १८५४ अं. २) अशी 'वर्तमाने' प्रसिद्ध झालेली दिसतात. त्याप्रमाणेच नव्याने सुरू झालेल्या नियतकालिकांची वृत्त संपादकीय टिपणीसह आवर्जून आलेली दिसतात.

मार्च १८५४ च्या अंकात (अं. १) 'हिंदू हार्विजर' हे एका हिंदूने 'हिंदू लोकांची अनेक प्रकारचीं दुःखें विलायतेंतील वरिष्ठ सरकारात जाहीर व्हावी म्हणून काढलेल्या वर्तमानपत्राचे वृत्त आलेले आहे. त्याच्या पहिल्याच अंकातील चुकांवर 'टेलिग्राफ' व 'अव्झर्वर' यांनी बरीच टीका केल्याचे सांगून त्या टीकेबाबत 'चंद्रिका'कर्ते म्हणतात, 'सूज्ञ, विद्वान, तशांत वर्तमानपत्रकर्ते अशांच्या हातून अशीं हलकट कृत्यें घडतात हें पाहून आम्हांस मोठें आश्चर्य होतें.' आणि 'जे युरोपियन लोक मराठी भाषा शिकतात, त्यांत चांगले त्यास वास्तविकपणे पाहता शुद्ध व चांगल्या रीतीने एकही वाक्य बोलता येत नाही, मग लिहिण्याची वार्ता तर फारच दूर राहिली' अशी कोपरखळीही देतात. ऑक्टोबर १८५४ च्या अंकातील (अं. ८) 'वर्तमान' या सदरात 'हिंदू हार्विजर' आठवड्यातून दोनदा निघू लागल्यावद्दल चंद्रिकाकर्त्यांनी 'संतोष' व्यक्त केला आहे.

'एप्रिल महिन्यातील वर्तमान' यात 'पूना अव्झरवर म्हणून जे नेटिवांचा विरुद्ध प्रख्यात पत्र ते या महिन्यापासून दोनदा निघू' लागल्याचे सांगून 'त्याचा जय इच्छून' त्याणे आपला पहिला बाणा सोडून द्यावा... त्यात त्याचें कल्याण होणार आहे' अशी कानपिचकीही दिली आहे. मे महिन्याच्या 'वर्तमाने'त 'प्रभाकर' व 'धूमकेतू' यांचे खंडनार्थ सत्यशोधक नामे नवीन वर्तमानपत्र निघाल्याचे सांगून 'एकमेकांचा खंडनार्थ अशीं वर्तमानपत्रें काढणें हें जरी प्रशस्त नव्हे तरी सर्व विचार करून पाहता या पत्रकर्त्यास आमचाने दोष ठेववत नाहीं' असा आपला अभिप्राय 'चंद्रिका'कर्त्यांनी दिलेला आहे.

याप्रमाणेच रत्नागिरी येथे 'जगन्मित्र' (जून १८५४, अं. ४), पुण्यास 'अलेन्स इंडियन न्यूज' (जुलै १८५४, अं. ६) सुरू झाल्याचीही माहिती वाचकांना पुरविलेली आहे.

वर्ष-अखेरीच्या अंकात (फेब्रुवारी १८५५, अ.१२) 'वर्तमाने' या सदरात 'चंद्रिके' चा वर्षभराचा वृत्तांत तिच्या आश्रयदात्या 'वाचणारांस विदित केला' आहे. या मासिक पुस्तकाचा पहिला अंक निघाला, तेव्हा आमचे बंधू प्रभाकरकर्ते यांस फार वाईट वाटून (कोणत्या कारणांमुळें वाईट वाटले असेल तें त्यांचें त्यांसच माहीत!) त्यांणी आपल्या पत्रात आम्हांविरुद्ध पुष्कळ खोटा मजकूर वहुत वेळा छापला, इतकेंच नाहीं, परंतु घरोघर आपले स्नेही पाठवून आमच्या पुस्तकास लोकांनीं आश्रय देऊ नये, याविषयी सक्त प्रयत्न केला, परंतु "ईश्वर रक्षक असतां, त्याला जगिं शक्त कोण भक्षाया?" याप्रमाणें यांचा दुष्टेच्छापूर्वक अनिष्ट करण्याच्या सक्त प्रयत्नापासून आमचे तादृश नुकसान झालें नाहीं, हें लिहून कळविण्यास आम्हांस हर्ष वाटतो.' असे म्हणून 'बोर्ड आफ एज्युकेशन', 'नेक नामदार गवरनर कौसल' आणि येथील दुसरे श्रीमान व उदार लोक यांनीं चांगला आश्रय' दिल्याचें सांगून पहिला अंक व हा अंक...या दोहोंची तुलना करून पाहिली असता यांच्या हरएक गोष्टीत कसकसी सुधारणा होत आली याची आम्ही स्वतः तारीफ करावी त्यापेक्षां या गोष्टीचा वाचणारांनीच स्वतः विचार करावा, हें वरें. पुढें आमची उमेद आहे कीं, परमेश्वर करील तर, येत्या वर्षात याहून अधिक चमत्कारिक (वैशिष्टचपूर्ण ?) सुधारणा करू" असें आश्वासन देऊन हे निवेदन संपते. येथे 'निबंधमाले'ची आठवण येते. निबंधमालेतही वर्षाच्या शेवटच्या अंकातून असाच—याहीपेक्षा विस्तारपूर्वक आढावा घेतलेला दिसतो.

या काळात जोडाक्षराचे लेखन अजून निश्चित झालेले दिसत नाही. 'स्थिती,' हिंदुस्थानात,' 'प्रसिद्ध 'वृध्दी' असे शब्द आढळतात. त्याप्रमाणेच अनेकदा 'च्या' बद्दल तालव्य चा आलेला असतो.

'...हा धरणीकंप पृथ्वीच्या उदरांत फार उष्णता उत्पन्न झाल्यामुळें होतो; ती उष्णता उत्पन्न होण्यास मुख्यत्वेंकरून गंधक कारण होय. आमचे लोक असें समजतात कीं पातक फार झाल्यामुळें पृथ्वीस भार होतो; त्यांमुळे ती आपलें शरीर हलविते.' (जून १८५४ अं. ४ पृष्ठ १०६, १०७) अशी सरळ, सुबोध, ओघवती वाक्यरचना काही ठिकाणी येते तर काही ठिकाणी ती, "कोणत्याही आनंदाची चिरकाल राहणें हीच योग्यता मानिली तर विद्येपासून प्राप्त होणाऱ्या आनंदाशीं सद्गुण आणि धर्म ह्यापासून उत्पन्न होणाऱ्या आनंदाशिवाय कोणत्याची ही तुलना लागणार नाही. ज्या ज्या काळीं विद्या सफल होते. त्या त्या काळीं तीपासून अनिर्वाच्य आनंद उत्पन्न होतो, तो कोणत्याही इंद्रियजन्य सुखापेक्षा विशेष आहे' (जुलै

१८५४ अं. ५, पृ. १५६). अशी लांबलचक, पल्लेदार वळण धारण करताना दिसते. क्वचित कधी ती 'मनुष्याच्या मनातील निरिच्छतेविषयी दोन मते आहेत. कोणी असें मानितात की, प्रथमतः स्वार्थपरलोक परंतु मग सर्व मनुष्यें लहानपणी प्राप्त झालेल्या सुशिक्षेचे वजन त्यांच्या मनावर नसलें तर, सर्वदा दुसऱ्याचें अनहित करून आपलें हित दाखविण्याची इच्छा करितात. खरोखर निरिच्छ असल्या ह्या लोकांच्या अभिप्रायाप्रमाणें आमची करणी नाहीं व आमचे हेतुही तसें नाहींत खरें; परंतु वरची कल्पना केवळ मनुष्यासच अप्रतिष्ठेची आहे असें नाहीं, तर ज्या परमेश्वराच्या हातच्या कृत्यांत न्यूनता व्हावयाचीच नाहीं. त्यासही अप्रतिष्ठेची आहे' (सप्टेंबर १८५४, अं. ५, पृ. १०२, १०३) अशी अर्थाभिव्यक्तीस दुर्बोध व गुंतागुंतीचीही आढळते. गद्यलेखनाच्या शैलीची ही वेगवेगळी वळणे म्हणजे अर्वाचीन मराठी गद्य आपल्या अभिव्यक्तीच्या वाटा शोधत असलेल्या काळाच्या खुणा म्हणता येतील.

अशी ही एकशे तेहतीस वर्षापूर्वी उदय पावलेली 'चंद्रिका'. अर्वाचीन मराठी भाषेची जडणघडण होण्याचा नवे साहित्यप्रकार मूळ धरू पाहात असण्याचा तो कालखंड. त्याची पदचिन्हे 'चंद्रिके'च्या अंगोपांगी वरीलप्रमाणे उमटलेली दिसतात. 'चंद्रिके'च्या प्रथम वर्षाच्या अंकात भूगोल, खगोल, इतिहास, राज्यशास्त्र, नीती या विषयांवरील निबंधाप्रमाणेच स्वतंत्र मराठी नाटक, स्वतंत्र कादंबरी, चरित्र यांनाही आरंभ झालेला दिसतो. सामाजिक विषयांवरील स्फुट कवितांनाही त्यात स्थान मिळाले आहे.

अमेरिकन मिशन वा उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा यासारखी कोणती संस्था 'चंद्रिके'च्या पाठीशी नाही. ती प्रायः एकट्यादुकट्याच्या[3] प्रयत्नातून उभी राहिलेली, त्यामुळे इतर बहुसंख्य मासिकांप्रमाणेच 'चंद्रिका'ही पुढे लौकरच अस्तंगत झाली आणि नंतर विस्मृतप्राय झाली.

केवळ 'चंद्रिका'च नव्हे, तर त्या काळातील बहुतेक सर्वच मासिकातून त्या काळाचे स्वरूप स्पष्ट करणारे माहितीचे असे असंख्य कण इतस्ततः पसरलेले आहेत. अर्वाचीन मराठी भाषा–साहित्याच्या विकासाच्या, इतिहासाच्या दृष्टीने या मासिकपुस्तकांचा अभ्यास मोलामहत्त्वाचा आहे. या दृष्टीने एकोणिसाव्या शतकातील मासिकपुस्तकांचा अभ्यास मराठी ज्ञानप्रसारक, विविधज्ञान विस्तार, निबंधमाला असे काही अपवाद वगळता जेवढा सांगोपांग व तपशीलवार व्हावयास पाहिजे तेवढा तो झालेला आढळत नाही. मराठी वाङ्मयेतिहासातून या मासिकपुस्तकांना स्थान मिळालेलें दिसते, पण ते पुष्कळसे गौण असते. त्या काळातील ग्रंथसंपदेप्रमाणेच त्या काळातील मासिकपुस्तकांचा स्वतंत्रपणे अभ्यास होणे आवश्यक आहे. मराठी भाषा–साहित्याच्या पायाभरणीतील त्यांचा सहभाग महत्त्वाचा आहे, तसा एंकूणच एकोणिसाव्या शतकाचें यथातथ्य दर्शन घडविण्यास हा अभ्यास आवश्यक, उपयुक्त ठरणारा आहे. याचे एक छोटेसे उदाहरण म्हणूनच 'चंद्रिका' – प्रथमवर्ष इ. स. १८५४–१८५५ : एक अभ्यास' हा लेखप्रपंच !

---

३. 'हळबे, लक्ष्मण मोरेश्वर. 'चंद्रिका' (१८५६) मासिकाचे संस्थापक,'
ल. म. भिंगारे, 'कथा-कादंबरी', मराठी वाङ्मयात्रा इतिहास, खंड चौथा. संपा. रा. श्री. जोशी, आ. २, पुणे, १९७३, पृ. २२७. या 'चंद्रिका' (१८५६) मासिकाचा उल्लेख नियतकालिकसूचीत आढळत नाही.

## साभार स्वीकार

### समीक्षा इतिहास

**ग्रेस आणि दुर्बोधता** : जयंत परांजपे; पां. ना. बनहट्टी प्रकाशन, नागपूर १२; १९८६; रु. ६० ☆ **काव्य दिंडी** : उषा देशमुख; सुपर्ण प्रका. पुणे; १९८७; रु. ५० ☆ **इस्त्रायल : युद्ध युद्ध आणि युद्धच**; वि. ग. कानिटकर; श्री विद्या प्रका. पुणे ३०; १९८७; रु. १२५ ☆ **स्थानिक इतिहास आणि साहित्य : एक शोध–नांदेड**; संपादित; दि. व्यं. कुलकर्णी, सचिव–संदर्भ ग्रंथ समिती, नांदेड; १९८५–८६; ☆ **भारताचा आर्थिक विकास–पुढचा मार्ग**; पां. वा. गाडगीळ; शलाका प्रकाशन, मुंबई ५८; १९८७ रु. १५ ☆







डॉ. द. न. गोखले

# भाषा-शोधन (भाषिक व्यवहारातील विवेक)

(लेखांक दुसरा)

## ( ३ )

### स्त्रीलिंगी नामांची नवनिर्मिती

पुंलिगी नामांना समानार्थक अशी स्त्रीलिंगी नामे तयार करण्याची प्रवृत्ती मराठीत पूर्वापार आहे. गृहस्थ–गृहस्थीण, भाजीवाला–भाजीवाली, घोडा–घोडी, लोहार–लोहारीण, शिक्षक–शिक्षिका, नट–नटी इत्यादी.

अलीकडे पुंलिगी नामांना समानार्थक अशी स्त्रीलिंगी नामे बनवण्याची प्रवृत्ती खूपच जोरावली आहे. स्त्रियांचे समाजात उंचावत असलेले स्थान, त्यांचे विविध व्यवसायात वाढत चाललेले प्रमाण आणि त्यांच्यातील स्वत्वस्थापनेचा उत्साह, ही त्याची प्रमुख कारणे असू शकतील. अशी काही नवी स्त्रीलिंगी नामे पुढीलप्रमाणे : अध्यक्ष–अध्यक्षा, प्राचार्य–प्राचार्या, प्राध्यापक–प्राध्यापिका, मुख्याध्यापक–मुख्याध्यापिका, शिक्षक–शिक्षिका, निवेदक–निवेदिका, नेता–नेती, अभियन्ता–अभियन्त्री किंवा अभियन्ती, चालक–चालिका.

गृहस्थ, भाजीवाला, अध्यक्ष, मुख्याध्यापिका इत्यादी शब्दांना वर नाम म्हटले आहे. कारण त्यांचा उपयोग मुख्यतः नाम म्हणून होतो. पण या शब्दांचा उपयोग गौणतः विशेषण म्हणूनही होऊ शकतो हे मान्य आहे.

पुंलिगी नामांना समानार्थक स्त्री लिंगी नामे बनविण्याची ही प्रवृत्ती भाषादृष्ट्या स्वागतार्ह आहे का ?

अशी नामे बनविण्याची प्रवृत्ती मराठीत पूर्वापार आहे, हे मान्य केले तरी ती प्रवृत्ती निरपवाद वा सार्वत्रिक आहे, असे म्हणता येत नाही. सचिव, गुरू, कर्मचारी, अधिकारी, लेखनिक, लिपिक, पर्यवेक्षक, पदवीधर, मजूर, जलतरणपटू, विधिज्ञ, तज्ज्ञ, देशस्थ, कोकणस्थ, सभासद, साह्यक, भागधारक वगैरे नामांचे वेगळे स्त्रीलिंगी पर्याय तयार न करताही या नामांच्या उक्त रूपांचा उपयोग करून आपला सर्व व्यवहार बेखटक चालू शकतो. आपण पुढीलसारख्या वाक्यांत उक्त रूपे वापरूनच स्त्रीलिंगी पर्यायांचे काम भागवितो. –'यंदा आमच्या शाळेत गुप्ते-बाई पर्यवेक्षक नेमल्या गेल्या.' 'या कार्यालयात १२ पुरुष-कर्मचारी नि १० स्त्री-कर्मचारी आहेत.' 'जिल्हाधिकारी कुमारी रोझा डिसिल्व्हा यांनी ध्वजारोहण केले.' 'येथील स्त्रीपुरुषांत निम्मे कोकणस्थ नि निम्मे देशस्थ आहेत.' 'मोगुबाई या गायनातल्या माझ्या गुरू आहेत.'

अशा स्थितीत स्त्रीलिंगी पर्यायांची नवनिर्मिती विवाद्य ठरते. अलीकडेच जे स्त्रीलिंगी पर्याय पुढे आले आहेत, ते न वापरता पुढीलप्रमाणे भाषिक व्यवहार सहज करता येईल : 'शालेय समितीच्या अध्यक्ष सौ. कमलाबाई कामत यांनीच हा ठराव सादर केला.' 'स्त्री शाळेत शिक्षक असो नाहीतर नभोवाणीवर निवेदक असो, तिच्या मागची मुलांची बाळग टळत नाही.' 'मुख्याध्यापकांच्या या अधिवेशनात ११२ पुरुष-मुख्याध्यापक नि ९८ स्त्री-मुख्याध्यापक उपस्थित होत्या.'

स्त्रीलिंगी पर्यायांमुळे निर्दिष्ट व्यक्तीचे लिंग सहजतेने कळते, हे खरे आहे. पण स्त्रीलिंगी पर्याय निकराने पुढे आले आणि रूढही झाले तर सध्याची नामे पुल्लिंगी समूहापुरतीच मर्यादित होऊन उभयलिंगी (सरमिसळ) समूहाचा निर्देश करणे कठीण होईल. 'फर्ग्युसन महाविद्यालयात ११२ प्राध्यापक आहेत' असे म्हटल्यास 'प्राध्यापिका किती आहेत ?' असा प्रश्न पुढे येईल. जर प्रश्न टाळायचा असेल तर 'फर्ग्युसन महाविद्यालयात ११२ प्राध्यापक नि प्राध्यापिका आहेत' असे म्हणावे लागेल. म्हणजे स्त्रीलिंगी पर्याय आणल्याने जसा फायदा आहे तसा तोटाही आहे. तोटा जास्तच आहे. कारण एकतर नवे स्त्रीलिंगी पर्याय निर्माण करावे

लागतात नि दुसरे म्हणजे उभयलिंगी पर्याय न राहिल्याने भाषा लंगडीच राहते.

नव्या स्त्रीलिंगी पर्यायांत ज्यांना स्त्रियांचे स्वत्व स्थापित झाल्यासारखें वाटते, त्यांचे काय ? त्यांनी असा विचार करावा, की नवनिर्मित काही पर्यायांवर स्त्रियांचा अधिकार सांगता येणे अधिक बरे, की सर्वच पर्यायांवर जेवढा पुरुषांचा अधिकार तेवढाच स्त्रियांचा अधिकार सिद्ध होणे अधिक चांगले ? त्यांनी असा विचार केल्यास स्त्रीलिंगी पर्यायांच्या नवनिर्मितीचा आग्रह अंशतः गळून पडेल·

मात्र स्त्रीलिंगी पर्यायांची नवनिर्मिती थांववली आणि सर्वच पर्याय सोयीप्रमाणे स्त्रीलिंगी वापरण्याची मुभा ठेवली तरी स्त्रियांची स्वत्वस्थापनेची जी भावना आहे ती पूर्णतः तृप्त होईल असे नाही. 'येथील स्त्री–पुरुषांत **निम्मे** कोकणस्थ नि **निम्मे** देशस्थ आहेत ' यांसारख्या वाक्यांत संवद्ध विशेषणे पुंलिंगीच आहेत. 'जिल्हाधिकारी ' या नामाचा उपयोग स्त्रियांच्या संवंधातही केला तरी 'शहाणा जिल्हाधिकारी ' असे म्हणताना विशेषण पुंलिंगी राहणार असेल, तर अशा विशेषणांचे काय, यांसारखे प्रश्न उत्पन्न होऊ शकतात.

अशा वेळी स्त्रियांची संख्या जेथे वाढेल तेथे 'शहाणी जिल्हाधिकारी ' असा उपयोग प्रचारात येऊ शकेल. ('स्त्री-पुरुषांत **निम्मे** कोकणस्थ ' वगैरे वाक्यात 'निम्मे 'हे विशेषण पुंलिंगी आहे; कारण त्याच्याजवळ 'पुरुष ' हे पुंलिंगी नाम आहे. 'पुरुष-स्त्रियांत ' असे म्हटल्यास '**शहाण्या** ' हे स्त्रीलिंगी विशेषण वापरणे योग्य ठरेल. )

नवे स्त्रीलिंगी पर्याय निर्माण करण्याचे सोडून दिले आणि नवनिर्मित पर्याय बाजूला टाकले तरी तेवढयाने सर्वच पर्याय त्याज्य ठरत नाहीत, किंवा सर्वच पर्यायांचे भाषेतून उच्चाटन करणे योग्य ठरत नाही. जे पर्याय चिररूढ आहेत त्यांचा स्वीकार करणेच शहाणपणाचे होईल. उदाहरणार्थ, नट – नटी, शिक्षक–शिक्षिका, मास्तर – मास्तरीण, वाघ–वाघीण, मुलगा– मुलगी, नायक–नायिका, तरुण–तरुणी, पाटील–पाटलीण इ. जोड्यांतील स्त्रीलिंगी पर्यायांवर बहिष्कार टाकता येणार नाही.

मराठीत मुलगा, राजा, अभिनेता, अभियंता, इत्यादी आकारान्त नामे पुंलिंगीच आहेत. तेव्हा, जी नामे मुळात अशी नक्की केवळ पुंलिंगी आहेत त्यांना आवश्यक तेथे स्त्रीलिंगी पर्याय उत्पन्न करावे लागतील, किंवा जे हाताशी असतील ते वापरावे लागतील. उदाहरणार्थ, मुलगी, राणी, अभिनेत्री, अभिनेती, अभियन्त्री, अभियन्ती इत्यादी.

सारांश, स्त्रीलिंगी पर्यायांची सरधोपट निर्मिती थांबविणे नि आवश्यक तेथेच अशा पर्यायांना डोळस रीतीने वाव देणे, हे भाषा–हित–दृष्टचा योग्य ठरेल.

## ( ४ )

## 'जा' धातूची भारूडभरती .

अनेकांच्या वोलण्यात आणि लिहिण्यात 'जा' धातूचा निरर्थक उपयोग केला जातो. संयुक्त क्रियापदात आणि धातुसाधितात अशा उपयोगाची उदाहरणे आढळतात. उदाहरणार्थ, 'योग्य खते वेळच्या वेळी घातली तर झाडे जोमात **वाढली जातात** ' हे वाक्य, किंवा ' गुलामी **रुजली गेल्याने** ती गुलामीच वाटेनाशी होते ' हे वाक्य पाहा. पैकी पहिल्या वाक्यात संयुक्त क्रियापदामध्ये नि दुसऱ्या वाक्यात संयुक्त धातुसाधितामध्ये 'जा ' धातूची उगाच भरती केली आहे. ' योग्य खते वेळच्या वेळी घातली तर झाडे जोमाने **वाढतात.** ' 'गुलामी **रुजल्याने** ती गुलामीच वाटेनाशी होते. '– असे म्हटल्यास ती वाक्ये प्रमाण मराठीत चपखल बसतील.

एक पुस्तक सहज चाळता चाळता 'जा 'ची भारूडभरती केलेली पुढील वाक्ये आढळली : (१) कोणत्याही वस्तूच्या वापरासाठी ती **दिसली जाण्याची** आवश्यकता असते. (दिसली जाण्याची = दिसण्याची) (२) एकभाषिक समाजातील सर्व व्यक्तींना बहुंशी **समजली जाणारी,** समाजातील शिष्ट लोकांनी लेखनासाठी मान्य केलेली भाषा 'प्रमाण भाषा ' म्हटली जाते. (समजली जाणारी = समजणारी. 'म्हटली जाते ' या क्रियापदातील 'जा ' चा उपयोग योग्य आहे.) (३) वर्तमानपत्रे समाजाच्या फार मोठ्या क्षेत्रात **पोचली जातात.** (पोचली जातात = पोचतात) (४) प्रमाण भाषेचे स्वरूप प्रतिष्ठित वर्गामुळे **ठरले जाते.** (ठरले जाते = ठरते) (५) लेखनविषयक नियम... भाषिक प्रतिष्ठितांनी आपल्या लेखनात वापरून **रुजवले गेल्याने** वापरात येतात. ( रुजवले गेल्याने = रुजवल्याने )

(६) पूर्वीच्या कालखंडातील प्रतिष्ठित वर्ग बदलला गेला. (प्रतिष्ठित वर्ग कोणी तिसऱ्याने बदलला असल्यास नि तसे सांगण्याचा हेतू असल्यास 'बदलला गेला' ही रचना योग्य ठरू शकेल. पण संदर्भानुसार 'बदलला गेला' ऐवजी 'बदलला' ही रचना योग्य दिसते.)
(७)... फारसी-मयतेचो जाणीव लोपली गेलेली, मराठी... (लोपली गेलेली = लोपलेली)

वर कंसांत दर्शविल्याप्रमाणे 'जा' चा उपयोग गाळल्यास सुभग रचना करता येते आणि भाषेला उगाच येणारा फुगवटा टाळता येतो.

'निघून गेला' 'बोलून गेला' 'या लढाईत त्याचा मुलगा मारला गेला' वगैरे ठिकाणी 'जा' निरर्थक नाही; 'जा' गाळल्यास अर्थ लंगडा होईल. निरर्थक नि प्रमाणभाषेशी विसंगत दिसणारा 'जा' टाळावा एवढेच प्रतिपाद्य आहे.

## (५)

## अध्याहृत कर्त्याची विभक्ती

आधीच्या वाक्यातील कर्ता अनुगामी वाक्यातही असेल तर तो केव्हा केव्हा अध्याहृत ठेवण्याची रीत आहे.

(१) हे मृगाजिन अति-भाग्याचं. गुरुजींच्या पायाची धूळ नेहमीच अंगावर घेतं. (अनुगामी वाक्यात 'मृगाजिन' = 'ते' हा कर्ता अध्याहृत.)

(२) आऊनं साद घातली की ती लगबग येते. बस म्हटलं की बसते. आऊ जाईल तिकडं तिच्या मागं मागं जाते. (येथे दोन वाक्ये अनुगामी. दोन्हींत 'ती' हा कर्ता अध्याहृत.)

अनुगामी वाक्यात जो अध्याहृत कर्ता असतो त्याची विभक्ती आधीच्या वाक्यातील कर्त्याच्या विभक्तीप्रमाणे असते. म्हणजे, आधीच्या वाक्यात कर्त्याची प्रथमा असल्यास अनुगामी वाक्यात अध्याहृत कर्त्याची प्रथमा असते; आधीच्या वाक्यात कर्त्याची तृतीया असल्यास अनुगामी वाक्यात अध्याहृत कर्त्याची तृतीया असते; वगैरे. वरील (१) व (२) या वाक्यगटात हाच प्रकार आहे. पुढील वाक्यगटातही तसेच दिसेल :

(३) ते उघडेच असत. क्वचित खादीचे उपरणे अंगावर घेत असत. (अनुगामी वाक्यातील अध्याहृत कर्ता 'ते'.)

(४) पाण्यावर काढलेल्या रांगोळीप्रमाणे ते दिवे दिसत होते. हेलकावत हेलकावत दूर जात होते. (अनुगामी वाक्यातील अध्याहृत कर्ता 'दिवे' किंवा 'ते'.)

(५) डाव्या बाजूस लहान खोली होती. झाडून सारवून लख्ख केली होती. (अनुगामी वाक्यातील अध्याहृत कर्ता 'खोली' किंवा 'ती'.)

(६) पटेल तर चल. नाहीतर नको. (अनुगामी वाक्यातील अध्याहृत कर्ता 'तू'. दोन्ही वाक्ये ऊ-आख्यातात आहेत. या आख्यातात द्वितीय पुरुषी कर्ता गाळण्याची रीत आहे. ऊ-आख्यात = सामान्यतः आज्ञार्थ.)

आता पुढील वाक्यगट वघा. त्यात अध्याहृत कर्त्याच्या विभक्तीसंबंधी वरील संकेत पाळलेला नाही. म्हणून ती सदोष वाटतात. कंसात दर्शविल्याप्रमाणे ती वाक्ये सुधारता येतील.

(७) एके दिवशी वडिलांनी माझी चित्रे पाहिली व मला हाक मारून म्हणाले. (अनुगामी वाक्यात तृतीयान्त अध्याहृत कर्ता चालणार नाही. त्याऐवजी 'ते' हा प्रथमान्त कर्ता घालणे आवश्यक.)

(८) काका घरात आले. हातपाय धुतले. (अनुगामी वाक्यात 'त्यांनी' हा तृतीयान्त कर्ता घालणे आवश्यक.)

(९) त्याच वेगानं तो उंबराच्या झाडाच्या बुंध्याशी आला. लंगा काढला, सदरा काढला, आणि... (अनुगामी वाक्यात 'त्याने' हा तृतीयान्त कर्ता घालणे आवश्यक.)

७ ते ९ हा वाक्यगट पाठ्यपुस्तकांतून किंवा राज्य-पुरस्कार मिळालेल्या पुस्तकांतून उद्धृत केला आहे. त्यावरून अनुगामी वाक्यातील अध्याहृत कर्त्याची विभक्ती दुर्लक्षिण्याची प्रवृत्ती किती सबळ आहे, ते लक्षात येऊ शकेल. ७ ते ९ ह्या गटातील वाक्ये सदोष समजणे योग्य होईल.

stands while singing असा आहे. या कसबिणी-कडे जाणे सर्वसामान्यांना परवडणारे नव्हते. म्हणून तिकडे जाणारांची संख्या कमी झाली. आणि नाच्या पोऱ्याच्या तमाशाला गर्दी होऊ लागली. कसबिणीची लावणी ऐकण्यासाठी मोजक्याच लोकांची एखाद्या बंदीस्त खोलीत सोय केलेली असे. उलट नाच्याचा तमाशा उघड्यावर हजारो प्रेक्षक एकाच वेळी बघत.

मोल्सवर्थ म्हणतो त्याप्रमाणे कसबीण किंवा कला-वंतीण गाताना उभी राहते किंवा खाली बसते. नृत्य करीत नाही. तमाशातील नाच्या मात्र एकाच वेळी गातही असतो आणि गीत असताना नाचतही असतो. हे गाणे सुद्धा अगदी टिपेतल्या आवाजातले असते. गाऊन नाचणे तसे फारच अवघड. परंतु नाच्यास हे सहज जमत असे.

तमाशा अस्तित्वात आल्यानंतर सुरुवातीला त्यातून स्त्रिया नृत्य करीत नव्हत्या. परंतु जेव्हा तमाशास खेड्यापाड्यातून तसेच शहरातूनसुद्धा प्रचंड प्रतिसाद मिळू लागला, तेव्हा कलावंतिणींनी बैठकीच्या लावण्या सोडून दिल्या आणि त्या तमाशाच्या फडात शिरल्या.

भंगारी आणि गेनवा या देवदासींची नावे या संद-र्भात उदाहरणादाखल देता येतील. सतु सुवराव यांची मुलं आणि हल्ली महाराष्ट्रातून गाजत असलेल्या काळुबाळू या तमासगीरांचे वडील शिवा–संभा यांनी भंगारी आणि गेनवा या दोन देवदासींना आपल्या फडात आणले होते.

भंगारी आणि गेनवा फडात येण्यापूर्वी शिवा–संभा यांच्याकडे भाऊ फक्कड नाच्याचे काम करीत असत. भाऊ फक्कड हे सुप्रसिद्ध शाहीर. अतिशय देखणे. याशिवाय त्यांचा धर्मशास्त्राचा अभ्यास प्रचंड दांडगा होता. हे त्यांच्या " कसा असावा कसा नसावा " आणि "मनाची लावणी " या दोन बघितल्यास सहज लक्षात येईल. या दोन्ही रचनेत त्यांनी राजा हरिश्चंद्रापासून ते नामदेव–तुकारामापर्यंन्तचे दाखले दिलेले आहेत.

भाऊ फक्कड हे मूळचे कऱ्हाड तालुक्यातील मुंदराळ या गावचे. परंतु ते लहानपणासूनच कवलापुरात आपल्या मावशीकडे येऊन राहिले होते. इथेच त्यांनी सर्व शास्त्रांचा अभ्यास केला आणि शिवा–संभा यांच्या फडातून काम केले. सुरुवातीला त्यांनी नाच्याचे काम केले. परंतु पुढे पुढे ते स्वत: रचना करून गाऊ लागले, तेव्हा त्यांनी नाच्याचे काम सोडून शाहिरी करण्यास सुरुवात केली.

भंगारी आणि गेनवा शिवा–संभा यांच्या फडात होत्या. त्याच सुमारास पवळाबाई हिवरगावकर ही पहिली अस्पृश्य स्त्री तमाशातून काम करू लागली होती. पवळा तमाशात कशी आली आणि तिच्या आयुष्यात काय काय घडामोडी घडल्या यावर माझी पत्नी सौ. कांता अचलखांब हिने १९८२ च्या 'अस्मितादर्श' च्या दिवाळी अंकातून सविस्तर प्रकाश टाकलेला आहे. नामा धुलवाडकर यांच्या फडात पवळा असताना हा फड मुंबई मुक्कामी गेला होता. तिथे पठ्ठे बापूराव यांनी पवळास बघितले आणि ते तिच्यावर अक्षरश: मोहित झाले. पुढे त्यांच्या विनंती-वरून पवळा पठ्ठे बापूराव यांच्या फडात सामील झाली.

पठ्ठे बापूराव हे कलगीवाले तर भाऊ फक्कड हे तुरेवाले. त्याकाळी कलगीतुरेवाल्यात सारखे सामने घडून येत असत. भाऊ फक्कड आणि पठ्ठे बापूराव यांचा सामना सुद्धा मुंबईत दीर्घ काळ चालला होता. या अटीतटीच्या सामन्यात भाऊ फक्कड यांनी पठ्ठे बापूराव यांचा पराभव केला. आणि त्यांना अक्षरश: सळो की पळो करून सोडले होते. असे कितीतरी शाहीर होऊन गेलेले आहेत, जे सुरुवातीच्या काळात नाचे होते, परंतु पुढे आपल्या प्रतिभेच्या जोरावर ते शाहीर बनले व नावारूपाला आले.

सुप्रसिद्ध शाहीर परशुराम यांच्या फडात नारायण शिंपी आणि भवानी तेली हे दोन नाचे होते, ज्यांनी परशुरामानंतर त्यांची परंपरा सातत्याने पुढे टिकवून ठेवली. शाहीर परशुराम या नाच्यांना घेऊन मुलुख-गिरी करीत असत. फत्तेसिंग गायकवाड तसेच सयाजीराव गायकवाड यांच्या दरबारात नाच्या पोरांचा तमाशा करून परशुराम यांनी महाराजांची मर्जी हासिल केली होती. परशुराम यांचे निधनानंतर तर नाच्या पोरास साज चढवून त्यांच्या अंत्ययात्रेत सहभागी करून घेतले होते.

पूर्वी आताच्या सारखे तंबू कनातीचे तमाशा फड नव्हते. उघड्यावर हजारो प्रेक्षकांसमोर हे फड होत.

त्यात काम करणारे एक सरदार, एक ढोलक्या, एक सोंगाड्या, दोन सुरते आणि एक नाच्या एवढे कलावंत असत. त्यातही नाच्या हा फडाचे खास आकर्षण असायचा. सध्या जसे विठा भाऊ बापू मांग नारायणगावकर किंवा हौसा मंजुळा कोल्हापूरकर या स्त्रियांच्या नावाने फड ओळखले जातात किंवा त्या नावाने प्रसिद्ध आहेत, त्याचप्रमाणे पूर्वी नाच्याच्या नावाने तमाशा ओळखला जाई.

गण झाला की ढोलक्या प्रेक्षकांसमोर येऊन मानेला झटका देऊन छातीवर लोंबणारा पटका मागे फेकणार आणि ढोलकीच्या पानावर काड काड बोटं टाकणार. या ठेक्यावर दोन हात उंचावून पडावाच्या शिडासारखा पदर उंचावत प्रथम पाठ प्रेक्षकाकडे करून नाच्या ठुमकत ठुमकत प्रवेश करणार. ढोलकीची लय जसजशी वाढत जाणार तसतसा नाच्या आपल्या शरीराच्या हालचाली चपलतेने वाढविणार. जोपर्यंत तो आपले तोंड आमनेसामने करणार नाही तोपर्यंत आमचे रसिक फेटे, टोप्या सावरून, अगदी दम रोखून इंतजार करणार. एकदा का त्याने प्रेक्षकाकडे तोंड फिरविले आणि एक नखरेल अदा पेश केली की समदे गारच झाले म्हणून समजा.

नऊवारी लुगडे, त्याचा नीटनेटका काष्टा, अंगात खडीची चोळी, कमरेला कमरपट्टा, हातात पाटल्या, गळ्यात पुतळ्या, कानात झुबे आणि बुचड्यात मोठा गजरा असा या तमाशातील नाच्याचा एकंदरीत वेष. हा साज चढवून डोळ्यात काजळ घालून नाच्या पुढे ठाकला की असं वाटणार जणू काही एखाद्या राजाची राजकन्याच अवतरली आहे.

तमाशातील नाच्यांचे नृत्य हे भारतीय नृत्यकलेपेक्षा फारच वेगळे आहे. त्याचे आपले असे स्वतंत्र वैशिष्ट्य आहे. गौरीत माहेरी आलेल्या मुली जसा खेळ खेळतात त्याला कोल्हापूर, सांगली भागात "भुरला" तर मराठवाड्यात "सकरुबा" म्हणतात. तशा हालचाली नाच्या करतो. कमरेत लचक, गोलगोल चकरा मारून मध्येच मानेचा झटका देणे असे प्रकार त्याच्या नृत्यातून दिसतात. असे प्रकार आपल्याकडील झिम्मा, फुगडी किंवा कोंबडा या स्त्रियांच्या खेळामधूनसुद्धा पाहावयास मिळतात.

गण आणि नाच्याशी सलामी झाली की गवळणीला सुरुवात होते. या गवळणीत सोंगाड्या मावशीची तर नाच्या राधेची भूमिका करीत असतो. बाजाराला निघत असताना प्रेक्षकांसमोर तर असतात दोघेच; परंतु आपल्या संवादातून आणि अभिनयांतून ही दोघं असा आभास निर्माण करतात की, जशा काही सोळा सहस्त्र गवळयांच्या नारी मथुरेच्या बाजाराला निघाल्या आहेत. तसा तमाशातून स्थळ, काल आणि वेळेचा निर्देश हा संवादातून आणि अभिनयाद्वारेच केला जातो. उदा. रंगमंचावरच एक-दोन गोल गोल चकरा मारल्या की आले पुणे शहर किंवा आला राजेसाहेबांचा राजवाडा असे म्हटले जाते. प्रेक्षकांनीसुद्धा आपल्यापुढे पुणे शहर किंवा राजवाडा आला आहे असे गृहीत धरावयाचे असते. तर मथुरेच्या बाजाराला जात असताना मध्येच कोण आली, कोण आली नाही याची विचारपूस मावशी आणि राधा एकमेकीत करतात. तेव्हा चंद्रावळ अजून आलेली दिसत नाही असं मावशी म्हणते. मग या चंद्रावळीला बोलावण्यासाठी राधा झालेला नाच्या टिपेच्या आवाजात—

बाजार मोठा लवकर गाठा
मथुरेच्या हाटा चला निघा निघा गं (धृ)
वरच्या आळीच्या चंद्रावळीच्या
फळीला जाऊन सांगा गं
आरंभाला विलंब झाला
सूर्यबिंब वर आले बघा गं.

अशा प्रकारची हाळीची गवळण म्हणतो. तर पुढे हाच नाच्या श्रीकृष्णाने अडविल्यावर—

सोड रस्ता आमचा हरी
जाऊ दे बाजारी मुरारी
सोड मस्करी.

अशी विनवणीची गवळण म्हणतो. आणि जेव्हा श्रीकृष्ण ऐकायला तयारच नसतो, तेव्हा तो—

आला रात्री मुरलीवाला गं झोपेच्या भरात [धृ]
नणंद सोप्यात निजली माझी ।
जाऊ आणि धाकूटं दाजी ।
मामुजीसह सासुजी गं
मधल्या दारात (१)
आमुची थट्टा करी अचाट ।



अनुक्रमणिका

दाढी वेणीची मारुनी गाठ।
चारी देशी मिरवुनी थेट गं
काढिली वरात (२)

अशा प्रकारची कृष्णाच्या खोडया सांगणारी गवळण म्हणतो.

श्रीकृष्ण फारच हटून बसलेला आहे. बाजारास जाऊ द्यायला तयारच नाही. कारण त्याला आपले असली दान हवे असते, म्हणून राधा–

मनमोहना तुझ्या वेणूनं मन मोहिले (धृ)
वेडावली राधा भोळी।
अवघ्या गोपिकांची टोळी।
विसरूनिया साडी चोळी गं (१)
स्तब्ध राहिले.

अशा प्रकारचे श्रीकृष्णाचे गुणगान करणारी गवळण राधा झालेला नाच्या म्हणत असतो.

तमाशात विविध प्रकारच्या गवळणी असतात. उदा. बाजाराला निघण्याची, श्रीकृष्णाने अडविल्यावर त्याची स्वतःची ओळख पटविण्याची, नंतर गवळणींनी आपली ओळख पटवून देण्याची, श्रीकृष्णाच्या खोडया सांगण्याची, त्याच्या विनवणीची किंवा त्याचे गुणगान करण्याची गौळण यांचा प्रामुख्याने समावेश असतो. श्रीकृष्ण आपली ओळख पटवून देतांना जी गवळण गातो ती सोडून बाकीच्या जवळजवळ सर्वच गवळणी नाच्यास गाव्या लागतात.

गवळण झाली की, रंगबाजीला सुरुवात होते. या रंगबाजीत दोन मित्र, त्यांच्यापैकी एकाची बायको आणि नायकीण ही प्रमख पात्रे असतात. यांपैकी मित्राची बायको आणि नायकीण या दोन्ही भूमिका नाच्याच करीत असतो. दोघे मित्र जेव्हा मुलुखगिरी करण्यासाठी शहरात येतात, तेव्हा तेथे ते नायकिणीच्या वाडयावर गाणं ऐकण्यासाठी जातात. या ठिकाणी मात्र स्त्री श्रेष्ठ की पुरुष श्रेष्ठ असा झगडा नायकीण आणि दोघे मित्र यात होत असतो. हा झगडा पूर्वी अगदी उत्स्फूर्त असा असायचा. त्याची कुठल्याही प्रकारची पूर्वतयारी झालेली नसायची. यात नाच्या आणि सरदार या दोघांचेही कसब पणाला लागत असे.

रंगबाजी झाली की, मुख्य वगाला सुरुवात होते. या वगात कधी राजकुमारी, कधी राजमाता, तर कधी शिपायाची बायको अशा बहुविध भूमिका नाच्या करीत असतो,

पूर्वी मराठवाडा भागातून नाच्यास "टाक" देण्याचा प्रकार असे. "टाक" म्हणजे रंगबाजीतील गाणे चालू असताना प्रेक्षकांमधून एखादा शौकीन बहाद्दर शिट्टी वाजविणार. ज्याने शिट्टी वाजविली असेल, त्याच्या-जवळ हा नाच्या नाचत नाचत जाणार आणि त्याच्या मांडीवर बसणार. मग तो शौकिन नाच्याच्या हातात रुपयाची नोट देणार. ही नोट हातास उंच करून 'धोंडीराम भावजीचा टांगा आला, गं बाई टांगा आला' असं म्हणत नाचत नाचत आपल्या सोंगाड्या-पर्यंत जाणार. तिथे गेल्यावर बायको जशी आपल्या नवऱ्याच्या नावाने उखाणा घेते तसा ज्याने नोट दिली असेल त्याच्या नावाने–––

बारीक वाळू चाळणीनं चाळू
धोंडीराम भावजी आणि मी
बाई गं पलंगावर खेळू

अशा प्रकारचा उखाणा घेणार. या टाक देण्यावरून पैसेवाल्यात कधी मारामाऱ्या सुद्धा होत असत. आपल्या गावी तमाशा यावा म्हणून ज्या गावी तमाशा असेल तिथून नाच्यास पळविणे किंवा यातून त्याच्यावर अति-प्रसंग उद्भवणे असे अनेक प्रकार घडत असत. या सर्व प्रकाराला हा कलावंत नाइलाजाने तोंड देई.

खानदेशातील अपवाद वगळता, अलीकडे उघडे तमाशे फारसे राहिलेले नाहीत. त्याचबरोबर नाचेसुद्धा उरले नाहीत. कारण आपल्या प्रेक्षकांची अभिरुची फार बदलून गेलेली आहे. तो उघडा तमाशा बघण्यास उत्सुक नाही. त्याची अभिरुची तंबू–कनातीमधील नर्तकीकडे वळली असून तिच्या तोंडून सिनेमातील भिकार गाणे ऐकण्याचे तो पसंत करतो. उघडे तमाशे गेले. त्यातील नाच्या गेला आणि त्याचबरोबर जुने छक्कड लावण्या, झगडे, कटाव, छंद, आर्या, सवाल्या आणि फटकेसुद्धा लोप पावले. अनतफंदी, रामजोशी, होनाजीबाळा, परशराम, भाऊ फक्कड यांचा, त्यांच्या रचनांचा केव्हाच विसर पडत चालला आहे.

जेव्हा उघडया तमाशाचे फड बंद होऊ लागले, तेव्हा त्यातील इतर तमासगीर मंडळी फडाच्या तमाशातून कामे करू लागली नाच्यावर मात्र वाईट प्रसंग गुदरले. म्हातारपणात तर कितीतरी नाचे हातात एकतारी घेऊन एस. टी. स्टॅण्डवर भीक मागताना मी स्वतः पाहिले आहे.

**टीप : या लेखामध्ये समाविष्ट केलेल्या काही रचना या भाऊ फक्कड आणि शिवा-संभा कवलापूरकर यांच्या आहेत.** ▭

डॉ. गो. रा. कामतकर

# लोकहितवादी, दिल्ली दरबार व रावबहाद्दूर पदवी....

[ एक संशोधनात्मक टिपण ]



पुण्याचे कै. महादेव बल्लाळ नामजोशी यांचे 'किरण' साप्ताहिक अवघे दोनच वर्षे टिकले. त्याचा पहिला अंक २६ ऑगस्ट १८७७ रोजी बाहेर पडला आणि १४ मार्च १८७८ चा लॉर्ड लिटनचा देशी भाषांतील वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करणारा 'नववा ॲक्ट' लागू होताच किरण'ची इतिश्री झाली. 'ज्ञानचक्षू' व 'ज्ञानप्रकाश' यांच्याशी समकालीन असणारे हे साप्ताहिक आपल्या अल्प आयुष्यात महाराष्ट्राच्या प्रबोधनकाळावर आपल्या लेखणीचा अक्षर-ठसा उमटवून गेले असे म्हणावयास चिंता नाही.

ह्या 'किरण' मध्ये २ सप्टेंबर १८७७ च्या अंकात ठाण्याहून आलेल्या 'वर्तमानसारा'त लोकहितवादींच्या संदर्भात एक बातमी ठळक अक्षरात छापलेली आढळते ती अशी :

" लिहिण्यास आनंद वाटतो की येथील जाइंट जज्ज मि. गोपाळराव हरी देशमुख यांस गव्हर्नर जनरल यांनी रावबहादूर हा किताब दिला. व तो देण्याचा विधी येथील जिल्हा जज्ज मि. काघलन यांजकडे सोपविल्यावरून येत्या . शनिवारी जज्जसाहेबांच्या कचेरीतच हा समारंभ होणार आहे. दिल्ली दरबारच्या वेळी पदव्यांचा जो लाट उडाला त्यावेळेस देशमुख यांची आठवण झाली नव्हती. ती पुण्यास लार्डसाहेब गेल्यावर त्यांस सहज होऊन हा प्रकार घडला . असावा असे वाटते." ( ठाणे, ता. ३० ऑगस्ट १८७७ )

लोकहितवादींच्या संदर्भात 'किरण' ने प्रकाशात आणलेली ही बातमी रूढ समजुतीला धक्का देणारी आहे. लोकहितवादींना 'रावबहादुरकी'ची मानाची फीत लॉर्ड लिटनच्या हस्ते दिल्ली दरबारात मिळाली असेच त्यांचे सर्व नवे-जुने सांप्रदायिक चरित्रकार सांगत आले आहेत. 'नेटिव ओपिनियन' ( १४ जानेवारी १८७७) दिल्ली दरबारात दिलेल्या पदव्यांविषयी माहिती देताना ह्या सर्वसाधारण समजुतीला दुजोराच देतो–

"...तारीख १ माहे जानेवारी रोजी दिल्ली येथे जे ग्याझेट आव इंडियाचे जादा पत्र निघाले आहे त्यात दिल्ली दरबारची व मुख्यत्वेकरून दरबारसमयी दिलेल्या पोकळ बक्षिसांची हकीकत दिली आहे."

प्रारंभी राज्यकर्त्यांना अशी कानपिळी देऊन पुढे पदव्यांची खिरापत कुणाच्या हातावर किती पडली याची नावनिशीवार नोंद पत्रकर्त्याने केली आहे. ह्या यादीत 'रावबहादूर' पदवी प्राप्त झालेल्यांची तीन नावे आढळतात.

" पहिले प्रोफेसर दाजी नीळकंठ नगरकर (पुणे),
दुसरे गोपाळराव हरी देशमुख (अमदावाद)
तिसरे प्रोफेसर केरो लक्ष्मण छत्रे (पुणे)..."

'नेटिव ओपिनियन' मधील ही बातमी कै. प्रियोळकरांनी लोकहितवादींच्या निबंध-संग्रहाच्या शतसांवत्सरिक आवृत्तीला लिहिलेल्या 'प्रास्ताविका'त काही खळखळ न करता शिरोधार्य मानली आहे. इतकेच नव्हे तर डॉ. फडकुले यांच्या लोकहितवादीवरील शोध निबंधातही दिल्ली दरबारच्या प्रसंगी गोपाळरावांना रावबहादूर ही पदवी शासनाने गौरवपूर्वक देऊ केली असाच उल्लेख आहे.

'नेटिव ओपिनियन'मध्ये आलेल्या बातमीत गोपाळ हरी देशमुखांच्या नांवापुढे 'अमदाबाद' असा निर्देश आहे. तो बिनचूक आहे. कारण ३ नवंबर १८६५ पासून सुमारे बारा वर्षे गोपाळरावांचे वास्तव्य अमदावाद शहरी होते. आणि तेथूनच ते दिल्ली दरबारला हजर राहिले. लोकहितवादींच्या ह्या दिल्ली-

भेटीबाबत शंका घेण्याचे कारण नाही. लॉर्ड लिटनच्या दिल्ली दरबारास ते उपस्थित होते यावद्दल दोन उल्लेख उपलब्ध आहेत. कृ. ना. आठल्ये ह्यांनी लिहिलेल्या लोकहितवादींच्या चरित्रात (१९२६) खालील नाट्यपूर्ण प्रसंगाचे चित्रण आलेले आहे.

" गोपाळरावजी एके दिवशी नित्याप्रमाणे पोषाख करून बाहेर जाण्यास निघाले असता एका सलगीतल्या गृहस्थाने त्यांस विचारले की, "काय रावसाहेब ! आपण लॉर्ड लिटनच्या दिल्ली दरबारास गेला होता, तेव्हा कोणता पोषाख केला होता ?" गोपाळरावजींनी लगेच जवळच्या खुंटीवरचे लहानशा काठाचे जरीचे उपरणे होते ते ओढून अंगावर घेतले आणि म्हणाले, 'हा पहा असा !'" (पृ. १०८)

खुद्द गोपाळरावांनी आपल्या 'लोकहितवादी' मासिकात [जाने. फेब्रु. १८८४ × व. २ × अं. ४-५] पंडित स्वामी श्रीमद्दयानंद सरस्वती यांच्यावर लिहिलेल्या लेखात ह्या दिल्लीभेटीचा वृत्तांत दिला आहे. ते लिहितात, "सन १८७७ च्या जानेवारी महिन्यामध्ये दिल्ली येथे महाराणी सरकारच्या चक्रवर्तिनी पदधारणाचे संबंधाने लॉर्ड लिटन या प्रतिनिधींचे अध्यक्षतेखाली जो बडा दरबार झाला त्या समारंभास श्रीमत्पंडितवर्य स्वामी दयानंदजी व बाबू केशवचंद्रसेन हे उभयताही सत्पुरुष त्या काळी निमंत्रित केले होते. त्यावेळी त्या उभय धर्मोपदेष्टयांच्या परस्पर भेटी होऊन एकमेकांस एकमेकांचे मत कथन करण्यात आले. त्यावरून उभयतांच्या विद्वत्तेच्या व त्यांचे धर्माभिमानाच्या मूलोद्भवास आधारभूत असणाऱ्या महाग्रंथांचा सर्व जमलेल्या लोकांस खुलासा झाला. या समयी सुदैवयोगे आमचेही तेथे जाणे झाले असल्यामुळे त्या उभय महोपदेष्टयांच्या भेटीचा अपूर्व योग व त्यांची परस्पर संभाषणे आमच्याही पाहण्यात व ऐकण्यात आली..."

तेव्हा लोकहितवादींची दिल्ली दरबारातील उपस्थिती संशयातीत आहे. फक्त त्यांना मिळालेली 'रावबहादूर' पदवी त्यावेळी मिळाली की 'किरण'च्या बातमीप्रमाणे ती ठाण्याच्या काघलन साहेबांच्या हस्ते ते ठाण्यास सेशन्स जज्जांच्या मदतीकरिता आले असताना मिळाली हा खरा प्रश्न आहे. प्रियोळकरांनी नोंदलेल्या माहितीप्रमाणे नाशिकला गोपाळरावांची बदली २५ फेब्रुवारी १८७७ रोजी 'जॉइंट आणि सेशन्स जज्ज' म्हणून झाली हे खरे. तथापि नाशिक हे त्यांचे त्यावेळी मुख्य ठाणे असले तरी मधून मधून ठाण्यास किंवा अलिबागेस त्यांना तेथील सेशन्स जज्जाच्या मदतीकरिता जावे लागे. या संदर्भात गोपाळरावांच्या स्मरण-वहीतील नोंदीच्या आधारे प्रियोळकरांनी काढलेले निष्कर्ष महत्त्वाचे आहेत :

" १ जुलाई १८७७ रोजी देशमुख ठाण्यास मदतीसाठी गेले.

७ जुलाईस सेशनाकरिता देशमुख अलिबागेस गेले.

२० जुलाईस ठाण्यास परत आले.

२४ डिसेंबर १८७७ रोजी देशमुख पुणे, पंढरपूर वगैरेकडे फिरावयास जाऊन १ जानेवारी १८७८ रोजी ठाण्यास परत आले."

— [ निबंधसंग्रह : प्रस्तावना × पृ. २६ ]

गोपाळरावांच्या स्मरणवहीतील नोंदीवरून असे स्पष्ट दिसते की २० जुलाई १८७७ ते २४ डिसेंबर १८७७ या कालावधीत ते ठाण्यास सेशन्स जज्जांचे सहाय्यक म्हणून काम करीत होते. 'किरण' ने ठाण्याच्या 'वर्तमानसारा'त दिलेली बातमी ३० ऑगस्ट १८७७ ची आहे. म्हणजे स्थळकाळाचा मेळ जुळतो. पण मग 'नेटिव ओपिनियन'ने गॅझेट झालेली म्हणून छापलेली बातमी खोटी म्हणावयाची का ? या प्रश्नाचे उत्तर 'किरण'च्या पेचदार कोपरखळीत सापडेल.

"दिल्ली दरबारच्या वेळी पदव्यांचा जो लाट उडाला त्यावेळेस देशमुख यांची आठवण झाली नव्हती. ती पुण्यास लॉर्डसाहेब गेल्यावर त्यांस सहज होऊन हा प्रकार घडला असावा..."

राज्यकर्ते लाटसाहेब आणि दिल्ली दरबारी गोळा झालेली लोकहितवादीसारखी राजनिष्ठांची मांदियाळी यांना—

'विलूनना्सिकस्यादर्शदर्शनम् ।'

ह्या न्यायाने 'किरण'कर्त्यांनी जणू हा शालजोडीतला आहेरच दिला आहे. ज्याचे नाक कापलेले आहे अशा माणसापुढे 'आता पाहा कसा दिसतोस ते !' असे म्हणून आरसा धरावा तसाच लेखणीचा हा फटकारा उभयतांना बसला आहे असे वाटते.

निष्कर्षादाखल तूर्त इतकेच म्हणता येईल की लोकहितवादींना रावबहादूर पदवी केव्हा मिळाली, कुठे मिळाली आणि कोणाच्या हस्ते मिळाली यांसारखे प्रश्न गोपाळरावांच्या चरित्राच्या अभ्यासकांपुढे निर्माण करून 'किरण'कर्त्यांनी त्यांना हे एक नवे आव्हानच दिले आहे. ▭

ल. रा. नसिराबादकर

# अजुनी चालतोचि वाट ! माळ हा सरेना



विपुल कविता लिहूनही रसिक, समीक्षक आणि अभ्यासक यांच्याकडून केवळ उपेक्षाच ज्यांच्या वाटचाला आली, असे कवी म्हणजे एकनाथ पांडुरंग रेंदाळकर. रेंदाळकर हे केशवसुतसंप्रदायी कवी. पण दिसते असे, की केशवसुत, गोविंदाग्रज, बालकवी हे



रेंदाळकर

हे प्रामुख्याने प्रकाशात राहिले. समीक्षारूपाने त्यांचाच अधिकांश अभ्यास होत राहिला. काव्यगुणदृष्ट्या त्यांची कविता त्या तोलामोलाची आहेच. तरी पण युगप्रवर्तकांसोबत त्या त्या काळात स्वगुणांच्या बळावर कार्य करणाऱ्या इतर अनेकांचीही वाटचाल होतच असते. तत्कालीन समाजजीवनाचे वस्त्र विणण्यात त्यांचाही काही वाटा असतो. समाजजीवनातला हा संकेत कमी-अधिक प्रमाणात साहित्यक्षेत्रालाही लागू पडतो. वरील कवींप्रमाणेच, वाचक–अभ्यासकांचे लक्ष ज्यांच्याकडे गेले नाही असे रेंदाळकर, दत्त, माधवानुज यांसारखे इतर कवीही आपल्या काव्यनिर्मितीने मराठी कवितेचे दालन समृद्ध करीत होते, पण अभ्यासाच्या दृष्टीने ते अज्ञातवासातच राहिले, एवढे खरे.

## उपेक्षेतून निर्माण झालेले नैराश्य

रेंदाळकरांच्या कवितेची उपेक्षा समकालीनांकडून झाली, तशी उत्तरकालीनांकडूनही झाली. रांगट प्रकृतीचा व उद्दाम वृत्तीचा कवी म्हणून त्यांची संभावना करण्यात आली, आणि त्यांची ही प्रतिमा पुढेही तशीच राहिली, रेंदाळकरांच्या उपेक्षेचे जे वातावरण तत्कालीन साहित्यविश्वात निर्माण झाले होते, त्याच्या परिणामापासून माडखोलकरांसारखे टीकाकारही सुटले नाहीत. रेंदाळकरांच्या मृत्यूनंतर-देखील त्यांच्या काव्यसंग्रहास प्रस्तावना लिहिण्याचे धाडस माडखोलकरांना कसे होत नव्हते, हे त्यांच्याच शब्दांत पाहण्यासारखे आहे : 'दोन वर्षांपूर्वी रेंदाळकरांच्या कवितेला प्रस्तावना लिहिता का, म्हणून जेव्हा त्यांनी (रेंदाळकरांचे स्नेही आणि त्यांच्या कवितेचे संग्राहक श्री. वामन जनार्दन कुंटे ) मला विचारले, तेव्हा ती गोष्ट एकदम कबूल करणे मला थोडे अवघड वाटले. कारण, रेंदाळकरांविषयी आदरा-पेक्षा अवज्ञेचे शब्द माझ्या कानावर अधिक पडले होते, आणि त्यांच्यासंबंधाने उपेक्षेचीच वृत्ती सामान्यत: दृष्टीस पडे. (रेंदाळकरांची कविता, प्रथम खंड, आवृत्ती दुसरी, फलटण १९४०, प्रस्तावना, पृ. १.)

रेंदाळकरांची कविता तत्कालीन वाचकांना जवळची असूनही दूरची वाटली असावी. कारण केशवसुतपूर्व

आणि केशवसुतोत्तर अशा दोन्ही काव्यपरंपरेचे, प्रवृत्तीचे संस्कार रेंदाळकरांच्या कवितेवर झालेले आहेत. केशवसुतांनंतर आणि गोविंदाग्रज काव्यक्षितिजावर येण्याअगोदरचा जो काळ गेला, त्यात लेखन करणाऱ्या रेंदाळकरांची कविता जुने–नवे असे सरमिसळ रूप घेऊन अवतरली होती. आणि काही काळ ती लोकप्रियही झाली होती. निर्यमकतेचा अपवाद वगळता तिच्या एकूण अभिव्यक्तीचे रूप जुने असले, तरी तिच्यातला जीवनानुभवाचा स्फुलिंग नवा होता. नुकत्याच पुढे आलेल्या केशवसुती कवितेचा प्रभाव तत्कालीन कवींवर कसा पडत होता, आणि अभिव्यक्तीचे जुने घाट मनात रुतून बसलेल्या कवींचा जीवनानुभव अभिव्यक्तीचे संमिश्र रूप कसे धारण करत होता, याच्या स्पष्ट खुणा रेंदाळकरांच्या कवितेत पाहावयास मिळतात.

'उघडि नयन ! रम्य उषा हसत हसत आली.' अशा एखाददुसऱ्या कवितेतून रेंदाळकरांची उल्हसित आशावादी वृत्ती प्रकट झाली, तरी त्यांच्या बहुतांश कविता दाट निराशेने काळवंडलेल्या आहेत. मनाचा आत्यंतिक हळवेपणा, परंपरांना आणि बंधनांना झुगारणारी रोमँटिक वृत्ती, ध्येयवादित्व, (यातूनच आलेला काहीसा एककल्लीपणा), त्यांचे विचार आणि (काव्यविषयक) प्रयोग यामागील भूमिका समजावून न घेता समाजाने केलेली टवाळी, टीका–प्रतिटीका, त्यातून निर्माण झालेले भावनिक ताण–तणाव, आणि यात भर म्हणूनच की काय कौटुंबिक जीवनातले विस्कटलेपण यामुळे रेंदाळकरांच्या मनातील व पर्यायाने कवितेतील निराशा गडद दाट होत गेली. समाजाने केलेली उपेक्षा आणि अवहेलना यांचे शल्य उरात ठेवूनच त्यांचे काव्यलेखन झालेले दिसते.

समाजाविषयी रेंदाळकरांची जी तिरस्काराची भावना निर्माण झाली, तीमागे त्यांना आलेला समाजाचा कटु अनुभवच आहे. भूमीचा थर भेदून झाडे वर येतात, आणि चंचल ओढे व प्रचंड सरिता सतत वरून खाली धावत असतात. म्हणूनच उन्नतीचे स्वरूप केवळ बाह्य गोष्टींवरून निश्चित होत नाही. पण मूढ समाज मात्र अनेकदा उन्नतीलादेखील अधोगतीच समजतो. लोकमत सागराच्या भरती-ओहोटीसारखे असते. लोकव्यवहार म्हणजे शुद्ध बाजार. म्हणून समाजावर विश्वास ठेवण्यात किंवा त्याच्या मनाला किंमत देण्यात रेंदाळकरांना अर्थ वाटत नाही. चिंतनातून सिद्ध झालेले आपले मत अशा समाजापुढे मांडले, तर ते 'वाऱ्यावरी पर्णसे' उडून जाते. अशा अनुभवामुळेच शहाणपणाला तुडवणाऱ्या या सत्तेपुढे सज्जनांनी नमण्याची गरज नाही, असे रेंदाळकरांना वाटते. 'बोलो काहि समाज, मान हृदया ! जें आपले, ते खरे' अशी त्यांची ताठर वृत्ती तयार होते. दुसऱ्यांना भिऊनच आमची मने खुरटली आणि घरातल्या सौख्याला आम्ही मुकलो. समाजातला व्यवहार, सभ्यपणा म्हणजे केवळ रौरव. त्याला पायदळी तुडवून पुढे दृष्टी टाकली तरच स्वर्गाचे दर्शन होईल. ('गुप्त स्वर्ग'). म्हणूनच 'निंदो कोणि म्हणो कसेहि' तिकडे केव्हाहि पाहू नये। लोकांच्या शिरिं पाय देउनि सुखें स्वर्गांत जा चालत' असा निर्वाळा ते देतात. हळूहळू रेंदाळकरांच्या वृत्तीत ताठपणा येत जातो. सरलवृत्तीतून प्रतिकारार्थ आलेला हा ताठपणा कधी कधी प्रक्षोभकही बनतो. संघशक्तीच्या बळावर हे 'रानातले लांडगे' शांतोची मृग-पाडसे करकरा चावून टाकतात, याची रेंदाळकरांना चीड येते. संतप्ततेला तीव्रतेची आणि कडवटपणाची धार येऊन समाजाचे उपहासपूर्ण वर्णन अवतरते, ते असे :

पोरे नाचत होती बाळिशपणें स्वच्छंद जीं एकदा  
त्यांना दाढिमिशा फुटून बनलीं तीं थोरली माणसें ।  
ज्ञानाचे भरपूर माप पदरीं घेतीं वयोवर्धनें  
कोणाहीवर तोंड टाकिती पुढें उन्मत्त कुत्र्यापरी !  
(समाज आणि व्यक्ती)

('उन्मत्त कुत्रे,' 'रानातले लांडगे' ही समाजविषयक विशेषणे पुढे 'खातेऱ्यातील सूकर' पर्यंत चढत्यावाढत्या श्रेणीने येतात. त्यातून रेंदाळकरांच्या अनुभवाची तीव्रता जशी प्रकट होते, तशी त्यांची वाढती असहिष्णुताही दिसून येते. समाजाने केलेली व्यक्तिविषयक आणि काव्यविषयक निंदा हळव्या आणि असहिष्णू रेंदाळकरांना पचविणे अवघड होते. आपल्या निंदकावर आणि टीकाकारांवर फूत्कार टाकून त्याच्या धिक्काराची भाषा बोलतात. आपले काव्य तुच्छ लेखून पायी तुडविण्याबद्दल रेंदाळकरांची 'गाऊं काय अशा जनांस्तव ? वर्नी पाषाण नाहींत का ? जे निंदा करितात निष्ठुर

मनें– धिक्कार त्यांना असो ! ' अशी कठोर प्रतिक्रिया आहे.

या कालखंडातील भारतीय तरुणांच्या मनावर पुरोगामित्वाचा, उदारमतवादाचा संस्कार घडविण्यास इंग्रजी विद्याच बहुतांशाने कारणीभूत ठरली होती, हे स्पष्टच आहे. रेंदाळकरांनी इंग्रजी कथा–कादंबऱ्या आणि वैचारिक लेखन वाचलेले होते. (' इंग्रजी विद्येचा संस्कार त्यांना मुळीच झालेला नव्हता. ' हे माडखोलकरांचे विधान मान्य करावे, अशी परिस्थिती नाही. रेंदाळकरांचा इंग्रजीचा व्यासंग कसा होता हे त्यांनी आपले मित्र श्री. ना. ग. नवरे यांना दि. २४ डिसेंबर १९१८ रोजी लिहिलेल्या पत्रावरून स्पष्ट होते.) त्यांच्या सुधारणावादी विचारांची घडण अशा वाचनातूनच झाली असावी. मिल्लच्या Subjection of Women च्या आधारे ' स्त्रियांची परवशता ' हा ' धर्मविचार ' मासिकात त्यांनी लिहिलेला लेख वरील विचाराला पुष्टी देतो. ' कोरांटीची फुले, ' ' दीनात्मे, ' उपचाराचे प्रावल्य, यांसारख्या कवितांतून त्यांची सुधारणावादी वृत्ती प्रगट झाली आहे. कवितेला यमकाचे आणि स्त्रीला रूढीचे बंधन नसावे, असे रेंदाळकरांचे मत होते या दोन्ही मतांचा पुरस्कार त्यांनी आपल्या कवितेतून केला. त्याला जसजसा विरोध होऊ लागला, तसतसे पुरस्काराचे रूपांतर आवेशात, आणि आवेशाचे अतिरेकात होत गेले. त्यातून त्यांच्या स्वभावातील पीळ आणि एककल्लीपणाही प्रकट झाला. कवितेतील विचारातून समाजाशी जो दुरावा निर्माण झाला, तो वाढायला या एककल्लीपणाची मदतच झाली. तत्कालीन समाजजीवनात सुधारणेचे वारे खेळू लागले असले, तरी एकंदरीत समाजाशी झगडा हा सुधारणावाद्यांच्या कुंडलीतील महत्त्वाचा ग्रह होता. सुधारणाविचाराने प्रेरित झालेल्या रेंदाळकरांच्या सौंदर्यवादी कविमनाला असा विरोध सहन करणे अवघडच होते. ते त्यांच्या कुवतीबाहेरचेही होते. यातून आलेली निराशा (आणि त्यासोबतच उपरोधही) त्यांच्या कवितेत येणे अटळ ठरले.

### वरपांगी उद्दाम पण आतून हळवे

आपल्या आजवरच्या गीतांच्या झालेल्या अवहेलनेचे दुःख रेंदाळकरांच्या मनात खोलवर रुतून बसले होते. टीकाकारांविषयी धिक्काराचा उद्दामपणा वरकरणी, त्यांनी प्रकट केला असला, तरी त्यांच्या हळव्या मनातले काव्याचे अंकुर त्यामुळे करपून गेले. गाण्याच्या ऊर्मी उसळल्या तरी त्या आतल्या आत दाबून टाकाव्या, काव्याचे झोत जेथल्या तेथे जिरवून टाकावे असे ते आपल्या हळव्या आणि स्वाभिमानी मनाला शिकवू लागले (' नाहीच कधी गाणार '). येथल्या लोकांच्या काकदृष्टीत दयेचा लेशही नाही. शुद्धतेला काळिमा फासून ते राहतात. जानकीसारखी सतीही येथे निंद्य होते. म्हणून पातक्यांची सडलेली मने शुद्ध करण्याचे आवाहन ते आकाशस्थ देवतांना व तारकांना करतात. अंबरात सांडलेल्या तेजाचा स्पर्श जरी या जिवांना झाला, तरी ते शुद्ध होतील, अशी त्यांची धारणा आहे.

वारंवार सहन करावी लागणारी निंदा, अवहेलना, उपेक्षा; निर्वाहासाठीची ओढगस्त यांतून रेंदाळकरांची निराशा वाढत गेली, तिला दाहकतेचा आणि असहायतेचा पदर साक्षात पत्नीच्या हातूनच लावला जावा, यासारखा दैवदुर्विलास तो कोणता ? रेंदाळकरांच्या वाट्याला तोही आला. सुखी संसाराची स्वप्ने पत्नीच्या आजारपणामुळे तर विस्कटली गेलीच. पण त्यासोबत तिचा विक्षिप्त आणि हेकट स्वभाव त्यांना अधिक तापदायक ठरला. ' देवी, मार्दववर्धनास्तव जगीं त्वज्जन्म झाला असे ' असे कधी चुचकारून, काहीशा वत्सलपणे ते तिला शिकवीत; तर कधी ' थोडें काही घडो, लगेच रुससी, अश्रू जसे ठेविले। या भोळ्या हसऱ्या फुलाजवळुनी गे शीक काहीतरी ' (' पुष्प आणि स्त्रिया') अशी असहाय्यपणे तक्रार करीत समजूतही घालत. समाजाच्या बाहेरच्या विरोधापेक्षा प्रपंचातल्या पत्नीचा असा हा विचित्र असहकार त्यांना अधिक ताप देणारा आणि असहाय्य बनविणारा होता. या दुःखाने गात्रे गळून गेली, शक्तीही संपली, डोळ्यात प्राण आले. नशिबी काय आहे, कळत नाही. पण ' गळाला धीर, चालले प्राण बाहेर ' (' गंगेसाठी ') अशी असहाय्यता रेंदाळकरांनी प्रकट केली आहे.

समाजाच्या टीकेला उद्दाम उत्तरे देणाऱ्या रेंदाळकरांच्या मनात निराशेचा असा खोल डोह तयार होत होता. येणाऱ्या अनुभवातून स्वविषयक नगण्यपणाची, न्यूनगंडाची भावना त्यात भर घालत होती. पुढे, तोच

त्यांच्या कवितेचा स्थायीभाव बनून त्यांच्या 'कवितेतून अवतरला. त्याच्या पुसटशा खुणा त्यांच्या प्रदीर्घ कवितांमधूनही उमटल्या. 'गुणहीन अशा मला जवळ कोण घेणार? मी इतका गुणहीन की रानातली काटेरी फुलेही माझ्याकडे बघून हसत नाहीत' असे ते सांगतात. तत्त्वज्ञानाचे ग्रंथ वाचून मनाला प्रसन्नता आली नाही की ईश्वरपूजनाने कधी शांती लाभली नाही. म्हणून विश्वपतीची अपेक्षा न ठेवता आपण थेट तुला शरण आलो आहोत, असे ते यमुनेला सांगतात ('यमुनागीत'). 'शिरक्यांची तारा' ही रेंदाळकरांची प्रदीर्घ (पण अपूर्ण) कविता. तिच्यातही नायिकेच्या दुःखावस्थेच्या वर्णनातून नकळत रेंदाळकरांच्या मनातल्या निराशेचा, उदासपणाचा आविष्कार झाला आहे.

## रोमँटिक प्रवृत्ती

रोमँटिक मनाला जाणवणारी वास्तवाची बंधने आणि अज्ञाताची ओढ यांनी रेंदाळकरांच्या निराशेचा आणखी एक पदर गुंफला आहे. बालकवींनी पुढे 'दिव्या'ला गायिली तशी गाणी रेंदाळकरही गातात. पण 'दिव्या'च्या मागे लागून वास्तवाला झिडकारणाऱ्या मनाची होणारी ससेहोलपटच त्यांच्या कवितेतून अधिक प्रकट होते. क्षितिजावरील ताऱ्याच्या ओढीने भूमीवर तेवणाऱ्या दिव्याला दूर ठेवणाऱ्या त्यांच्या सौंदर्यवादी वृत्तीची अवहेलना जग करते. प्रवाहपतितांप्रमाणे प्राप्त परिस्थितीत राहण्यात कवीला समाधान नाही. सुधारवादाचे वेड लागलेले त्याचे मन क्षुद्र सुखांना भुलायला तयार नाही. मेघांचे विमल तोयच पिणाऱ्या चातकाचा बाणा ते स्वीकारते. एक वेळ 'दिव्या'चा लाभ झाला नाही तरी चालेल, पण क्षुद्र सुखाला भुलणे नाही, असा त्याचा निर्धार आहे. ('माझें दिव्य'). या सर्वांचा अपरिहार्य परिपाक दुःखरूपाने त्यांच्या वाट्याला येतो.

अष्टदिशांच्या भिंतीत आकाशाचे झाकण घातलेल्या भीषण कारागृहात दुर्विधीने आपल्याला देहाच्या बंधनात कोंडून ठेवले आहे, असे कवीला वाटते. सर्वत्र अंधार पसरला असून 'माझेंही मज रूप कळेना' अशी त्याची स्थिती होते. जीर्ण नभाला भोके पडून पलीकडला प्रकाश केव्हा तरी त्याला दिसतो. तेव्हा कारागृहातून सुटून त्या 'मधुरसाकुल नवल आशांच्या आणि प्रीतिशांतीच्या सदनात जाण्याची प्रबळ ऊर्मी त्याला येते. ते शक्य होत नाही तेव्हा मृत्यूशिवाय अन्य पर्याय नसल्याची त्यांची खात्री होते. 'या नरकातुनि करील का तो मज मुक्त?' असा उदास प्रश्न ते करतात. (कारावद्ध). 'शांतिनिकेतन' असणाऱ्या मृत्यूची ते उत्कंठेने वाटही पहातात. मधून मधून अनंताचे भासही त्यांना होतात. दुःखाने त्रस्त झालेले त्यांचे मन 'त्याच्या'साठी आक्रंदते. पण 'तो' भेटत नाही. निळ्या विछान्यावर बसून नवनवी गाणी गाणाऱ्या तारकांचे निराळेपण आपल्याला मिळावे म्हणून कवीचे मन आसावते. पण करकचलेल्या बंधनांच्या स्मरणाने ते निपचित पडते. 'माझे ते मजपासुनी निसटुनी गेले पळोनी तसे' असा विचित्र अनुभव त्याला येतो. 'असे ठरुनि राहिले तृणहि येथ माझे। असेंच जगिं एकलें वसुनि कंठणे जीवित' अशा एकाकी, व्यथित आणि उदास मनःस्थितीचे दाट सावट रेंदाळकरांच्या बहुतेक कवितांवर पडलेले आहे.

> 'आजुबाजूस काळा फत्तर
> तुटके वरुनि कडे डोकावति
> झुडुप सानहि न हो दृग्गोचर'

अशा ओसाडपणातून वाहणारा क्षीण ओढा आणि चालून चालूनही न संपणारा माळ ही त्यांच्या जीवनानुभवाची प्रतीके अस्वस्थ करणारी आहेत.

वास्तव जगातले बंध, संकुचितपणा आपल्या कल्पनांच्या राज्यात रेंदाळकर झुगारून देतात. अमर्याद, व्यापक, सर्वसमावेशक अशा आपल्या राज्याचे ('माझें राज्य') चित्र ते रेखाटतात. या राज्यात भीती नाही, बंध नाही, रूढीची जाचक बंधने तोडून येथे यावे, कोणताही भेदभाव न ठेवता एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून स्वच्छंद बनून गाणी गावी आणि गुंगत, डोलत अनंतात विलीन व्हावे, असे ते म्हणतात. रोमँटिक वृत्तीतून निर्माण झालेल्या रेंदाळकरांच्या या कवितेचे आकलन नीट न करून घेता त्यांच्या जवळच्याच कविमित्राने त्यांच्यावर विपर्यस्त टीका केली. (ही टीका रेंदाळकरांच्या मृत्यूनंतर झाली, हे त्यातल्या त्यात बरे.) त्यावरून त्यांच्या अन्य कवितांतील नैराश्याची चांगली कल्पना येऊ शकते.

## निर्यमक रचनेचा गदारोळ

रेंदाळकरांच्या निर्यमक कवितेच्या प्रयोगाने मराठी कवितेला काही योगदान केले असले, तरी त्याचे श्रेय त्यांना आपल्या हयातीत तरी मिळाले नाही. उलट त्यांच्या जीवनात त्याने एका नव्याच संघर्षाची भर घातली. 'डबक्यात पडलेले फूल' ही त्यांची पहिली निर्यमक कविता प्रसिद्ध झाली, आणि परंपरेचे खिदमदगार असलेले कवी आणि टीकाकार रेंदाळकरांवर तुटून पडले. 'रेंदाळकर हे कवीच नाहीत' येथपर्यंत या टीकेची मजल गेली. या कवितेतील फुलांवर किडे तुटून पडतात आणि लचके तोडून त्याचा जीव अर्धा करतात. कमी-अधिक अशीच स्थिती या टीकेमुळे रेंदाळकरांच्या मनाची झाली असल्याचे त्यांच्या नंतर लिहिलेल्या कवितांवरून दिसते. जड शब्दांनी, गणवृत्तांनी आणि निर्बल यमकप्रासांनी कवितारमणी मृतप्राय झाली आहे. शास्त्र पुढे ठेवून काव्य रचणाऱ्या कवींचे आलेले पीक पाहून 'कठोर कोमल शब्द पहावे, वृत्तांच्या साच्यात भरावे, यमकप्रासी बहु नटवावे, काढुनी छाती कवि म्हणुनि जगी मिरवावे' असा उपहास रेंदाळकरानी केला आहे. ('खरी कविता'). ज्यात काव्य नाही असे लेखन आपण गौण मानतो, म्हणून लोक मलाच वेडा ठरवतात, अशी तक्रार ते करतात. ('वृथा निंदक आणि कवी'). समाजातल्या भडकलेल्या विद्वेषाग्नीत सुखे होरपळून निघाल्यावर या दुःखप्रचुर भुवनी कवीने कशासाठी रहावे, असा त्यांचा पुढला प्रश्न आहे. 'कविच्या उन्नत हृदयासम तत्परिवार कोठुनि मिळतो ? ढळतो घृतिनग म्हणुनी नैराश्यें हाय जीव तळमळतो' ही वेदना उरात ठेवूनच ते काव्यक्षेत्रात वावरलें. टीकेमुळे आणि उपेक्षेमुळे त्यांची निराशा अशी कडवटपणात बदलत गेली.

निर्यमक कवितेच्या प्रयोगामागील रेंदाळकरांची भूमिका किती प्रांजल आणि समर्पणशील होती हे त्यांच्या पुढील शब्दांतून स्पष्ट होते. 'यमके ही रसनाशक आहेत, असेच जरी माझे मत नसले, तरी त्यामुळे प्रतिपादित विषयात काही अपूर्व माधुर्य उत्पन्न होते, असे मला तरी वाटत नाही. मराठी कवितेचा जन्मापासूनच इतिहास पाहिला, तर यमकबद्ध असणे हा तिचा धर्मच आहे, असे दिसते. पण याकरिताच आधुनिक कविवर्गानेही यमके साधलीच पाहिजेत, हा दुराग्रह आहे. आता कदाचित मजसारख्या कवीच्या निर्यमक कविता वाचून त्या वाचकांस नीरस वाटत असतील. तो माझा दोष आहे, यमकाभावाचा नाही. देवाच्या दयेने मराठीचा लवकरच एखादा राष्ट्रीय कवी निर्माण होईल, आणि त्याच्या निर्यमक कविताही लोक मोठ्या प्रेमाने वाचून माना डोलवतील. अशा कवीचा मार्ग सोपा व्हावा म्हणून मजसारख्या कवीची खडी रस्त्यावर पसरावी लागते.'–दुर्दैवाने तत्कालीन मराठी कवी आणि टीकाकार यांच्याकडून ही भूमिका लक्षातच घेतली गेली नाही. यानिमित्त झालेल्या टीकेचा सर्जनशील मनावरील काही एक भावनिक परिणाम अटळ होता. त्याने रेंदाळकरांच्या निराशेत कडवटपणाचे, उपहासाचे आणि कधी उद्दामपणाचे रंग मिसळण्यास मदतच झाली.

रेंदाळकरांच्या कवितेतून प्रकट होणाऱ्या नैराश्याची संगती त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या आणि अनुभवांच्या अनुरोधाने अशी लावता येईल. उण्यापुऱ्या तेहेतीस वर्षांच्या आयुष्यातला एका संवेदनाशील, स्वाभिमानी, लाजिरवाण्या तडजोडी न स्त्रीकारणाऱ्या आणि सामाजिक उपेक्षेचे बळी ठरलेल्या मनाची ही कहाणी आहे. उपेक्षेला पुरून उरण्याइतका कणखरपणा रेंदाळकरांच्या व्यक्तिमत्त्वात नव्हता. त्यांच्या वृत्तीत एककल्लीपणा आणि अभिव्यक्तीत रांगडेपणा व उपरोध जरूर आहे. पण त्यांच्या संतप्तपणाला असहायतेचे, विफलतेचे, हताशपणाचे विळखेही आहेत. हळुवार मनाची घरी–दारी कुठेच न राखली गेलेली बूज; निर्वाहाच्या प्रश्नांनी सतत केलेला पाठलाग; पदरात पडलेला सांसारिक जीवनातील अपेक्षाभंग; काव्यलेखनाच्या स्वातंत्र्याची समाजाने केलेली मुस्कटदाबी आणि घोर उपेक्षा; त्याविरुद्ध स्वाभिमानी मनाने वळलेल्या मुठी आणि अखेर पत्करलेले हताशपण; आणि शेवटी या आत्म्याची दुबळ्या देहानेही सोडलेली साथ-संगत अशा अनुभवांची अनेकविध स्पंदने या निराशेतील आवर्तात आहेत. हे लक्षात घेतले तर 'अजुनि चालतोचि वाट ! माळ हा सरेना, विश्रान्तिस्थल केव्हा यायचे कळेना' ही त्यांची केवळ एका अनुभवापुरती मर्यादित, स्वतंत्र अशी कविता राहत नाही. रेंदाळकरांच्या सामाजिक, काव्यविषयक जीवनाचा, त्यांच्या असफल वांच्छितांचा, हताशपणाचा तो परिपाक वाटतो. त्यांच्या समग्र जीवनातील व्यथांचे पर्व त्यामागे उभे राहते. वाटचाल करीत जीवनसंध्या आली, तरी रेंदाळकरांचा माळ संपला नाही. आणि अजूनही त्यांच्या उपेक्षेचे पर्व देखील!



अनुक्रमणिका

# ग्रंथपरीक्षण

: १ :

## सामान्यांच्या अस्तित्वाला अर्थ देणारे—'फकिराचे अभंग'

वसंत सावंत

'फकिराचे अभंग' हा एकूण ८० अभंगरूप कवितांचा, कवी फ. मुं. शिंदे यांचा नवा संग्रह. प्रथमदर्शनी या संग्रहाची नजरेत भरावी इतकी निर्दोष छपाई, सूचक मुखपृष्ठ आणि त्याचा सुटसुटीत आकार लक्षात येतो. या संग्रहापूर्वीच आपल्या अनेक संग्रहांमुळे, आजच्या आघाडीच्या कवीत फ. मुं. शिंदे यांचे नाव मानमान्यता पावलेले आहे. एक विशिष्ट सामाजिक भान राखून कवितालेखन करणाऱ्या कवींमध्ये फ. मुं. शिंदे दुर्लक्षित करता येण्यासारखे नाहीत. कारण भीषण सामाजिक व राजकीय वास्तवाला भिडण्याची ताकद ज्या कवींमध्ये आहे, अशा कवींत, फ. मुं. शिंदे आपले स्थान गौरवाने राखून आहेत. मराठवाड्याच्या राजकारणात व समाजकारणात त्यांचा काही एक सक्रिय सहभाग असतो असे कळते. चावटिका व राजकीय उपहासिका लिहिणारे, व त्या श्री. रामदास फुटाणे या कविमित्राबरोबर सादर करून स्वतंत्र काव्यवाचनाचे कार्यक्रम साधणारे कवी म्हणूनही ते प्रसिद्ध आहेत. 'खानदेशाचा मळा व मराठवाड्याचा गळा' हा त्यांचा एक नवा कार्यक्रम आज त्यांच्या खुसखुशीत सूत्रसंचालनामुळे विशेष उल्लेखनीय वाटावा.

'फकिराचे अभंग' हे विचित्र नाव धारण करणाऱ्या कवितांचा संग्रह तसा कवीचेच नाव लावतो. 'फकिराचे दोहे' वगैरे नाव जरा समुचित. 'फकीर आणि अभंग' काही वेगळा न्यास सांगणारे. शिवाय, आपल्या कविता संग्रहाचे नाव आपण ठेवले तरी आपले नाव ठेवणे आपल्या हातात नसते; हेही खरे! तसा नावाचा संबंध इतका उलगडून सांगायचे कारण, 'अभंग' हा खास मराठी वाङ्मयप्रकार आहे. आणि मुळात ज्या संतकवींनी तो मराठी मातीत व मनात रुजवला, त्याची मूळ रचना करताना 'नामा म्हणे' किंवा 'तुका म्हणे' अशी नाममुद्रा ठोकून तो रचला आहे. तशी 'नाममुद्रा' गोवणे हा एक त्या रचनेमागील संकेत आहे. या ठिकाणी या अभंगातून फ. मुं. म्हणे अशी नाममुद्रा शेवटच्या ओळीत ठोकली गेली असती, तर या सर्व अभंगांना ज्योतिवांसारख्या 'अखंडां'ची एक वेगळीच चव आली असती असे मला वाटते.

दुसरे म्हणजे, या संग्रहाच्या मलपृष्ठावर महात्मा जोतीराव फुले यांच्या 'सार्वजनिक सत्यधर्म' पुस्तकांतील उतारा छापला आहे. तो या कवितासंग्रहातील कवीची काव्यलेखनामागील भूमिका व कवितेकडे पाहण्याची कवीची विशिष्ट दृष्टी व्यक्त करतो असे म्हणता येईल. संतकवीपासून मर्ढेकरांपर्यंत ज्यांना ईश्वराबद्दल वा आपल्या जीवनाबद्दल, समाजाबद्दल वा माणसाबद्दल काही महत्त्वाची प्रतिती नोंदवावीशी वाटली त्यांनी संतवाणीचा केलेला वापर स्पष्ट आहे. विशेषतः ओवी वा अभंगाचा. कारण अभंग हा मराठी मनातील आशयाच्या अभिव्यक्तीचा एक स्वाभाविक छंद आहे. महात्मा फुल्यांचा 'अखंड' हा 'माणसा'ची महत्ता गाणारा आहे. त्याचे अभंग सदृशत्व स्पष्ट आहे. मर्ढेकरांप्रमाणेच फ. मुं. शिंदे आपल्या अभंगरूप कवितांच्या शेवटच्या ओळीत नाममुद्रा न गोवणारे कवी आहेत. या अभंगांना त्यांची म्हणून खास काही वेगळी चव आहे यात शंका नसावी.

पण एका अर्थी ही कविता मुळी एकट्या फ. मुं. शिंदे यांची नाही. ती अखंड समष्टीचीही आहे. आणि फाटलेला माणूस, समाज, तिच्या केंद्रीभूत आहे. एकूण "जेलखान्यातलेच आपणही कैदी आहोत असं वाटा-

यला लावणारे स्वातंत्र्य अखेर कोणाच्या बाजूनं ?" हा सुरुवातीच्या पृष्ठावरील रास्त प्रश्न आणि त्याची उलगडच पुढील संग्रहाची निर्मिती साधताना दिसेल. या दृष्टीने आपल्या लोकशाही राष्ट्रात फाटलेला माणूस, पोखरून दुभंगलेला समाज आणि त्याला कारणीभूत होणारे सत्तांधांचे खुनशी डावपेच कवीच्या जाणिवेचा ठाव घेताना दिसतील. या दृष्टीने या फकिराचे अभंग देवाचे नसून फाटलेल्या माणसाचे आहेत असेच मानणे भाग आहे. आणि अगदी पहिल्या अभंगापासून तहत शेवटपर्यंत कविमनाची थडथडती नाडी शब्दातून व्यक्त होत राहते. 'स्वातंत्र्याने दिले मरण हातात' – 'वर्ष उगवते नव्या सरणाचे रचित रणाचे मनसुबे...' ही कवीच्या आजच्या युद्धग्रस्त जगाची प्रतीती रास्त वाटते. या युद्धाने शेवटी मिळवलेले स्वातंत्र्य 'सत्तासिंहासन शक्तीचे अगर, म्हणून जागर गल्लोगल्ली' चाललेला कवीला दिसतो आहे. हे 'स्वातंत्र्य दहशतीखाली वाहते पखाली सत्तेच्याच' हा प्रत्यय सारीकडे दिसावा.

आज जातीयवाद हा युगधर्म ठरू पाहतो आहे. त्यामुळे 'जो तो आपली क्षुद्रता जपतो, जातीत लपतो सुरक्षित." हे कवींचे निरीक्षण चुकीचे नाही. या दृष्टीने 'जात एक शक्ती... गोत एक शक्ती... अनाथास मुक्ती अभावाने' असे कवीला स्वाभाविकपणे वाटते. 'चोर आणि साव नाही भेदभाव, भुकेवर घाव कमाईचा... स्वराज्यात पोट लागते पाठीला, गांधीच्या काठीला समर्पित–' ही कविमनाची उद्विग्नता कुणीही समजू शकेल.

या सत्तालोलुप लोकशाहीच्या व स्वातंत्र्याच्या युगात सामान्य माणसाचे कल्याण बाजूलाच राहून त्याची झालेली अगतिक अवस्था कवी...'आहेस कुठे तू सामान्य माणसा असूनही कसा नसलेला ?' अशी चित्रित करतो आणि म्हणतो– 'सत्तेचा खंडोबा वटारून डोळे–तुम्ही आम्ही लुळे सदोदित...असे सत्य सांगतो. 'सदा सर्वकाळ यमाशी संवाद मनाचे पोलाद वितळते' असे दुर्बळ मन व त्याची असहाय्यता यांना वाचा फोडू पाहतो. आणि विचारतो. 'लोक म्हणताना नक्की ते कोणते ? लोकशाही विते ज्यांच्यातून ?' कवीचा हा रोखठोक सवाल मननीय वाटेल.

या दृष्टीने या अभंगाचा एक चिंतनशील जाणिवेचा खास पदर आहे. हे चिंतन लोकशाहीचा प्रधान घटक– माणूस, त्याचे जीवन, समाज, राष्ट्र, यांतील द्वंद्वावर, संघर्षावर व त्याच्या मूळ कारणावर नेमके बोट ठेवणारे आहे. श्री. शिंदे यांचा मूळ कलंदर पिंड आपल्या बेछूट भाषेत त्याची नेमकी अभिव्यक्ती करतो. समाजात हरघडी वावरणारे, संघर्षाला तोंड देत राहणारे हे व्यक्तिमत्त्व त्यामुळेच रसिक मनाला भुरळ घालणारे ठरेल. या जगात 'सत्ता' मिळवण्यासाठी 'वंशावंशातला देशादेशांतला युद्धवेषातला हाहाकार' कवीला अस्वस्थ करतो आहे. शरण जाण्याची भाषा आता जुनी झाली.अहिंसेला हिंसेचा आधार लागतो आहे हे सत्य कवी उघडया डोळयांनी पाहतो आहे. हुकुमावरून लाथा झाडल्या जातात. आणि टेकवलेला माथा निर्घृणपणे फोडण्यात धन्यता मानली जाते. माणसाचे अस्तित्वच खलास केले जाते. गिधाडांना मुडद्यांचा वास येत राहतो ही कवीची निरीक्षणे आजच्या रोज वर्तमानपत्र वाचणाऱ्या आणि बातम्या ऐकणाऱ्यांनाही सहज पटावीत. 'तरी लाठीमार, तरी गोळीबार होतो वारंवार कशासाठी ?हा कवीचा रोखठोक प्रश्न दैनंदिन जीवनात सहज ऐकू यावा. श्री. फ. मुं. शिंदे यांच्यासारख्या जागृत कविमनाची आज त्यामुळेच गरज वाटते.

या संग्रहातील प्रारंभापासून अंतापर्यंतचे अभंग व त्याची रचना ६।६।६।४ अशा अक्षरगटांनी साधली आहे. तो सुभग आहे. अशी छंदोमय निर्दोष रचना एकूण आज दुर्मिळच.दुसरे म्हणजे आशयाला अनुकूल अशी रोखठोक भाषा हे या रचनेचे एक वैशिष्टच ठरावे. कुठेही, सहसा कृतिमता जाणवत नाही. क्वचित एखादा अभंग लांबलेला वाटू शकेल. कवीच्या वाहत्या, उद्विग्न मनावरोबर शब्द येत राहतात– 'काठावर कधी थांबले का पाणी' हा या कवीचा स्वभाव आहे. 'चाललो सोसत जन्माच्या वेदना काय आता कुणा निरुपावे?' या कवीच्या उक्तीत कवितेचे मर्म सांगता येईल. 'अस्तित्वाचा अर्थ खुडलेला, म्हणणाऱ्या कवीची कविता सत्तेच्या कराल दाढेखाली चिरडणाऱ्या सामान्यांचा आवाज सतत उठवीत राहील आणि अस्तित्वाला अर्थ देईल, यात काय शंका ? यासाठी कवीने मात्र स्वतःला कधी आखून घेऊ नये असा मित्रत्वाचा सल्ला द्यावासा वाटतो...

(फकिराचे अभंग : कवी **फ. मुं. शिंदे**,
प्रकाशक सुरेश एजन्सी, पुणे.
मूल्य वीस रुपये)

: २ :

## अमराठी भाषकांसाठी उपयुक्त ग्रंथ–' लर्निंग मराठी '

### डॉ. दत्तात्रय पुंडे

भारताने लोकशाही राज्यपद्धती स्वीकारल्यावर भाषावार प्रांतरचना करणे अपरिहार्य झाले. लोकांना समजणाऱ्या भाषेतून लोकशासनाचा कारभार चालावा आणि खऱ्या अर्थाने लोकशाही नांदावी यासाठी भाषावार राज्ये स्थापणे आवश्यक होते. त्यानुसार १९५६ मध्ये भारतातील राज्यांची भाषावार पुर्नरचना झाली. महाराष्ट्र–गुजरातच्या वाटयाला हे भाग्य येण्यासाठी १९६० हे साल उजाडावे लागले. भारत हे एकसंघ, अखंड राष्ट्र असल्याने कोणाही भारतीय नागरिकास कोणत्याही राज्यात जाऊन राहाण्याची, नोकरी व्यवसाय करण्याची संधी भाषावार प्रांतरचनेत अबाधित राहिली. उलट आपल्या राज्यात येऊन स्थायिक झालेल्या किंवा होऊ इच्छिणाऱ्या परप्रांतियांना राजभाषा शिकण्याच्या दृष्टीने सुविधा निर्माण करून देण्याची जबाबदारी प्रत्येक राज्यावर आली. भारतीय राज्यांनी ही जबाबदारी कशी व कितपत पेलली याचा अभ्यास व्हायला हवा. उदाहरणार्थ असा प्रश्न उपस्थित करता येईल की, महाराष्ट्र राज्याने आपल्या राज्यातील अमराठी भाषकांच्या मराठी भाषाशिक्षणाची काय सोय केली आहे? महाराष्ट्राने आपल्या भाषा संचालनालयातर्फे फक्त शासकीय सेवेतील अमराठी कर्मचाऱ्यांना मराठी शिकविण्यासाठी काही पावले उचलली इतकेच काय ते खरे. शासनाबाहेरील उद्योग– समूह आणि अन्य यंत्रणा यांनी शासनाशी मराठीतून पत्रव्यवहारादी देवाणघेवाण करावी अशी खरे तर खुद्द महाराष्ट्र शासनाने वेळोवेळी अपेक्षा व्यक्त केली आहे. पण त्या उद्योगसमूहांतील किंवा यंत्रणातील अमराठी भाषकांच्या मराठी भाषाशिक्षणाची शासनाकडून काही सोय झाल्याचे दिसत नाही. खरे तर शासनयंत्रणेच्या बाहेरच्या उद्योगव्यवसायांमध्ये कितीतरी मोठया संख्येने अमराठी भाषक आहेत. त्यांचा शासनाशी जसा संबंध येतो तसा महाराष्ट्रातील तमाम मराठी भाषकांशीही प्रत्यक्ष–अप्रत्यक्ष संबंध येत असतोच. अशा संख्येने मोठया असणाऱ्या अमराठी भाषकांच्या मराठी भाषाशिक्षणाची काहीही सोय आपण गेल्या पंचवीस सव्वीस वर्षांत केलेली नाही ही मराठी भाषा विकासाच्या दृष्टीने किती गंभीर गोष्ट आहे! मध्यंतरी प्रा. गं. बा. सरदार, डॉ. अशोक रा. केळकर, प्रा. वसंत दावतर इत्यादी जाणकार मान्यवरांनी 'मराठी भाषा विकास संस्था' स्थापन करण्यासंबंधाने एक तपशीलवार योजना महाराष्ट्र शासनास सादर केली होती. परंतु 'गरज नाही' या अभिप्रायानिशी ती योजना शासनाने बासनात गुंडाळून ठेवल्याचे कळते. वास्तविक अशा एखाद्या अर्धशासकीय संस्थेमार्फत महाराष्ट्रातील अमराठी भाषकांच्या मराठी भाषाशिक्षणविषयक गरजा भागविण्याचा स्थिर स्वरूपाचा कार्यक्रम हाती घेता आला असता.

लोकशासन जे काम करू शकत नाही (किंवा करू इच्छित नाही) ते लोकसंस्थांनी हाती घ्यावे असा एक अलिखित संकेत आहे. त्यानुसार मुंबई मराठी साहित्य संघ आणि महाराष्ट्र साहित्य परिषद या दोन संस्थांनी या संदर्भात केलेले कार्य नोंद घेण्यासारखे आहे. साहित्य संघ गेली दहा-एक वर्षे मुंबईतील अमराठी भाषकांसाठी मराठी भाषाशिक्षणाचे कार्य करीत आहे. संघाच्या या उपक्रमाला मुंबई महानगरपालिकेचे 'अर्थपूर्ण साहाय्य' लाभत आहे. पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेने असे वर्ग चालविण्याचा प्रयत्न प्रथम १९७०–७१ मध्ये आणि नंतर १९८१–८२ मध्ये केलेला आहे. दोनचार वर्षे चालून 'पुरेशा प्रतिसादाअभावी' परिषदेचा हा उपक्रम बंद पडला, ही चिंतेची बाब आहे. पुणे महानगरपालिकेने या संदर्भात महाराष्ट्र साहित्य परिषदेला विश्वासात घेऊन काहीतरी करायला हवे.

लोकशासन आणि लोकसंस्था यांचे प्रयत्न जेथे अपुरे राहातात, तेथे विचारशील नागरिकांनी आपली जबाबदारी ओळखून काही कार्य करावे असे म्हणतात. या दृष्टीने मराठी व्यक्तींनी काही अमराठी भाषकांच्या मराठी भाषाशिक्षणासाठी काही पाठयपुस्तकांची निर्मिती केलेली आहे, ही समाधानाची गोष्ट आहे. डॉ. नरेश कवडी, डॉ. सुहासिनी लड्डू, डॉ. विजया चिटणीस, श्रीमती मॅक्सीन बर्सिन व जाई निमकर अशी काही नावे

चटकन डोळ्यासमोर येतात. याच रांगेतील नवी दोन नावे म्हणजे डॉ. कल्याण काळे व डॉ. अंजली सोमण. डॉ. काळे व डॉ. सोमण या दोघांनी मिळून 'लर्निंग मराठी' हे पाठ्यपुस्तक अलीकडेच तयार केले आहे.

'लर्निंग मराठी' हे डॉ. काळे व डॉ. सोमण यांनी प्रौढ अमराठी भाषकांच्या मराठी भाषाशिक्षणासाठी तयार केलेले खास पाठ्यपुस्तक आहे. या पुस्तकाची अनेक वैशिष्ट्ये सांगता येतील. त्यापैकी पहिले आणि महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे या पुस्तकात समाविष्ट असलेला अभ्यासक्रम या दोन्ही लेखकांनी सतत तीन वर्षे शिकविलेला आहे. त्यामुळे विद्यार्थ्यांचा त्याला मिळालेला प्रतिसाद लक्षात घेऊन, त्यांच्या अध्ययनविषयक गरजा ध्यानात घेऊन लेखकांना आपला अभ्यासक्रम पुस्तकरूपाने सादर करण्यापूर्वी सुधारून घेण्याची संधी मिळालेली आहे. पाठ्यक्रमाची प्रथम प्रयोग-चाचणी घ्यावी मगच पाठक्रम तयार करावा, हे शिक्षणशास्त्रातले तत्त्व इथे आपोआप पाळले गेले आहे.

काळे–सोमणांच्या समोरील विद्यार्थीवर्ग प्रौढ तर होताच, पण तो नोकरी-व्यवसायांच्या बाबतीत निरनिराळ्या क्षेत्रांत वावरणारा होता. अशा संमिश्र प्रौढ विद्यार्थ्यांच्या मराठी भाषाशिक्षणविषयक गरजा लक्षात घेऊनच काळे–सोमणांना आपले पाठ खास पद्धतीने रचावे लागले. त्यामुळे त्यांचे हे पाठ्यपुस्तक स्वाभाविकपणे गरजपूर्ती करणारे (नीड बेस्ड) पाठ्यपुस्तक झालेले आहे. प्रौढांसाठी आखलेला भाषाविषयक अभ्यासक्रम हा गरजपूर्तीचे उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवून आखलेला असावा हे शिक्षणशास्त्रातील सूत्रही येथे पाळले गेल्याचे दिसते.

या पुस्तकातील पाठ काल्पनिक वा यादृच्छिक घटनाप्रसंगांवर आधारलेले नसून त्यामध्ये मराठी माणसांच्या जीवनक्रमात आढळणाऱ्या खऱ्याखुऱ्या घटनाप्रसंगांचा वापर केलेला आहे. भाजीबाजार, सकाळचे फिरणे, किल्ले पाहायला जाणे, लग्नसमारंभ इत्यादी मराठी समाजातील दैनंदिन व नैमित्तिक घटनांप्रसंगांच्या आधारे काळे–सोमणांनी आपल्या पाठांची रचना केलेली आहे. यामुळे अमराठी भाषक विद्यार्थ्याला मराठी भाषेबरोबरच मराठी संस्कृतीची ओळख होण्यास मदत होणार आहे. कोणतीही भाषा शिकताना त्या भाषकांच्या संस्कृतीची ओळख होणे आवश्यक असते. कारण भाषा ही काही अभावातून जन्मणारी आणि अभावात वावरणारी गोष्ट नव्हे. भाषा ही समाज व संस्कृती यांच्याशी एकजीव झालेली घटना असते. त्यामुळे भाषा शिकणे म्हणजे ती ती संस्कृतीच शिकणे, असे म्हणता येते. म्हणूनच मराठी माणसाच्या जीवनातील प्रसंगांचा वापर करून काळे–सोमणांनी केलेली पाठांची रचना आदर्श ठरते.

या पुस्तकाचा लक्षणीय विशेष म्हणजे मराठीच्या लेखनासाठी वापरल्या जाणाऱ्या देवनागरी लिपीसंबंधाचे पाठ. अमराठी भाषकांसाठी देवनागरी लिपीची शास्त्रशुद्ध ओळख करून देणारे हे बहुधा पहिलेच पाठ्यपुस्तक असावे. देवनागरी लिपी सामान्यतः पारंपरिक पद्धतीने म्हणजे मराठी वर्णमालेनुसार शिकविण्याचा प्रघात आहे. 'लर्निंग मराठी'मध्ये मात्र लेखकांनी ही पारंपरिक पद्धत सोडून अक्षरांच्या साधर्म्यावर आधारलेली नवीच रीत वापरलेली आहे. लेखकांनी अक्षरसाधर्म्यावरून त्यांचे गट कल्पिलेले आहेत. मग प्रत्येक गटातील प्रत्येक अक्षर कसे काढायचे ते सांगितलेले आहे. अक्षराचे लेखन करताना अक्षराचे अवयव कोणत्या क्रमाने रेखाटायचे असतात हे पद्धतशीरपणे, एकेक अवयवरेखाटन क्रमाने दिग्दर्शित करून सांगितले आहे. अक्षर लेखनासंबंधाने या पुस्तकातील XII ते XX ही पृष्ठे खरोखर कुतूहलजनक ठरणारी आहेत. इतकेच नव्हे तर जिज्ञासू मराठी मातृभाषा असणाऱ्यांनाही येथील दिग्दर्शन लक्षात घेऊन आपले हस्ताक्षर सुधारता येईल. प्रत्येक अक्षरासमोर त्याचे क्रमाने अवयवलेखन दिल्यावर शेवटी कंसामध्ये त्याचे उच्चारणही श्रवणप्रत्ययी (रोमन) लिपीत दिले आहे. या पद्धतीमुळे अमराठी भाषकांना एकाच वेळी मराठी अक्षरांचे लेखन व उच्चारण लक्षात ठेवणे सहजसुलभ होणारे आहे, हे महत्त्वाचे.

'लर्निंग मराठी'मध्ये २३ क्रमवार अभ्यासपाठ आहेत. हे पाठ श्रेणीबद्ध आहेत आणि त्यातून मराठी भाषाशिक्षणाचे एक विकसित होणारे सूत्र राखले गेले आहे. अभ्यासपाठांची रचना लक्षवेधी आहे. पाठाच्या आरंभी सर्व प्रथम अध्यापन–घटक (टीचिंग युनिट्स) नोंदविलेले आहेत. त्यानंतर या अध्यपन घटकांना अनुसरणारी प्रत्यक्ष पाठ–संहिता दिलेली आहे. पाठ–संहितेच्या खाली पाठातून दिग्दर्शित होणारे व्याकरण-घटक दिलेले आहेत. यात पाठातील व्याकरणविषयक

भाग अधिक उदाहरणांच्या साहाय्याने स्पष्ट केलेला आहे. सगळयात शेवटी सरावासाठी प्रश्नपाठ (ड्रिल्स) दिलेले आहेत. पाठाची काळे–सोमणांनी स्वीकारलेली रचना सर्वांगसुंदर म्हणावी लागेल. कारण अशा पाठरचनेमुळे विद्यार्थ्यांना भाषेचा तो तो अध्ययन घटक सुलभतेने समजणे व सहजतेने आकलन होणे साध्य होणारे आहे.

अशा रीतीने काळे–सोमणांच्या 'लर्निंग मराठी' ची रचना प्रौढ अमराठी भाषकांना मराठी भाषा सहजतेने सुलभतेने व गरजपूर्तीच्या दृष्टीने शिकता/शिकवता यावी हे उद्दिष्ट डोळयासमोर ठेवून केलेली आहे आणि ती बऱ्याच अंशी सफलही झालेली आहे.

या पुस्तकाचे आणखी कौतुक करण्यापूर्वी यातील काही उणीवांकडे लक्ष वेधावेसे वाटते. या उणिवांपैकी काही उणिवा लेखकांच्या नजरेतून सुटलेल्या आहेत, तर काही कदाचित त्यांना न जाणवलेल्या अशा आहेत. पहिली गोष्ट म्हणजे काळे-सोमणांनी पुस्तकातील पाठांना त्या त्या पाठात वापरलेल्या घटनाप्रसंगांना अनुसरून नावे दिली आहेत. उदाहरणार्थ, 'वर्गाची स्वच्छता,' 'हुषार शेतकरी,' 'अपघात,' 'जावईबापूंची गोष्ट' इ. या नावांवरून त्या त्या पाठातून मराठी भाषेची कोणती सरणी शिकवली जाणार आहे याचा अजिबात बोध होत नाही. पुस्तकाच्या अनुक्रमणिकेतच पाठाच्या नावाखाली अध्यापन–घटक नोंदविणे शक्य होते. पण तसे केलेले नाही. त्यामुळे या पुस्तकाची अनुक्रमणिका शिक्षकांच्या व विद्यार्थ्यांच्या दृष्टीने फारशी उपयुक्त ठरत नाही. आणखीन म्हणजे पुस्तकात अध्यापन–घटकांची कोठेही सूची दिलेली नाही. त्यामुळे या पुस्तकातून कोणत्या पातळीपर्यंत भाषा अध्यापन होणार आहे हे कळणे सुलभ होत नाही.

या पुस्तकात लिपीपाठांचा समावेश असल्याचे व ते अक्षरसाधर्म्यावर आधारित असल्याने अध्ययनसुलभ असल्याचे वर नोंदविलेले आहेच. परंतु या लिपीपाठातील देवनागरी (आणि रोमन देखील) अक्षरे इतक्या मोठ्या व जाड ठशात (टाईपात) छापलेली आहेत की ती चक्क बालकांसाठी असलेल्या अंकलिपीच्या पुस्तकातल्या सारखी वाटतात. अमराठी प्रौढ वाचकांना ही छपाई रुचेलसे वाटत नाही. पण याहीपेक्षा आणखी लक्षात येण्यासारखी गोष्ट म्हणणे अलीकडे मराठीतील 'ल' या अक्षराचे लेखन हिंदीसाठी वापरल्या जाणाऱ्या 'ल' सारखे होते आहे. शालेय क्रमिक पुस्तकातून आणि अलीकडील टाईपसेटिंगद्वारा होणाऱ्या छपाईतून या नव्या 'ल' चा सर्रास वापर होतो आहे. त्यामुळे पूर्णतेच्या दृष्टीने लेखकांनी हा 'ल' निदान वैकल्पिक लेखनचिन्ह म्हणून तरी लिपीपाठात द्यायला हवा होता.

लेखकांनी या पुस्तकात सर्वत्र मराठी उच्चारणांचे श्रवणप्रत्ययी लेखन (रोमन श्रवणप्रत्ययी लिपीचिन्हांच्या आधारे) देण्याचा चांगला प्रयत्न केलेला आहे. परंतु खुद्द पुस्तकाच्या दर्शनी कव्हरपानांवरील मजकूर मांडणीतील श्रवणप्रत्ययी लेखन मात्र खूपच सदोष आहे. त्यामुळे पुस्तकभर काटेकोरपणे श्रवणप्रत्ययी लेखन उपलब्ध असूनही कव्हरपानामुळे त्याबद्दल गैरसमज निर्माण होतो.

शेवटी आणखी एक प्रश्न. 'ड्रिल्स' या शीर्षकाखाली लेखकांनी 'ड्रिल्स' आणि 'एक्सर्साईझेस्' अशा दोन्हीचाही अंतर्भाव केलेला आहे. वास्तविक 'ड्रिल' ही एक सामूहिक अभ्यासकृती आहे, तर 'एक्सरसाईस' ही वैयक्तिक अभ्यासकृती आहे. त्यामुळे त्यांची फारकत आवश्यक वाटते.

वरील उणिवा लक्षात घेऊनही काळे-सोमणांचे 'लर्निंग मराठी' हे अमराठी भाषकांच्या मराठी भाषाशिक्षणासाठी तयार केलेले एक सुंदर पाठ्यपुस्तक आहे, हे कबूल करावेच लागते. यातील पाठ तर सुरेख नि आदर्श आहेतच, पण पुस्तकाला जोडलेली चारही परिशिष्टे उपयुक्त आहेत. विशेषत: चौथ्या परिशिष्टात जवळजवळ १५०० शब्दांचा कोश दिलेला आहे आणि त्यातील बहुतांश शब्द मराठी समाजाच्या दैनंदिन वापरातील आहेत. या परिशिष्टांच्या अगोदर पुस्तकातील पाठाखालच्या प्रश्नांची उत्तरे दिलेली आहेत. त्यामुळे आपले आपण मराठी शिकू इच्छिणाऱ्या अमराठी प्रौढ व्यक्तींनाही हे पुस्तक उपयुक्त ठरणारे आहे. अशा रीतीने डॉ. कल्याण काळे आणि डॉ. अंजली सोमण यांनी 'लर्निंग मराठी' हे सुंदर पाठ्यपुस्तक तयार करून भाषाविषयक पाठ्यपुस्तक कसे तयार करावे याचा एक आदर्श नमुनाच आपल्यासमोर ठेवला आहे. या उपक्रमाबद्दल ते दोघे अभिनंदनास पात्र ठरतात.

Learning Marathi, by Dr. Kalyan Kale and Dr. Anjali Soman, Shri Vishakha Prakashan, Pune 30, 1986, Pages 28+231, Price Rs. 150–.





अनुक्रमणिका

: ३ :

## एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र—' एक दृष्टिक्षेप '

**एस्. एम्. कानडजे**

एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र : एक दृष्टिक्षेप ही म. श्री. दीक्षित यांची एक संदर्भपुस्तिका अलीकडे प्रसिद्ध झालेली आहे. दीक्षितांचा आणि पुण्याचा घनिष्ट संबंध आहे आणि पुणे ही महाराष्ट्राची सांस्कृतिक राजधानी आहे. अशा या ह्या पुणे शहराचा सर्वांगीण इतिहास लिहिण्याचा श्री. दीक्षितांचा संकल्प आहे. त्यानिमित्ताने पुणे शहराची संबंधित विविध घटना घडामोडींचा अभ्यास करण्याची त्यांची साक्षेपपूर्वक तयारी सुरू आहे. त्याचे एक आनुषंगिक फलित म्हणजेच प्रस्तुत पुस्तकाची निर्मिती हे होय.

क्रांतिकारी नव्या मनूचा पाया घालणाऱ्या अनेक महत्त्वाच्या घटना एकोणिसाव्या शतकातच घडलेल्या आहेत. ह्या महत्त्वपूर्ण विविध घटनांच्या सनवार नोंदी अगदी अचूक व काटेकोरपणे करण्याचा प्रयत्न दीक्षितांनी केलेला आहे. एकोणिसाव्या शतकाचा सर्वांगीण अभ्यास करू इच्छिणाऱ्यांना या नोंदीचा खचितच उपयोग होईल. ह्या नोंदी प्रामुख्याने पुणे—मुंबई या शहरातील घडामोडींना प्राधान्य देणाऱ्या आहेत. असे असले तरी त्यात भारतीय स्तरावरील काही महत्त्वाच्या नोंदींचाही समावेश आहे. इतकेच नव्हे तर जागतिक पातळीवरील काही महत्त्वाच्या घडामोडींचीही दखल येथे घेण्यात आलेली आहे.

ह्या नोंदीचे स्वरूप व्यापक, बहुमुखी, विविधांगी व सर्वसमावेशक आहे. राजकीय आणि सामाजिक घडामोडींना येथे महत्त्वाचे स्थान तर आहेच, पण त्याचबरोबर वैज्ञानिक, वैद्यकीय, धार्मिक, वाणिज्यविषयक, वाङ्मयीन, शैक्षणिक इत्यादी प्रकारच्या महत्त्वाच्या घटनांना येथे आवर्जून समाविष्ट करण्यात आलेले आहेत. म्हणूनच प्रस्तुत पुस्तिकेला सर्वंकषता लाभलेली असून, तिला उल्लेखनीय असे संदर्भमूल्य प्राप्त झालेले आहे.

(१९ व्या शतकातील महाराष्ट्र : एक दृष्टिक्षेप.
संकलक व प्रकाशक – **म. श्री. दीक्षित पुणे.**
पृष्ठे २४, मुल्य रु. ६)

## साभार स्वीकार

### चरित्र

**इदं न मम** : अनु. भागवत; पां. ना. बनहट्टी प्रकाशन, नागपूर; १९८६; रु. २५ ✩ **ऋणानुबंधाच्या गाठी**; स. गं. मालशे; सुपर्ण प्रकाशन, पुणे; १९८७; रु. ३० ✩ **ठक्कर बाप्पा** : गोविंद गारे : श्री विद्या प्रकाशन, पुणे; १९८७ रु. २० ✩ **बदलती क्षितिजे** : सुरेंद्रनाथ कांबळी; अनुभव प्रकाशन, मुंबई ५७; १९८७; रु. ८० ✩ **लाव्हा** : लता कामत; श्री विद्या प्रका. पुणे ३०; १९८७ रु. ४५ ✩ **डॉ. बाबासाहेब आंबेडकर** (जीवन व कार्य) : स्नेहसुधा कुलकर्णी; नीहारा प्रका. पुणे २; १९८७ रु. ६ ✩ **महर्षी कर्वे** : सौ. प्रतिभा लेले; नीहारा प्रका. पुणे २; १९८७ रु. ३ ✩ **पंडिता रमाबाई** : सौ. प्रतिभा लेले; नीहारा प्रका. पुणे २; १९८७ रु. ४

# पत्रसंवाद

मा. संपादक : ' महाराष्ट्र सा. पत्रिका '
पुणे ३० यांस,

स. न. वि. वि.

' भाषा–शोधन ' (भाषिक व्यवहारातील विवेक) हा डॉ. द. न. गोखले यांचा लेख (म. सा. पत्रिका : एप्रिल–जून १९८७) वाचला. भाषिकदृष्टीने व्यावहारिक आणि लिखित प्रवृत्तींची ही चर्चा अत्यंत उपयुक्त व भाषिक अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण आहे. विशेषत: प्रमाण भाषेचे ' नेमके रूप कोणते?' या संभ्रमावस्थेच्या पार्श्वभूमीवर सदर लेखात केलेली चर्चा उचित ठरावी.

भाषेच्या संदर्भात ' शब्द शुद्धि–अशुद्धी ' बाबतही फार मोठे घोटाळे वाचिक व्यवहारात पाहावयास मिळतात. याबद्दल लेखात अधिक विस्ताराने चर्चा झाली असती तर ती उपयुक्त ठरली असती. कारण प्रमाण मराठीत रूढ असलेले शब्द व बहिष्कृत शब्द यांवरच भर दिलेला आहे. प्रत्यक्षात प्राय: चकविणारे शब्द तर मराठीत विपुल प्रमाणात आढळतील. उदाहरणार्थ – पारितोषक–पारितोषिक, परोक्ष–अपरोक्ष, भाषक–भाषिक, मथितार्थ–मतितार्थ, सयुक्तिक–संयुक्तिक इ. शब्द संदेह निर्माण करणारे आहेत. वर निर्देश केलेल्या शब्दांत काही शब्द अर्थपरिवर्तनीय तर काही व्याकरणदृष्ट्या चुकीचे आहेत. वस्तुत: पारितोषक हा शब्द योग्य असताना व्यवहारात मात्र पारितोषिक शब्द रूढ झालेला आहे. तीच बाब ' मथितार्थ ' व ' सयुक्तिक ' शब्दांबाबत सांगता येईल. (पण भलेभले अभ्यासक आणि ' मराठीचे ' व्याख्याते देखील बऱ्याच वेळा ' मतितार्थ ' व ' संयुक्तिक ' असे चुकीचे शब्दपयोग करतात)

भाषाशुद्धिवाद्यांच्या आग्रहाचा उल्लेख प्रस्तुत लेखात केला आहे. वीर सावरकर आणि डॉ. पटवर्धन यांचा दाखला उद्धृत केला आहे. प्रमाण मराठीत रुळलेल्या या शब्दांमुळे प्रमाण मराठीचे पूर्ण नियमन ' करण्याची सत्ता जरी वरील भाषाशुद्धिवाद्यांच्या हातात नसली तरीही सावरकर, माधव जूलियन इ. नी मराठीत रूढ केलेले पुढील शब्द मात्र आजदेखील टाळता येणे अथवा पूर्णपणे प्रमाण–मराठीतून वगळणे कठीणच आहे ! उदा. 'दिनांक ' ' चित्रपट ' ' हुतात्मा ' 'क्रमांक' 'व्यंगचित्र' 'महापौर' 'अभिनेता' इ. सारखे शब्द तर व्यवहारातही चपखल बसले आहेत. इतकेच काय. पण संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर मराठीमध्ये भर पडलेले शब्द देखील विसरता येणार नाहीत. ते शब्द याप्रमाणे. ' नियोजन ',' आयुक्त ',' सचिवालय ',' अभियंता ', ' अधिसूचना ',' अधिनियम ' इ. शब्द शासकीय परिभाषेत रूढ झाले तर ' चालक ',' वाहक ','टंकलेखक ', ' लिपिक ' या शब्दांचीही देणगी मराठीस मिळाली !

व्याकरणिक परिवर्तनातही स्वरूप बदलत गेल्याची नोंद आढळते. उदा. संस्कृत ' परोक्ष 'चा अर्थ ' पलिकडचा ' अथवा ' दृष्टिपलीकडे ' असा आहे. तर ' अपरोक्ष 'चा अर्थ ' समक्ष 'असा प्रत्यक्षात आहे. उच्चारणात होणारे बदल, दोष यानिमित्ताने विचारार्थ घेतले तर अर्थपरिवर्तन टाळता येईल एवढे मात्र खरे.

डॉ. द. न. गोखले यांच्या ह्या लेखनात प्रमाण–भाषेतील गद्य व पद्याच्या प्रमाणभाषेतील अंशत: वेगळे असणाऱ्या विभागाचीही चर्चा आली आहे, ती येथे उल्लेखनीय वाटते. कारण अपरिहार्यपणे पद्याची भाषा दैनंदिन भाषेपेक्षा निश्चितच वेगळी पडते आणि तशी ती असणेही उचितच म्हणावी लागेल. या संदर्भात डॉ. मु. ग. पानसे यांनी संपादित केलेल्या ' भाषा : अंत:सूत्र आणि व्यवहार ' या पुस्तकातील प्रा. अ. गं. मंगरूळकर यांच्या ' मराठी कवितेची भाषा ' या लेखाचा आवर्जून दाखला द्यावासा वाटतो. श्री. मंगरूळकर या लेखात म्हणतात, ' कवितेची भाषा ही दैनंदिन भाषेहून वेगळी असली पाहिजे, आणि तिची घडण उंचावलेली पाहिजे. ही कल्पना अभिजात वाङ्मयाचा



अनुक्रमणिका

निर्देश करते. कवितेची भाषा लौकिक किंवा दैनंदिन भाषेहून वेगळी असली पाहिजे, ही कल्पना एकदा पत्करली की, तीन शब्दांची कसोशीची निवड होणे हे अपरिहार्य ठरते...अभिजात भाषा कवितेसाठी आणि लौकिक भाषा व्यवहारासाठी. पण याने कवितेची भाषा कळू लागते. (' भाषा : अंत:सूत्र आणि व्यवहार ' संपादक– मु. ग. पानसे पृ. क्र. ११५–११६/ म. सा. परिषद प्रकाशन : पहिली आवृत्ती : डिसें. १९६९)

म्हणूनच कवितेच्या भाषेची वेळप्रसंगी होणारी व्यावहारिक तुलनेतील कठीण अवस्था ओळखायलाच हवीच!

प्रमाण भाषेच्या घडणीच्या दृष्टीने ' सुलभता ' हे एक उद्दिष्ट डॉ. द. न. गोखले यांच्या लेखात उल्लेखिले आहे. अर्थात जरी ' सुलभता ' हे उद्दिष्ट आवश्यकता म्हणून मान्य केले तरी याच लेखाच्या अखेरीस ' विषम समासांची निर्मिती व्यवहार चालू ठेवण्यासाठी अपरिहार्य ठरल्यास ती वेधडक स्वीकारावी ' असाही निर्देश केला गेला आहे. अशा वेळी प्रमाण मराठीच्या प्रतिष्ठेच्या संदर्भात एक प्रश्न आवर्जून निर्माण होतो तो म्हणजे–

'उच्चारसौकर्य व्यवहारसुलभतेसाठी अशी वेधडक निर्मिती प्रमाण मराठीत अथवा भाषेत स्वीकारणे कितपत योग्य ठरेल ?' याची चर्चा जरूर व्हावयास हवी. तूर्तास इतकेच.

भाषिक व्यवहारातील विवेकाच्या संदर्भात डॉ. द. न. गोखले यांनी चर्चा केलेल्या भाषा शोधन ' या उपयुक्त व अभ्यसनीय लेखावद्दल मन:पूर्वक धन्यवाद. म. सा. पत्रिकेच्या या संपादनकार्यावद्दलही आभार.

## परिषदेचे नवीन आजीव सभासद (१ जून १९८७ ते ३१ जुलै १९८७ अखेर)

**पुणे विभाग :** सौ. विद्युत भागवत, सौ. निर्मला सुधाकर रानडे, सौ. सुभद्रा प्रतापसिंह नाईकनिंवाळकर, श्री. दशकांत रायाप्पा पुजारी, भा. गो. वापट, श्री. प्रकाश पोपटलाल शहा, श्री. माधव रामकृष्ण रानडे, श्री. आनंदराव वहिर्जी पाटील, श्री. सुहास विश्वनाथ मोघे, सौ. अनुराधा मोहन नानल, श्री. गोविंद केशवराव काळभोर, (आकुर्डी), श्री. कमलाकर श्रीखंडे, श्री. मधुकर आत्माराम देसाई.

**पुण्यावाहेरील –**

**सातारा विभाग :** प्रा. सौ. अनुराधा कुलकर्णी (वाई), डॉ. सौ. नीलम र. हातेकर, डॉ. अरुण विसाजी प्रभुणे.

**सांगली विभाग :** प्रा. विश्वास दादासाहेव जाधव (पळशी, ता. खानापूर).

**धुळे विभाग :** श्री. दादाप्रसाद वावुलाल जगतपुरिया (शिरुड), श्री. रमेश जैन, श्री. उत्तम ना. चौधरी, सौ. मीनल मकरंद पटवर्धन.

**जळगाव विभाग :** सर्वश्री दिनकर हरी महाजन, अरुण पांडुरंग चौधरी, अरविंद दिगंवर चौधरी, प्रभाकर जगन्नाथ जोशी (अमळनेर).

**मुंबई विभाग :** श्री. अरुण दामोदर वगळ.

**रत्नागिरी विभाग :** श्री. रमेश ओहक (चिपळूण).

**मराठवाडा विभाग :** श्री. के. द. शिंदे (उस्मानावाद).

(सभासदांसाठी)

महाराष्ट्र-साहित्य-परिषद

# वार्षिक साधारण सभा

## — सूचना —

टिळक रस्ता, पुणे ३०.
दि. ५ सप्टेंबर, १९८७

स. न. वि. वि.

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २७ सप्टेंबर १९८७ रोजी पुणे येथे माधवराव पटवर्धन सभागृहात सायंकाळी ४–३० वाजता भरणार आहे. या सभेला सर्वांनी उपस्थित राहून सहकार्य करावे अशी विनंती आहे. या सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल.

### — कामे —

(१) मागील सभेचे कार्यवृत्त वाचून संमत करणे.
(२) श्रद्धांजली.
(३) १९८६–८७ या वर्षाचे कार्यवृत्त संमत करणे.
(४) १९८६–८७ चे उत्पन्न-खर्च-पत्रक आणि ताळेबंदपत्रक संमत करण.
(५) १९८७–८८ चा अर्थसंकल्प संमत करणे.
(६) १९८७–८८ करिता हिशोब तपासनीसांची नेमणूक करणे.
(७) अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळी येणारी कामे.

आपले,

| | | |
|---|---|---|
| शंकर पाटील (अध्यक्ष) | राजेन्द्र बनहट्टी (कार्याध्यक्ष) | गं. ना. जोगळेकर (कोषाध्यक्ष) |
| राजा फडणीस (कार्यवाह) | म. वि. गोखले (कार्यवाह) | प्रभाकर अत्रे (कार्यवाह) |

---

### टीप

(१) गणसंख्येच्या अभावी सभा १५ मिनिटे स्थगित होईल व नंतर रीतसर सुरू होईल.
(२) वरील कामकाजासंबंधी मतदार-सभासदांस काही विशेष सूचना करावयाच्या असतील अगर ठराव मांडावयाचा असेल तर लेखी स्वरूपात तसे १९ सप्टेंबर ८७ पर्यंत कळवावे.



अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

### वर्ष ८१ वे, नोंदणी क्रमांक ४०९

# वार्षिक कार्यवृत्त : १९८६–८७

### (१ जुलै १९८६ ते ३० जून १९८७ अखेर)

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या १ जुलै ८६ ते ३० जून १९८७ या वर्षातील कार्यांचे वृत्त सभासदांना सादर करताना आम्हांस आनंद होत आहे.

**सभासदसंख्या :**

वर्षारंभी वार्षिक साधारण ३८५३ आणि आजीव २०३२ अशी एकूण ५८८५ सभासद संख्या होती. वर्षभरात २७९ साधारण सभासदांची आणि २३५ आजीव सभासदांची भर पडल्यामुळे जून ८७ अखेर साधारण ४१३२ आणि आजीव २२६७ अशी एकूण संख्या ६३९९ झाली. एकूण सुमारे २००० वार्षिक साधारण सभासदांकडून ८६–८७ सालची वर्गणी येणे बाकी आहे.

**कार्यालयीन सभा :**

वर्षाभरात कार्यकारी मंडळाच्या चार व २८–९–८६ रोजी वार्षिक साधारण एक सभा अशा एकूण पाच सभा झाल्या.

या वर्षात कार्यकारी मंडळाने पुढील महत्त्वाचे निर्णय घेतले.

(१) वृद्ध, अपंग, निराधार, साहित्यिक निधी उभारण्याबाबत श्री. राजा फडणीस कार्यवाह यांच्या सविस्तर योजनेस संमती देण्यात आली,

(२) ३०–९–८४ रोजी झालेल्या वार्षिक साधारण सभेने नियुक्त केलेल्या इमारत बांधकाम समितीचे निमंत्रक श्री. राजा फडणीस यांच्या अहवालावर चर्चा करून म. सा. प. ची सांप्रतची इमारत पाडून त्या जागी नवी इमारत बांधण्यास एकमताने संमती देण्यात आली.

(३) वाङ्मयेतिहास खंड ६ चे हस्तलिखित तयार झाले असून पुस्तक छपाईस प्रारंभ करण्यात आला. या पुस्तकाचा पहिला खंड दिवाळीच्या सुमारास प्रसिद्ध करावा.

(४) मराठी फार्स : संपादक भीमराव कुलकर्णी हे पुस्तक प्रकाशित करण्यात यावे.

(५) वाङ्मयकोश खंड २ चे काम समाधानकारक असल्याने मुख्य संपादकांनी आणखी काही काम परिषदेकडे सोपविले असल्याचे विभागीय संपादक श्री. म. वि. गोखले यांनी सांगितल्यावर सभेने समाधान व्यक्त केले.

वार्षिक साधारण सभा : दि. २८ सप्टेंबर १९८७ रोजी परिषदेची वार्षिक साधारण सभा श्री. शंकर पाटील यांच्या अध्यक्षतेखाली झाली. १९८५–८६ चे कार्यवृत्त, उत्पन्न खर्च पत्रक, ताळेबंद आणि ८६–८७ चा अर्थसंकल्प सभेत समत करण्यात आला. सर्वश्री अरविंद पाटोळे, पां. र. अंबिके, वि. त्र्यं. शेटे, वि. ग. माटे, मु. पां. देशपांडे, हरिभाऊ शिंदे, गं. ना. जोगळेकर यांनी चर्चेत भाग घेऊन सूचना केल्या व गेल्या वर्षी कार्यकारी मंडळानें केलेल्या कामाबद्दल समाधान व्यक्त केले.

सभेत सुचविण्यात आल्याप्रमाणे सभेचे इतिवृत्त तावडतोब तयार करून ते सर्व उपस्थित सभासदांना पाठविण्यात आले.

अनुक्रमणिका

## साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम :

गेल्या वर्षभरात पुणे येथे पुढील कार्यक्रम झाले.

**जुलै ८६ :** दिनांक ५– कै. र. वा. दिघे स्मृत्यर्थ प्रा. निर्मला मोने यांचे 'स्त्रीलेखिकांच्या मराठी कादंबऱ्या' या विषयावर व्याख्यान. दि. २१– कै. वा. म. जोशी स्मृत्यर्थ डॉ. आनंद यादव यांचे 'साहित्यिकाचे मानस' या विषयावर व्याख्यान. दि. २२– ग. ल. ठोकळ स्मृत्यर्थ डॉ. सरोजिनी वाबर यांचे 'ग्रामीण साहित्य' या विषयावर व्याख्यान.

**ऑगस्ट ८६ :** दिनांक ७ व ८– संत सावता महाराज यांच्या स्मरणार्थ डॉ. वि. रा. करंदीकर यांची दोन व्याख्याने. विषय 'संत ज्ञानदेव आणि १२ वे शतक', 'समर्थ रामदास आणि १७ वे शतक'. दि. १३– कै. पु. भा. भावे यांच्या स्मरणार्थ डॉ. सौ. आशा सावदेकर (नागपूर) यांचे 'पु. भा. भावे यांच्या कादंबऱ्यातील स्त्री चित्रण' या विषयावर व्याख्यान. एस्. एन्. डी. टी. विद्यापीठ व पुणे विद्यापीठ १९८५ मध्ये एम्. ए. मराठी विषयात प्रथम आल्याबद्दल सौ. अश्विनी देशपांडे व शोभना खांडके यांना पु. भा. भावे पारितोषिक प्रदान. कार्यक्रमाच्या आरंभी माजी सरसेनापती जनरल अरुणकुमार वैद्य यांना श्रद्धांजली.

**सप्टेंबर ८६ :** दि. १– कै. सावित्रीबाई वारलिंगे स्मृतिदिनानिमित्त प्रा. त्र्यं. कृ. टोपे यांचे 'पंचवीस वर्षातील महाराष्ट्रातील सामाजिक परिवर्तन' या विषयावर व्याख्यान. दि. ४ ते ६ – कै. श्री. म. माटे जन्मशताब्दी निमित्ताने तीन दिवस व्याख्याने. डॉ. व. दि. कुलकर्णी यांचे 'विचारवंत माटे' या विषयावर, श्रीमती शांता शेळके यांचे 'कथाकार माटे' या विषयावर, तर 'आठवणीतील माटे' या विषयावर श्री. गोपिनाथ तळवलकर यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. सरोजिनी वाबर, डॉ. प्र. न. जोशी आणि सौ. सुधा फडके (माटे यांची कन्या) यांचे 'आठवणी कथन'.

**ऑक्टोबर ८६ :** दिनांक ९ – सुप्रसिद्ध समीक्षक व परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे माजी सदस्य, प्रा. स. शि. भावे यांच्या दुःखद निधनानिमित्त शोकसभा. अध्यक्ष श्री. शंकर पाटील, सर्वश्री आनंद यादव, म. वि. गोखले, रेखा इनामदार यांची श्रद्धांजली अर्पण करणारी भाषणे. दि. ६ – कै. म. म. प्रा. द. वा. पोतदार स्मृत्यर्थ डॉ. उषा रानडे यांचे 'तंजावर–मराठी बखर' या विषयावर व्याख्यान.

**नोव्हेंबर ८६ :** दिनांक २५ व २६ – कै. व. ह. गोळे स्मृत्यर्थ दोन व्याख्याने. वक्ते डॉ. व. दि. कुलकर्णी. 'विषय–नाट्यसंहिता आणि नाट्यप्रयोग'.

**डिसेंबर ८६ :** दिनांक १ – कै. माधव ज्युलियन स्मृतिदिनानिमित्त प्रा. शशिकला शिरगोपीकर यांचे 'उर्दू गजलची वाटचाल' या विषयावर व्याख्यान व गायन.

**जानेवारी ८७ :** १ व २ – कै. श्री. म. माटे स्मृत्यर्थ दोन व्याख्याने. वक्ते डॉ. अरविंद वामन कुलकर्णी. विषय– 'श्री. म. माटे : कलावंत आणि समाजसुधारक', 'श्री. म. माटे आणि आजचे ग्रामीण जीवन'. दि. १८ – कै. वि. द. घाटे स्मृत्यर्थ प्रा. ह. श्री. शेणोलीकर यांचे 'वि. द. घाटे : व्यक्ती आणि वाङ्मय' या विषयावर व्याख्यान.

**फेब्रुवारी ८७ :** कै. वि. ज. तथा पिलाजीराव फडणीस स्मृतिदिनानिमित्त प्रा. डॉ. ह. सि. निर्मळे यांचे 'दलित कविता : कालची आणि आजची' या विषयावर व्याख्यान.

**मार्च ८७ :** दिनांक ५ – कै. ना. गो. चापेकर स्मृत्यर्थ प्रा. ग. प्र. प्रधान यांचे 'साहित्य आणि समाज जीवन' या विषयावर व्याख्यान. दि. ९ – कै. य. दि. पेंढरकर (कवि यशवंत) स्मृत्यर्थ व्याख्यान– वक्त्या श्रीमती शांता शेळके. दि. २१ – कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिनानिमित्त डॉ. सरोजिनी वैद्य यांचे 'समीक्षक वासुदेव बळवंत पटवर्धन व्यक्ती आणि वाङ्मयविचार' या विषयावर व्याख्यान. दि. २५ ते २८ – श्री गणेश सरस्वती ठाकूर देसाई व्याख्यानमाला– विषय 'कुसुमाग्रज : काव्य आणि नाटक' वक्ते डॉ. व. दि. कुलकर्णी.

**एप्रिल ८७ :** दिनांक २ – कै. नरहर कुरुंदकर स्मृत्यर्थ डॉ. हेमंत इनामदार यांचे 'मध्ययुगीन महाराष्ट्राचा











सामाजिक इतिहास काही समस्या ' या विषयावर व्याख्यान. दि. १० – कै. श्रीधर व्यंकटेश केतकर स्मृत्यर्थ प्रा. सदाशिव आठवले यांचे 'ज्ञानकोश वाङ्मय–मंत्र व तंत्र' या विषयावर व्याख्यान.

**जून ८७** : दिनांक २३ – कै. का. र. मित्र स्मृत्यर्थ, डॉ. शरदचंद्र गोखले यांचे 'विकसनात्मक पत्रकारिता' या विषयावर व्याख्यान. दि. २४ – कै. नाथमाधव स्मृत्यर्थ सौ. ज्योत्स्ना देवधर यांचे 'पंडिता रमाबाईंचे जीवनकार्य' या विषयावर व्याख्यान.

## का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाला :

कै. का. र. मित्र शारदीय व्याख्यानमालेच्या द्वितीय वर्षात पुढीलप्रमाणे व्याख्याने दिनांक १३–१०–८६ ते २१–१०–८६ अखेर आयोजित करण्यात आली. 'नाटकाची जन्मकथा' हा व्याख्यानमालेचा विषय होता. नामवंत नाटककारांनी आपल्या गाजलेल्या नाटकांची जन्मकथा या मालेतून सांगितली. प्रा. वसंत कानेटकर-रायगडला जेव्हा जाग येते, श्री. शंकर पाटील–लवंगी मिरची कोल्हापुरची, श्री. विद्याधर गोखले–पंडितराज जगन्नाथ, डॉ. म. वि. गोखले–माझी बालनाटये, श्री. सुभाष भेंडे–मार्ग सुखाचा, श्री. सुरेश खरे–काचेचा चंद्र, श्री. पुरुषोत्तम दारव्हेकर–कटयार काळजात घुसली, प्रा. विद्याधर पुंडलिक–माता द्रौपदी, श्री. श्याम फडके–तीन चोक तेरा. अत्यंत आवडता विषय असल्याने रसिक श्रोत्यांनी या व्याख्यानांना भरपूर प्रतिसाद दिला.

## अभिनंदन–सत्कार–अभीष्टचिंतन :

श्री. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज) व प्रा. वा. ल. कुलकर्णी व श्री. मो. रा. वाळंबे यांनी ७६ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल तसेच श्री. व्यंकटेश माडगूळकर यांनी ६१ व्या वर्षात व श्री. ह. न. जोशी (सुधांशु) यांनी ७१ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल परिषदेमार्फत शुभेच्छा पाठविण्यात आल्या.

सुप्रसिद्ध विनोदी कथालेखक प्रा. द. मा. मिरासदार यांनी ६१ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल दि. ६ मे १९८७ रोजी अनौपचारिक गप्पागोष्टींचा कार्यक्रम आयोजित केला होता. शाल, श्रीफल व पुष्पगुच्छ देऊन त्यांचा याप्रसंगी सत्कार करण्यात आला.

१५ जून १९८७ रोजी–सुप्रसिद्ध साहित्यिक व कार्यकर्ते श्री. ना. ग. गोरे यांनी ८१ व्या वर्षात पदार्पण केले. त्यावेळी झालेल्या त्यांच्या जाहीर सत्कारप्रसंगी परिषदेमार्फत पुष्पगुच्छ देण्यात आला.

अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. विश्राम बेडेकर यांचा २८ ऑगस्ट ८६ रोजी श्री. शंकर पाटील यांचे अध्यक्षतेखाली टिळक स्मारक मंदिरात सत्कार करण्यात आला. या प्रसंगी डॉ. भालचंद्र फडके, प्रा. द. मा. मिरासदार, प्रा. माधव वझे व बाबा आमटे यांची भाषणे झाली.

डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या वयास ७५ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल दि. ९ नोव्हेंबर ८६ रोजी कार्याध्यक्ष व कार्यवाह यांनी त्यांचे घरी जाऊन पुष्पगुच्छ व परिषदेची प्रकाशने देऊन परिषदेतर्फे शुभेच्छा व्यक्त केल्या.

## स्वागत, सत्कार आणि भेटीगाठी

पुणे महानगरपालिका स्थायी समिती सदस्य मा. गिरीश बापट यांनी नगरसेवक श्री. मालशे व श्री. भगवानराव देशपांडे यांचेसह दि. ६ ऑगस्ट ८६ रोजी परिषदेस भेट दिली.

जिल्हाधिकारी श्री. वि. पां. राणे यांनी दि. २२ ऑगस्ट रोजी परिषदेला भेट देऊन कार्याची माहिती घेतली. मराठी साहित्य महामंडळाचे नवे अध्यक्ष प्रा. गंगाधर गाडगीळ यांचा ३ ऑगस्ट ८६ रोजी सत्कार करण्यात आला. परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांच्या षष्ट्यब्दीपूर्तीनिमित्त झालेल्या दि. ५ ऑगस्ट ८६ च्या जाहीर सभेत परिषदेतर्फे पुष्पगुच्छ अर्पण करण्यात आला.

श्री. स. स. दुसाम पंजाबी लेखक यांनी दि. ४ मार्च ८७ रोजी परिषदेस भेट दिली. या प्रसंगी मराठी साहित्यिकांशी त्यांनी चर्चा केली.

नू. म. विद्यालयातील स्कॉलरशिप परीक्षार्थी विद्यार्थ्यांना दि. २९ मे ८७ रोजी प्रमुख शिक्षक श्री. तांबे यांनी परिषदेच्या भेटीसाठी आणले होते. परिषदेचे कार्य व विविध भाग या विद्यार्थ्यांना दाखविण्यात आले. कार्यवाह

डॉ. म. वि. गोखले यांनी परिषदेची माहिती दिली व विद्यार्थ्यांच्या प्रश्नांना उत्तरे दिली.

## दिवाळी अंक पारितोषिके :

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी दिवाळी अंक स्पर्धा घेण्यात येते आणि तीन उत्कृष्ट अंकांना ' विविधज्ञान विस्तार 'कर्ते रावसाहेब मोरमकर, ' मासिक मनोरंजन 'कर्ते का. र. मित्र आणि ' किर्लोस्कर 'चे शं. वा. किर्लोस्कर या तीन संपादकांच्या स्मृत्यर्थ प्रत्येकी रु. १०१/– ची पारितोषिके दिली जातात. यंदा १९८६ च्या दिवाळी अंकातून निवडलेल्या पुढील तीन अंकांना पारितोषिके देण्यात आली.

१) दीपावली : संपादक अशोक कोठावळे ' का. र. मित्र पारितोषिक ' २) मौज : संपादक–राम पटवर्धन ' रावसाहेब मोरमकर पारितोषिक ' ३) विशाखा : संपादक–ह. ल. निपुणगे ' शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक ' या-शिवाय परीक्षक समितीने ' माहेर ' (संपादक–पु. वि. बेहेरे) हा उत्तम अंक म्हणून उल्लेखिला आहे.

दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललितलेखास परिषदेतर्फे कै. अनंत काणेकर यांच्या स्मृत्यर्थ रु. २००/–चे पारितोषिक देण्यात येते. हे पारितोषिक १९८६ मधील ' तरुण भारत ' पुणेच्या दिवाळी अंकातील प्रा. मधुकर केचे यांच्या ' हे भ्रम आभास ! ' या लेखास देण्यात आले आहे. या स्पर्धेच्या निर्णयासाठी प्रा. म. ना. अदवंत, श्री. राजा फडणीस, सौ. शशिकला उपाध्ये आणि डॉ. म. वि. गोखले (निमंत्रक) यांची समिती नेमली होती.

## ग्रंथपारितोषिके :

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे १९८६ मध्ये प्रकाशित झालेल्या पुढील ग्रंथांना पारितोषिके देण्यात आली.

( १ ) हरि नारायण आपटे पारितोषिक ( कादंबरी ) : " कागद आणि सावली " – आनंद पाटील रु. १०१/–

( २ ) वा. म. जोशी पारितोषिक (कादंबरी) : " झुलवा " उत्तम बंडू तुपे ; रु. १०००/–

( ३ ) ह. स. गोखले पारितोषिक (कविता) : " हायकू " शिरीष पै; रु. ३००/–

( ४ ) नी. स. गोखले पारितोषिक (कथा) : " मर्ल " निर्मला देशपांडे; रु. ३००/–

( ५ ) अ. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) : प्रकाशक ' श्रीविद्या प्रकाशन, ' गर्द ' या पुस्तकासाठी; रु. ३००/–

( ६ ) गिरीजा गंगाधर जांभेकर पारितोषिक (संपादित ग्रंथ) : " मराठी साहित्य : प्रेरणा आणि स्वरूप " संपादक–म. द. हातकणंगलेकर गो. मा. पवार; रु. १०१/–

( ७ ) ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक ( समीक्षा ) : " मुक्तिबोधांचे साहित्य " रा. भा. पाटणकर; रु. ५००/–

( ८ ) तुळशीराम वाघ पारितोषिक (संत वाङ्मयविषयक) : " श्री ज्ञानेश्वर महाराजांची विचारसंपदा अद्वैत ज्ञानमंजिरी " डॉ. शं. कि. चतुरकर; रु. २५०/–

( ९ ) सुशील प्रधान पारितोषिक ( कुमारवाङ्मय ) : " मुग्धाची रंगीत गोष्ट " जी. ए. कुलकर्णी रु. २००/–

### (१०) ललितेतर वैचारिक ग्रंथ :

१) शि. म. परांजपे पारितोषिक : " अमृतमयी " शांतिलाल भंडारी; रु. २५०/–
२) ना. गो. चापेकर पारितोषिक : " भारतीय मिथ्यांचा मागोवा " विश्वनाथ खैरे; रु. २५०/–
३) विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक : " लेखननामा " नीलकंठ खाडिलकर; रु. १५०/–
४) श्री. शां. हणमंते पारितोषिक (संशोधन) : " राजकोश " अश्विनीकुमार दत्तात्रय मराठे; रु. ३५०/–

पारितोषिकांचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून पुढील व्यक्तींनी काम केले. डॉ. कल्याणी दिवेकर, प्रा. मेधा सिधये, डॉ. ललिता कुंभोजकर, श्री. राजेंद्र बनहट्टी, डॉ. विलास खोले, डॉ. वि. रा. करंदीकर, प्रा. हृ. श्री. शेणोलीकर, डॉ. म. वि. गोखले, डॉ. अश्विनी धोंगडे, डॉ. अरुणा ढेरे, प्रा. म. ना. अदवंत (निमंत्रक).

## कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत पारितोषिके :

कॉटिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कै. चि. वि. जोशी व कवि कुसुमाग्रज पारितोषिके.

दरवर्षी उत्कृष्ट विनोदी पुस्तकाच्या लेखकास व प्रकाशकास दिले जाणारे कॉंटिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कै. चि. वि. जोशी पारितोषिक १९८६ करिता श्री. रमेश मंत्री यांच्या 'टिवल्या बावल्या' या पुस्तकास व या पुस्तकाचे प्रकाशक श्री. म. ना. जोशी (सन पब्लिकेशन) यांना देण्यात आले: ही पारितोषिके अनुक्रमे रु. १२०० व रु. ९००/– ची आहेत. पारितोषिक वितरण समारंभ श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते दि. १९–१–८७ रोजी म. सा. प. सभागृहात पार पडला. यावेळी परीक्षकांतर्फे डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे भाषण झाले. या पारितोषिकाचा निर्णय सर्वश्री शि. द. फडणीस, आनंद अंतरकर, गं. ना. जोगळेकर आणि म. वि. गोखले (निमंत्रक) या समितीने केला.

१९८६ चे कविवर्य कुसुमाग्रज पारितोषिक श्री. श्रीधर शनवारे यांच्या 'थांग अथांग' या काव्य संग्रहास व प्रकाशक सौ. आशा जवळकर (पारख प्रकाशन, वेळगाव, यांना देण्यात आले.) पारितोषिक वितरणाचा समारंभ दि. २७–२–८७ रोजी परिषदेच्या सभागृहात साजरा झाला. पारितोषिक वितरण श्री. ना. ग. गोरे यांच्या हस्ते झाले. श्रीमती शांता शेळके यांचे परीक्षकांतर्फे भाषण झाले. श्री. श्रीधर शनवारे यांनी सत्काराच्या उत्तरादाखल भाषण करून आपली एक कविता वाचून दाखविली. नंतर सौ. मीरा धाराशिवकर व श्री. मुकुंद धाराशिवकर यांचा 'यात्रा अनंताची' हा कुसुमाग्रजांच्या निवडक कवितांच्या वाचनाचा कार्यक्रम झाला.

## ग. रा. वाळ कथा-पारितोषिक

गेल्या वर्षीपासून श्री. ग. रा. वाळ ट्रस्टतर्फे दरवर्षी एका उत्कृष्ट कथला रु. १०००/–चे पारितोषिक महाराष्ट्र साहित्य परिषदेमार्फत देण्यात येते.

१९८५ सालचे पारितोषिक अनिल रघुनाथ कुलकर्णी. यांच्या 'हिरण्यगर्भ' कथेला देण्यात आले. ही कथा 'दीपलक्ष्मी'च्या १९८५ च्या दिवाळी अंकात प्रकाशित झालेली होती.

सर्वश्री वि. शं. पारगावकर, श्री. अंजली सोमण, श्री. निर्मला मोने व श्री. राजा फडणीस (निमंत्रक) यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

## कै. दि. बा. मोकाशी पुरस्कार :

सुप्रसिद्ध कथाकार कै. दि. बा. मोकाशी यांच्या स्मरणार्थ दि. बा. मोकाशी मित्रमंडळाने दिलेल्या देणगीच्या रकमेच्या व्याजातून दरवर्षी पारितोषिक देण्यात येणार आहे. यंदाचे वर्षी हे पुरस्कार दि. बा. मोकाशी मित्रमंडळ व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या सहकार्याने सन १९८१ ते १९८५ या काळात प्रसिद्ध झालेल्या कादंबरी, कथा व आंतर्देशीय प्रवासवर्णन या वाङ्मयप्रकारातील लेखकांच्या प्रथम प्रकाशित पुस्तकांना देण्यात आले.

कादंबरी– प्रथम पारितोषिक 'एंकीच्या राज्यात' विलास सारंग
द्वितीय पारितोषिक 'आत्मनेपदी' हेमा लेले.

कथासंग्रह– प्रथम पारितोषिक 'मारवा' आशा बगे
द्वितीय पारितोषिक 'मांडियला खेळ' निलीमा भावे

प्रवासवर्णन उत्तेजनार्थ 'काळ्या पाण्याची निळाई' वासंती घैसास. या पारितोषिक प्राप्त पुस्तकांची निवड करण्यासाठी श्री. रंगा मराठे, श्री. वि. शं. पारगावकर, सौ. ज्योत्स्ना देवधर, श्री. म. वि. गोखले, व श्री. म. ना. अदवंत (निमंत्रक) यांची समिती नेमण्यात आली होती.

हे सर्व पुरस्कार दि. बा. मोकाशी मित्रमंडळ व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या तर्फे २९ जून १९८७ रोजी

सुप्रसिद्ध नाटककार श्री. विजय तेंडूलकर यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आले. या वेळी श्री. शांता शेळके यांचे कै. मोकाशी यांच्या कथेवर माहितीपूर्ण भाषण झाले. प्रारंभी श्री. वि. ग. कानिटकर यांनी प्रास्ताविकात मोकाशी पुरस्काराची माहिती सांगितली. श्री. विजय तेंडूलकर यांच्या अध्यक्षीय भाषणानंतर परिषदेचे कार्यवाह श्री. म. वि. गोखले यांनी आभार मानले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक :

गतवर्षीपासून परिषदेच्या वर्धापनदिनी महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक देण्यात येते. या वर्षापासून हे पारितोषिक रोख रु ३०००/– व मानचिन्ह या स्वरूपात देण्यात येणार आहे. ह्या वर्षीच्या दि. २७ मे १९८७ या वर्धापनदिनी मौज प्रकाशनचे संचालक व सत्यकथा या मासिकाचे संपादक प्रा. श्री. पु. भागवत यांना हे पारितोषिक देण्याचा समारंभ साजरा करण्यात आला. राज्य शिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात साजऱ्या झालेल्या या समारंभाचे अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध नाटककार श्री. विजय तेंडूलकर हे होते. सुरुवातीस परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी या पारितोषिकाची माहिती सांगितली. व प्रा. श्री. पु. भागवत यांचा परिचय करून दिला. त्यानंतर श्री. शंकर पाटील व डॉ. आनंद यादव यांची श्री. पु. भागवतांच्या गौरवपर भाषणे झाली. त्यानंतर अध्यक्ष श्री. विजय तेंडूलकर यांचे हस्ते श्री. भागवत यांना महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक रु. तीन हजार व स्मृतिचिन्ह प्रदान करण्यात आले. त्यानंतर श्री. श्री. पु. भागवत यांचे समयोचित भाषण झाले. श्री. विजय तेंडूलकर यांच्या अध्यक्षीय भाषणानंतर, परिषदेचे कार्यवाह श्री. म. वि. गोखले यांनी आभार मानले.

वर्धापनदिनानिमित्त आदल्या दिवशी म्हणजे २६।५।८७ रोजी सुप्रसिद्ध कवी श्री. सुरेश भट यांच्या गझल गायनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. त्यातून साहित्यिक सहाय्य निधी जमविण्यात आला.

## देणग्या :

कऱ्हाडे ब्राह्मण संघ पुणे या संस्थेने कै. म. म. प्रा. द. वा. पोतदार स्मृति निधीसाठी रु. ३००० ची देणगी दिली. प्राचार्य व. कृ. नूलकर व श्री. चारुदत्त सरपोतदार यांनी या कामी मोलाचे साहाय्य केले. दरवर्षी या निधीतून स्मृतिदिनाबरोबर एका ग्रंथास कै. पोतदार स्मृति पारितोषिक देण्यात येणार आहे.

प्रसिद्ध कथाकार श्री. दि. बा. मोकाशी यांच्या स्मरणार्थ दि. बा. मोकाशी मित्रमंडळातर्फे रु. १२०००/– ची देणगी परिषदेकडे आली असून या रकमेच्या व्याजातून दरवर्षी रु. ५००/– चे पारितोषिक कथासंग्रह, प्रवासवर्णन व कादंबरी या वाङ्मयप्रकारातील लेखकाच्या प्रथम पुस्तकाला आलटून–पालटून द्यावयाचे आहे.

सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. शंकर पाटील यांच्या षटयब्दीपूर्ती निमित्त श्री. शंकर पाटील सत्कार समितीने रु. २०,०००/– चा निधी परिषदेच्या स्वाधीन केला असून या निधीच्या व्याजातून दरवर्षी ८ ऑगस्ट या श्री. शंकर पाटील यांच्या जन्मदिनी कथा/कादंबरी या वाङ्मयप्रकारातील लेखकांना रु. २०००/– चे पारितोषिक आणि मानचिन्ह देण्यात येणार आहे.

महाराष्ट्र कवी कै. यशवंत तथा य. दि. पेंढरकर यांच्या स्मृत्यर्थ त्यांच्या भगिनी प्रा. काशीताई पेंढरकर यांनी रु. ९०००/– ची देणगी परिषदेकडे सुपूर्त केली आहे. या देणगीच्या व्याजातून दरवर्षी ९ मार्च रोजी कै. यशवंत यांचे जन्मदिनी रु. ५०१ चे पारितोषिक सर्वोत्कृष्ट कवितेच्या पुस्तकास 'महाराष्ट्र कवी यशवंत पारितोषिक' या नावाने दिले जाणार आहे.

या सर्व देणगीदारांची परिषद ऋणी आहे.

## संदर्भ ग्रंथालय :

परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाचा सुमारे ५५० सभासद–वर्गणीदार लाभ घेत असतात. वर्षारंभी ग्रंथसंख्या २३२२६ होती. तीत खरेदी केलेली ८०, पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आलेली २२५ आणि देणगीदाखल व

पारितोषिकासाठी आलेली ४६६ अशी एकूण ७७१ ग्रंथांची भर पडून जून ८७ अखेर पावेतो ग्रंथसंख्या २३९९७ झालेली आहे.

श्रीमती सुमित्रा माढेकर, श्री. शरद तळवलकर, श्री. म. श्री. दीक्षित, श्री. म. ना. अदवंत, श्री. राजेंद्र वनहट्टी, श्री. दि. गं. केळकर, श्री. श्री. वा. शिराळकर यांनी भेटीदाखल ग्रंथ दिले. या सर्वांची परिषद आभारी आहे.

## मराठी वाङ्मयकोश :

या कोशासाठी श्री. म. वि. गोखले (विभागीय संपादक) यांनी निरनिराळ्या लेखकांकडून आजवर ७०० नोंदी लिहवून घेतल्या आहेत. या कोशाचे मुख्य संपादक श्री. के. ज. पुरोहित यांनी या नोंदीचे काम व्यवस्थित व समाधानकारक असल्याचे मत समक्ष नोंदी पाहून व्यक्त केले. आजवर झालेल्या कामासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून देण्यात आलेल्या द्रव्याचे वाटप नोंदलेखक व नोंद तपासनीस यांच्यामध्ये करण्यात आले आहे. म. सा. प. मधील कार्यपद्धतीविषयी संतोष व्यक्त करून साहित्य संस्कृती मंडळाने आणखीही काम परिषदेकडे सोपविले आहे.

## परीक्षाकार्य :

जानेवारी १९८७ मध्ये झालेल्या मराठीच्या परीक्षेची एकूण १६ केन्द्रे होती. विशारद २२, प्राज्ञ १२८, प्रवेश ३६६, प्रथमा ३३४ याप्रमाणे उमेदवारांची संख्या होती. प्रत्येक परीक्षेत उत्तीर्ण झालेले पहिले तीन उमेदवार पुढील प्रमाणे :–

**विशारद :** नरोत्तम दयाळजी राणा (पुणे), कु. अनिता गुलाबचंद बोकडिया (श्रीरामपूर), राजेंद्र दगडूलाल कांकरिया (पुणे)

**प्राज्ञ :** कु. संगीता विजय भागवत (पुणे), कु. पूर्णिमा श्रीकांत नगरकर (पुणे), गंगाराम गोविंद वालगुडे (दापोली) आणि कु. सुजाता आफळे (पुणे) (विभागून)

**प्रवेश :** कु. रत्नप्रभा सुधाकर रानडे (नाशिक), दीप्ती श्रीकांत सरवटे (ठाणे), कु. सुवर्णा श्यामकांत येल्ला-पूरकर (डोंबिवली).

**प्रथमा :** नीलेश नरेंद्र चव्हाण, कु. विशाखा तांबे, मंदार श्रीकांत वनारसे (सर्व डोंबिवली केन्द्र)

डॉ. गं. ना जोगळेकर यांच्या संचालनाखाली या वर्षीचे परीक्षा कार्य सुरळीतपणे पार पडले. डॉ. शैला काळकर, प्रा. आरती दातार, डॉ. व. न. कुबेर, प्रा. सुषमा जोगळेकर, प्रा. आशा जोशी, डॉ. लीला दीक्षित, श्री. मो. रा. वाळंबे, प्रा. शीला कोलटकर, डॉ. सुप्रिया अत्रे, डॉ. ललिता कुंभोजकर, डॉ. अंजली सोमण, डॉ. श्रीलेखा साने, डॉ. शशिकला गोरे, प्रा. नीलिमा बाकरे यांचे परीक्षाकार्यात आत्मीयतेचे सहकार्य लाभले.

परीक्षाकार्यात हार्दिक सहकार्य देणाऱ्या केंद्रसंचालकांची संस्था आभारी आहे.

## विभागीय संमेलन व ८१ वा वर्धापन दिन :

परिषदेचे ५ वे विभागीय संमेलन परिषदेच्या ठाणे शाखेमार्फत ७ व ८ फेब्रुवारी १९८७ रोजी ठाणे येथील गडकरी रंगायतनमध्ये थाटात साजरे झाले. संमेलनाचे अध्यक्षस्थान सुप्रसिद्ध नाटककार श्री. विद्याधर गोखले यांनी भूषविले होते. स्वागताध्यक्ष ठाणे महानगरपालिकेचे महापौर मा. सतीश प्रधान होते. संमेलनाचा सविस्तर वृत्तांत ठाणे शाखेच्या कार्यवृत्तात आलेला आहे.

## महाराष्ट्र साहित्य पत्रिका :

महाराष्ट्र साहित्य पत्रिका या वाङ्मयीन त्रैमासिकाचे ४ अंक चालू वर्षात प्रसिद्ध झाले, दीपावली अंक गझल विशेषांक म्हणून प्रसिद्ध झाला. सर्व अंक वेळेवर प्रसिद्ध झाले. अंकाचे बदलते नवे स्वरूप सभासदांना आवडले.



अनुक्रमणिका

## शाखासभावृत्त :

### ठाणे :

ठाणे शाखेच्या सर्वसाधारण सभेत जुलै १९८७ ते जून १९९० या तीन वर्षांसाठी पुढील कार्यकारिणीची निवड जाहीर झाली. अध्यक्ष–चिंतामण शंकर जोशी, उपाध्यक्ष– पी. सावळाराम, कार्याध्यक्ष– म. पां. भावे, कोषाध्यक्ष– श्रीहरी भिडे, कार्यवाह– पद्माकर शिरवाडकर, अरुण मेंड, सभासद– अशोक चिटणीस, चांगदेव काळे, सौ. शीला मराठे, सौ. शोभना सरवटे, व्ही. सिन्नरकर, सल्लागार– म. वि. फाटक, ग. ना. भिडे, स. पां. जोशी.

या वर्षातील सभासदांची संख्या पुढीलप्रमाणे– नवीन आजीव सदस्य १९ व सर्वसाधारण सदस्य ३०. संस्थेच्या सुरुवातीपासून अहवाल वर्षअखेरपर्यंत आजीव सदस्यांची संख्या १०५ झाली आहे.

तपशील : सुप्रसिद्ध विनोदी साहित्यिक श्री. वि. आ. बुवा यांच्या वयास साठ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल त्यांचा सत्कार दि. ३ ऑगस्ट १९८६ रोजी करण्यात आला. हा कार्यक्रम सौ. लीलाताई जोशी यांच्या मनसुवा सभागृहात घेण्यात आला. या प्रसंगी सर्वश्री. चिं. शं. जोशी (अध्यक्ष), प्रा. म. वि. फाटक, बापूराव जोशी, व्ही. सिन्नरकर, पद्माकर शिरवाडकर यांची बुवांसंबंधी गौरवपर भाषणे झाली. तद्नंतर शाखेच्या अध्यक्षांचे हस्ते श्री. बुवा यांचा शाल व श्रीफळ देऊन सत्कार करण्यात आला. उत्तरादाखल श्री. बुवांनी आपण लेखक कसे झालो याची माहिती रंजक पद्धतीनें सांगून सत्कारावद्दल महाराष्ट्र साहित्य परिषद, ठाणे चे आभार मानले.

दिनांक २८ सप्टेंबर १९८६ रोजी नगरवाचन मंदिराचे सहकार्याने त्यांचेच वास्तूत प्रा. (डॉ.) अनुराधा पोतदार यांचे 'साहित्याचा रसास्वाद' यावर अभ्यासपूर्ण भाषण झाले. प्रास्ताविक व पाहुण्यांचा परिचय श्री. म. पां. भावे यांनी करून दिला. नगरवाचन मंदिराचे अध्यक्ष श्री. स. वि. कुलकर्णी यांनी समारोप केला.

दिनांक २३ नोव्हेंबर १९८६ रोजी अखिल भारतीय संमेलनाचे अध्यक्ष श्री. विश्राम बेडेकर यांचा जाहीर सत्कार नगर वाचन मंदिराच्या पुरस्काराने त्यांच्याच वास्तूत करण्यात आला. या सत्कार सोहळ्यात आपल्या शाखेने सक्रिय सहभाग दिला. याप्रसंगी भाषणे करण्याऐवजी श्री. बेडेकर यांची जाहीर मुलाखत घेण्यात आली. या मुलाखतीत सर्वश्री. प्रा. म. वि. फाटक, प्रा. मुरलीधर सायनेकर व कुमार केतकर यांनी भाग घेतला. श्री. विश्राम बेडेकर यांनी अगदी खेळकर वातावरणात प्रश्नांना उत्तरे दिल्यामुळे हा कार्यक्रम अतिशय रंगतदार झाला.

या वर्षीच्या कार्यक्रमात सर्वात महत्त्वाचा कार्यक्रम म्हणजे ठाणे जिल्हा शाखेने सर्व जबाबदारी स्वीकारून सर्वार्थाने यशस्वी केलेले पाचवे विभागीय साहित्य संमेलन. गडकरी रंगायतनच्या भव्य वास्तूत हे संमेलन दि. ७ व ८ फेब्रुवारी १९८७ असे दोन दिवस घेण्यात आले. संमेलनाला रसिकांनी खूपच चांगला प्रतिसाद दिला. संमेलनाचे अध्यक्षपद सुप्रसिद्ध पत्रकार व नाटककार माननीय विद्याधर गोखले यांनी भूषविले. स्वागताध्यक्षपदी माजी महापौर श्री. सतीश प्रधान होते. उद्घाटन माननीय श्री. माधव गडकरी (संपादक–लोकसत्ता) यांच्या हस्ते झाले.

स्वागताध्यक्ष श्री. सतीश प्रधान, माननीय श्री. विद्याधर गोखले व उद्घाटक श्री. माधवराव गडकरी यांनी या प्रसंगी आपले विचार अत्यंत सुस्पष्टपणे मांडले. संमेलनाचे प्रास्ताविक श्री. चिं. शं. जोशी यांनी केले, तर स्वागतगीत गायक श्री. अनिल जोशी यांनी म्हटले. पाहुण्यांचा परिचय म. सा. परिषद, पुणे (केंद्र शाखा) अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांनी करून दिला. तसेच पुणे शाखेचे वतीने श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी आपले विचार व्यक्त केले. कार्यक्रमाचे निवेदन सौ. वासंती वर्तक यांनी अत्यंत उत्तम रीतीने केले. श्री. पद्माकर शिरवाडकर यांनी आभार मानले.

त्याच रात्री कविवर्य पी. सावळाराम यांचे अध्यक्षतेखाली व प्रमुख पाहुणे कवी श्री. लक्ष्मीकांत तांबोळी यांचे उपस्थितीत कविसंमेलन झाले. या कार्यक्रमाचे संचालन कविवर्य म. पां. भावे यांनी केले. यात बाहेरगावच्या २०–२२ मान्यवर कवींनी सहभाग दिला.

दुसऱ्या दिवशी सकाळी ९ वाजता डॉ. बेडेकर विद्यामंदिरात प्रा. दामोदर मोरे यांच्या अध्यक्षतेखाली कवि-संमेलन (सत्र दुसरे) पार पडले. यांत नव्याजुन्या अशा ६० कवींनी भाग घेतला.



अनुक्रमणिका

त्याच दिवशी सकाळी व दुपारी मिळून एकूण तीन परिसंवाद रंगायतनाच्या वास्तूत घेण्यात आले. तीनही परिसंवाद अतिशय यशस्वी ठरले. ते परिसंवाद व त्यात सहभागी झालेले मान्यवर खालीलप्रमाणे—

परिसंवाद १ : विषय 'मराठीचे अध्ययन व अध्यापन दर्जेदार कसे होईल ? अध्यक्ष— डॉ. वि. भि. कोलते. वक्ते—डॉ. न. रा. पारसनीस, प्रा. म. ना. अदवंत, डॉ. द. ता. भोसले, निवेदन— श्री. अशोक चिटणीस.

परिसंवाद २ : विषय 'आत्मचरित्रातील खरे आणि खोटे' अध्यक्ष—प्रा. म. वि. फाटक, सहभागी वक्ते—डॉ. भीमराव कुलकर्णी, श्री. दया पवार, प्रा. राम कापसे, सौ. लीलाताई जोशी, निवेदन— श्री. सुरेंद्र वाजपेयी.

परिसंवाद ३ : विषय : 'मराठी साहित्याचा जमाखर्च' अध्यक्ष—डॉ सरोजिनी वैद्य, सहभाग—प्रा. मुरलीधर सायनेकर, डॉ. निर्मलकुमार फडकुले, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. गो पं. कुलकर्णी, निवेदक—सौ. आशा साठे.

सायंकाळी माननीय अध्यक्ष श्री. विद्याधर गोखले यांनी समारोपाचे भाषण केल्यावर संमेलन संपले. सौ. नंदिनी उपाध्ये यांनी सर्वांचे त्यांच्या सहकार्याबद्दल आभार मानले. रात्री चक्री कथाकथन व कथाकथनाचा रंगतदार कार्यक्रम झाला निवेदन सौ. मंदाकिनी भारद्वाज यांनी केले. कथाकथन : सर्वश्री. शंकर पाटील, शं. ना, नवरे, ना. ज. जाईल, वि. आ बुवा, ह. मो. मराठे तसेच श्रीमती नयना आचार्य, विनीता ऐनापुरे व अनुराधा गुरव यांचा सहभाग होता.

संमेलनाच्या यशस्वितेत माजी महापौर श्री. सतीश प्रधान, महानगरपालिकेचे सन्माननीय पदाधिकारी, नगरसेवक यांचा मोलाचा वाटा आहे. त्यांनी देणगीरूपाने दिलेल्या भरघोस आर्थिक सहकार्यामुळे व संमेलनाच्या कार्यक्रमासाठी रंगायतनची वास्तू दिल्यामुळेच संमेलन यशस्वी होण्यास फार मोठी मदत झाली. भारत सहकारी बँकेचेही आर्थिक सहकार्य लाभले. आम्ही या सर्वांचे अतिशय आभारी आहोत. त्याचप्रमाणे शहरातील प्रतिष्ठितांनी केलेले सहकार्य आम्ही विसरू शकत नाही. याप्रसंगी माजी महापौर श्री. सतीश प्रधान यांनी म. सा. प. पुणे शाखेस ५,००० रुपयांची वैयक्तिक देणगी जाहीर केली. संमेलनाच्या यशस्वितेसाठी पुणे केंद्र शाखेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील, तसेच सर्वश्री. राजेंद्र बनहट्टी व अन्य सदस्यांचे बहुमोल मार्गदर्शन झाले.

बुवांची वैद्यकीय तपासणी : हा कार्यक्रम म्हणजे श्री. वि. आ. बुवा व कविवर्य शंकर वैद्य यांनी परस्परांची घेतलेली मुलाखत. कार्यक्रमात विनोदाची भरपूर पेरणी असल्यामुळे श्रोते खूष होते. उपस्थितीही चांगली होती. हा कार्यक्रम २९ मे १९८७ रोजी नगर वाचन मंदिराचे गच्चीवर रात्री ९ वाजता घेण्यात आला. प्रास्ताविक व पाहुण्यांची ओळख श्री. चिं. शं. जोशी यांनी करून दिली. श्री. शिरवाडकर यांनी आभार मानले.

अहवाल वर्षात सौ. लीलाताई जोशी, नगर वाचन मंदिर, माजी महापौर, श्री. सतीश प्रधान, ठाणे महानगर पालिकेचे सदस्य, ठाणे वैभव, सन्मित्र कोकण, सकाळ, लोकसत्ता आदींचे संपादक यांचे बहुमोल सहकार्य मिळाल्याबद्दल संस्था त्यांची आभारी आहे.

साहित्यप्रेमी रसिक, सभासद, श्री. तुकाराम ठाणेकर यांचे अ. भा सा. संमेलनाहून परत येताना अपघाती निधन झाले. या दुःखद घटनेमुळे ठाणे शाखा एका चांगल्या साहित्य प्रेमिकाला मुकली आहे. कार्यकारी मंडळाने त्यांना श्रद्धांजली वाहून तसा ठराव केला.

**इचलकरंजी :**

पाक्षिक बैठक : शाखेतर्फे या वर्षापासून सभासदांची प्रत्येक पंधरवड्यात एक बैठक आयोजित करण्याचे ठरले आणि तशा बैठकी झाल्या. या बैठकीत साहित्यक चर्चा, उदयोन्मुख कवींचे काव्यवाचन, कॅसेट श्रवण इ. कार्यक्रम केले जातात.

काव्यलेखन स्पर्धा : शाखेतर्फे यावर्षी प्रथमच महाराष्ट्र राज्य पातळीवर महाविद्यालयीन व खुली अशी 'स्वरचित काव्यलेखन' स्पर्धा घेण्यात आली. या स्पर्धेला चांगलाच प्रतिसाद मिळाला. मुंबई, पुणे, गोवा, रत्नागिरी, नगर, जळगाव, सातारा, सांगली, सोलापूर भागातील सुमारे ७० कवींनी स्वर्धेत भाग घेतला. स्पर्धेतील पहिले तीन पारितोषिकविजेते पुढीलप्रमाणे :

प्रथम पारितोषिक रु. २००/— कु. योजना शहा, संगमनेर

द्वितीय पारितोषिक रु. १५०/– कु. प्रतिमा नारायण राजोळे, श्रीरामपूर.

तृतीय पारितोषिक रु. १००/– श्री. पांडुरंग वी. घोवी, जळगाव.

उत्तेजनार्थ पारितोषिक रु. ५०/– श्री. श्रीकांत शहा, कोरगाव, सातारा.

कवी संमेलन : मागील वर्षाप्रमाणे या वर्षीही ता. २–१०–८६ रोजी इचलकरंजी व परिसरातील नवोदित कवींचे 'कवी संमेलन' आयोजित केले. आपटे वाचन मंदिराच्या सुंदर वास्तूत झालेल्या या संमेलनात कोल्हापूर, सांगली, सातारा भागातील ५० कवींनी भाग घेतला. संमेलनाच्या अध्यक्षपदी सुप्रसिद्ध कवी श्री. कृ. व. निकुम्ब हे होते. प्रारंभी त्यांनी कवीमित्रांशी व श्रोत्यांशी थोडे हितगुज केले. संमेलनाच्या शेवटी मार्गदर्शनपर भाषण केले. श्रोत्यांची संध्याकाळ अधिकच खुलविणारे रंगतदार काव्यवाचन झाले.

प्रकाशन : इचलकरंजीचे उदयोन्मुख लेखक म. सा. प. सदस्य श्री. अरविंद कुंभार यांच्या 'आशादीप' या पहिल्या कादंबरीचा प्रकाशन समारंभ मा. श्री. क. वा आवाडे यांच्या शुभहस्ते झाला.

अभीष्टचिंतन : सुप्रसिद्ध कवी श्री. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज) यांच्या वयाची ७५ वर्षे पूर्ण झाल्या-बद्दल बैठक घेऊन त्यांच्यासाठी शुभेच्छा व्यक्त केल्या. या प्रसंगी उपस्थित सर्व सभासदांनी आपल्याला आवडलेल्या कुसुमाग्रजांच्या दोन कवितांचे वाचन केले.

साहित्यिक साहाय्य निधी : साहित्य परिषद, पुणे मार्फत साहित्यिक साहाय्य निधीस मदत म्हणून या शाखेतर्फे २८ मार्च १९८७ रोजी श्री शंकर पाटील यांच्या कथाकथनाचा कार्यक्रम आयोजित केला व निधीस रु. ३०००/– ची मदत केली. साहित्यिक सहाय्य निधीची कल्पना श्री. शंकर पाटील यांनी चांगल्या प्रकारे मांडली. या दिवशीच परिषदेचे पदाधिकारी श्री. शंकर पाटील, श्री. राजेंद्र बनहट्टी, श्री. राजा फडणीस यांच्या उपस्थितीत शाखा सभा-सदांची व निमंत्रितांची साहाय्य निधीसाठी बैठक आयोजित केली होती. या बैठकीत निधीस प्रत्येकी १००/– रु. देणारे पाच देणगीदार मिळाले.

**सांगली** : २४ ऑगस्ट १९८६ रोजी म. सा. प. शाखा सांगली, मौज प्रकाशन गृह मुंबई, सांगली जिल्हा नगर वाचनालय सांगली, आणि पानवलकर कुटुंबीय यांच्या संयुक्त विद्यमाने सुप्रसिद्ध साहित्यिक कै. श्री. दा. पानवलकर यांच्या पहिल्या पुण्यतिथीच्या निमित्ताने सुप्रसिद्ध नाटककार श्री. विजय तेंडुलकर, अभिनेत्री कु. प्रिया तेंडुलकर, प्रसिद्ध साहित्यिक श्री. प्रा. म. वा. धोंड यांची 'पानवलकरांच्या कथा' या विषयावर सांगली नगर वाचनालयाच्या सभागृहात व्याख्याने झाली. अध्यक्षस्थानी प्रा. म. द. हातकणंगलेकर होते. कार्यक्रमास मौज प्रकाशन गृहाचे श्री. पु. भागवत हजर होते. श्री. पंडित पानवलकर यांनी आभार मानले.

३ सप्टेंबर १९८६ रोजी सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. भालचंद्र नेमाडे यांचे 'साहित्यातील देशीपण' या विषया-वर श्री. मथुबाई गरवारे कन्या महाविद्यालय, सांगली येथे व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी शाखाध्यक्ष प्रा. म. द. हातकणंगलेकर होते. सहकार्यवाह श्री. संजय पाटील यांनी आभार मानले.

१० नोव्हेंबर १९८६ रोजी श्री. प्रमोद कोपर्डे यांचे 'काव्यवाचन' श्रीमती कस्तुरबाई वालचंद महाविद्यालय सांगली, येथे झाले. प्रास्ताविक परिचय व अध्यक्षस्थानी शाखाध्यक्ष प्रा. म. द. हातकणंगलेकर होते. कार्यवाह प्रा. सुभाष दगडे यांनी आभार मानले. कार्यक्रमास सुप्रसिद्ध साहित्यिक 'उपराकार' लक्ष्मण माने उपस्थित होते.

९ जानेवारी ८७ रोजी श्री. वामन होवाळ यांचे 'दलितकथा आणि माझी कथा' या विषयावर श्रीमती कस्तुरबाई वालचंद महाविद्यालय, सांगली येथे व्याख्यान झाले. प्रास्ताविक, परिचय व अध्यक्षस्थानी शाखाध्यक्ष प्रा. म. द. हातकणंगलेकर होते. कार्यवाह प्रा. सुभाष दगडे यांनी आभार मानले.

२५ जुलै १९८७ रोजी श्री. प्रा. विजय कोगनोळे यांच्या 'बकुळा' या कथासंग्रहाचे प्रकाशन म. सा. प. शाखा सांगलीतर्फे श्रीमती कस्तुरबाई वालचंद महाविद्यालय सांगली येथे प्रा. म. द. हातकणंगलेकर, प्राचार्य डॉ. टी. पी. उपाध्ये, प्रा. कडलासकर, प्रा. एन् वी. कुलकर्णी यांची भाषणे झाली. प्रा. विजय कोगनोळे यांनी आभार मानले.










२५ जुलै ८७ रोजी श्री. सतीश आळेकर यांचे 'दुसरा सामना' या नाटकाचे नाट्यवाचन चिंतामणराव वाणिज्य महाविद्यालय, सांगली येथील ग्रंथालय सभागृहात संपन्न झाले. हा कार्यक्रम अॅमॅच्युअर ड्रॅमॅटिक अॅसोसिएशन आणि महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सांगली यांच्या संयुक्त विद्यमाने घेण्यात आला. प्रास्ताविक व परिचय प्रा. अविनाश सप्रे यांनी केले. अध्यक्षस्थानी प्रा. म. द. हातकणंगलेकर होते.

**वाई** : दि. २१ डिसेंबर ८६ रोजी श्री. वामन होवाळ यांचे 'माझ्या लेखनविषयक प्रेरणा' या विषयावर व्याख्यान झाले व त्यानंतर दलित साहित्यावर चर्चा झाली.

दि. ७ फेब्रुवारी १९८७ रोजी वाईचे नाटककार प्रा. दिलीप जगताप यांनी आपल्या 'वचक' या एकांकिकेचे वाचन केले. नंतर झालेल्या चर्चेत श्री. अ. र. कुलकर्णी, प्रा. श्याम जोशी, श्री. पटेल, प्रा. विजयकुमार फरांदे, डॉ. अ. वि. प्रभुणे, डॉ. व. स. जोशी यांनी सहभाग घेतला.

दि. २३ फेब्रुवारी ८७ रोजी वि. सा. सं. चे अध्यक्ष, म. सा प. चे उपाध्यक्ष डॉ. राम शेवाळकर यांनी वाई शाखेस भेट दिली. म. सा. प. चे कार्य अधिक प्रभावी कसे करता येईल या बाबत डॉ शेवाळकर यांचे मार्गदर्शनपर भाषण झाले.

दि. २६ फेब्रुवारी ८७ रोजी श्री. प्रकाश पाडुरंग जाधव यांच्या 'बांग' या कादंबरीचे प्रकाशन प्रा. रा. ग. जाधव (प्रभारी विभाग संपादक, मानव्यविद्या कक्षा, मराठी विश्वकोश) यांच्या हस्ते झाले. अध्यक्षस्थानी डॉ. वसंत स. जोशी होते. 'बांग' या कादंबरीच्या प्रकाशनानिमित्ताने प्रा. रा. ग. जाधव यांनी ग्रामीण साहित्याच्या वैशिष्ट्यांवर प्रकट चिंतन केले. कादंबरीचा परिचय डॉ. सौ. नीलम हातेकर, डॉ. पंडित टापरे व प्रा. सतीश सूर्यवंशी यांनी करून दिला. दि. १४ एप्रिल ८७ रोजी शाखेचे कार्याध्यक्ष अॅड. श्री. अशोक स. भट यांनी श्री. शंकरराव खरात यांनी लिहिलेल्या डॉ. आंबेडकरांच्या आत्मचरित्राचा परिचय करून दिला. या आत्मचरित्राच्या गुणदोषांबाबत सविस्तर चर्चा झाली.

दि. १३ मे ८७ रोजी प्रा. सतीश सूर्यवंशी यांनी लिहिलेल्या 'चव्हाटा' या कादंबरीचे प्रकाशन मराठी विश्वकोश मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हस्ते झाले. श्री. अशोक भट यांनी प्रास्ताविक भाषण व स्वागत केले. डॉ. अ. वि. प्रभुणे, डॉ. सौ. नी. र. हातेकर, डॉ. पंडित टापरे, डॉ. विष्णुपंत जगताप (सातारा), श्री. मार्तंड जोशी (तळोदा), प्राचार्य डॉ. आनंदराव कदम यांनी 'चव्हाटा' कादंबरीवर विविध मते मांडली. समारंभाच्या अध्यक्षस्थानी प्राचार्य नारायणराव गायकवाड हे होते.

**कोल्हापूर** : १९८६ ते १९८९ या तीन वर्षांसाठी पुढील कार्यकारी मंडळ एकमताने निवडण्यात आले. अध्यक्ष श्री. चिं. ह. भाटवडेकर, कार्याध्यक्ष प्रा. मंदाकिनी खांडेकर, उपाध्यक्ष प्रा. मधुमालती कोटिभास्कर, कार्यवाह श्री. शशिकांत महाडेश्वर व प्रा. भैरव कुंभार, कोषाध्यक्ष श्री. वसंत वणकुद्रे, सदस्य प्रा. चंद्रकुमार नलगे, श्री. मा. ग. पातकर, प्रा. प्रकाश कुंभार, प्रा. प्रसन्नकुमार पाटील, श्री. राजीव वावळे, निमंत्रित प्रा. म. अ. कुलकर्णी, डॉ. बापूजी संकपाळ, प्रा. वत्सला पाटील.

**विविध कार्यक्रम** : दि. १५ ऑगस्ट ८६ रोजी म. सा. प. पुरस्कृत बालकवी स्मृत्यर्थ व्याख्यान आयोजित करण्यात आले. डॉ. अनुराधा पोतदार यांचे प्राचार्य म. द. देशपांडे यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झाले. परिचय डॉ. अंबादास माडगूळकर यांनी व आभार प्रदर्शन सौ. अनीता जनवाडकर यांनी केले. त्यानंतर डॉ. अनुराधा पोतदार यांचे काव्यवाचन झाले. प्रतिभानगर सह. संस्थेने समारंभासाठी सहकार्य केले. दि. ५ सप्टेंबर ८६ रोजी कै. वि. स. तथा भाऊसाहेब खांडेकर स्मृतिदिन शाखा-अध्यक्ष चिं. ह. भाटवडेकर यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. डॉ. सुमती क्षेत्रमाडे, श्री. रा. वा. शेवडे गुरुजी, प्रा. वत्सला पाटील, श्री. राम देशपांडे, प्रा. श्रीकांत नरुले व प्रा. मंदाकिनी खांडेकर यांनी भाऊंच्या हृदयस्पर्शी आठवणी सांगितल्या. श्री. शशिकांत महाडेश्वर यांनी आभार मानले.

दि. १८ ऑक्टोबर, ८६ रोजी 'प्रतिज्ञा पाठ्यपुस्तकातील' या पुस्तकावर पुस्तकाचे लेखक व विचारवंत











श्री. यदुनाथ थत्ते यांच्या उपस्थितीत चर्चा आयोजित करण्यात आली. अध्यक्षस्थान चिं. ह्. भाटवडेकर यांनी भूषविले. शशिकान्त महाडेश्वर यांनी परिचय करून दिला. प्रा. मधुमालती कोटिभास्कर यांनी आभार मानले.

दि. १४ डिसेंबर, ८६, ग. दि. माडगूळकर स्मृतिदिन सुप्रसिद्ध चित्रपट, कथालेखक व दिग्दर्शक, मा. दिनकर द. पाटील यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. शाखाध्यक्ष श्री. चिं ह्. भाटवडेकर यांच्या प्रास्ताविकानंतर कार्यवाह शशिकांत महाडेश्वर यांनी अहवाल सादर केला. प्रा. मंदा कदम यांच्या ग. दि. मा. साहित्यविषयक भाषणानंतर श्री. गजानन भोगावकर, श्री. माधव पातकर, श्री. बाबा पाटील, डॉ. अंबादास माडगूळकर यांनी आण्णांच्या विविध पैलूदर्शी आठवणी सांगितल्या. रेडिओस्टार जनार्दन गांधी यांनी ग. दि. मां. ची गीते सादर केल्यानंतर प्रा. मंदाकिनी खांडेकर यांनी आभार मानले.

दि. २५ फेब्रुवारी, ८७ रोजी म. सा. प पुरस्कृत कै. वि. कों. ओक स्मृत्यर्थ व्याख्यान आयोजित केले गेले. डॉ. बापूजी संकपाळ यांचे 'मराठी बखर : इतिहास की वाङमय' या विषयावरचे माहितीपूर्ण व्याख्यान व इतिहास संशोधक डॉ. जयसिंगराव पवार यांचे अध्यक्षीय भाषण हा या समारंभाचा विशेष. प्रास्ताविक व परिचय शशिकांत महाडेश्वर यांनी व आभार प्रदर्शन प्रा. मधुमालती कोटिभास्कर यांनी केले. २ मार्च ८७ रोजी सुप्रसिद्ध अभिनेत्री लालन सारंग यांचा 'मी आणि माझ्या भूमिका' हा साभिनय कार्यक्रम सादर करण्यात आला. डॉ. रजनी भागवत यांनी स्वागत व पाहुण्यांचा परिचय करून दिला.

दि २९ मार्च, ८७ रोजी साहित्यिक साहाय्य निधी संदर्भात शाखासदस्य व हितचिंतकांची बैठक आयोजित करण्यात आली. म. सा प. अध्यक्ष श्री. शंकर पाटील, कार्याध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी, कार्यवाह श्री. राजा फडणीस हे मार्गदर्शनासाठी उपस्थित होते. श्री शशिकांत महाडेश्वर यांनी स्वागत केल्यानंतर प्रा. भैरव कुंभार यांनी शाखा कार्याचा आढावा घेतला. चिं. ह्. भाटवडेकर, श्री. वा. गो. पंडित, श्री. जगदीश खेबूडकर, प्रा. प्रसन्नकुमार पाटील, प्रा. मंदाकिनी खांडेकर, श्री. रा. वा. शेवडे गुरुजी, प्रा. अंबुजा सोनटक्के, प्रा. प्रकाश कुंभार, प्रा. मधुमालती कोटिभास्कर, श्री. बाळासाहेब घोपेश्वरकर यांनी चर्चेत भाग घेतला.

शाखेच्या वतीने रु. ३५००।– निधी गोळा करून मध्यवर्ती कार्यालयाकडे पाठविण्यात आला.

दि. १९ एप्रिल ८७ रोजी 'शोध विज्ञान कोश' हा मौलिक प्रबंध लिहून शिवाजी विद्यापीठाची मराठीतील पहिली डी. लिट. ही अत्युच्च पदवी संपादन करणारे डॉ. दु. का. संत यांचा घरगुती स्वरूपात सत्कार करण्यात आला. सत्कार समारंभात श्री. चिं. ह्. भाटवडेकर, प्रा. मंदाकिनी खांडेकर, प्रा. भैरव कुंभार, प्रा. मधुमालती कोटिभास्कर श्री. शशिकांत महाडेश्वर, प्रा. प्रकाश कुंभार, श्री. मा. ग. पातकर आदींनी भाग घेतला. विविध संस्थांतर्फे आयोजित डॉ. संत यांच्या सत्कार समारंभातही शाखा सहभागी झाली.

दि. १४ मे ८७ रोजी कोल्हापूर शाखा सदस्य व हितचिंतकांचे प्रथम वार्षिक संमेलन आयोजित करण्यात आले. या प्रसंगी सुप्रसिद्ध नाटयनिर्मिते व दिग्दर्शक श्री. मदनमोहनजी लोहिया यांचे 'मराठी रंगभूमी' या विषयावर प्रात्यक्षिकांसह व्याख्यान झाले. अध्यक्ष चिं. ह्. भाटवडेकर यांच्या स्वागतपर भाषणानंतर कार्यवाह शशिकांत महाडेश्वर यांनी शाखा अहवाल सादर केला. कर्नल आनंदराव जाधव यांनी 'मस्ताना व सुंदरी' ही कथा या प्रसंगी सादर केली. प्रा. पां. ना. कुलकर्णी यांचे चिंतनपर अध्यक्षीय भाषण झाले. कार्याध्यक्ष प्रा. मंदाकिनी खांडेकर यांनी आभार मानले.

दि. २९ जून ८७ रोजी झालेल्या देशभक्त डॉ. रत्नाप्पाण्णा कुंभार यांच्या विविध संस्थांतर्फे आयोजित सत्कार समारंभात म. सा. प. कोल्हापूर शाखा सहभागी झाली.

**शाखासभासद :**

शाखेतर्फे चालू वर्षी १० नवीन सामान्य सभासद व ९ आजीव सभासद नोंदविण्यात आले.

**सोलापूर :**

म. सा. प शाखा : पदाधिकारी अध्यक्ष– डॉ. निर्मलकुमार फडकुले, उपाध्यक्ष– प्रा. यशस्विनी खाडिलकर,



अनुक्रमणिका

उपाध्यक्ष–कवी श्री. संजीव, कार्याध्यक्ष–श्री. नागेश सुखसे, कोषाध्यक्ष– श्री. रा. व्यं. छत्रपती, कार्यवाह–प्रा. मीर इसहाक शेख, श्री. ना. मा. कांबळे याशिवाय सर्वश्री–जयप्रकाश अभंगे, सरदेशमुख, दडके, सौ. सिंधुताई कुलकर्णी इ. बारा कार्यकारी सदस्यांची निवड एकमताने झाली.

कै. पु. भा भावे ' व्यक्ति आणि वाङ्मय ' विषयावर प्रा. चाफेकर, नागपूर यांचे व्याख्यान.

अध्यक्ष डॉ. फडकुले. स्वागत–प्रास्ताविक श्री. रा. व्यं. छत्रपती यांनी केले तर श्री. नागेश यांनी आभार मानले.

नांदेड संमेलनाध्यक्ष श्री. शंकर पाटील यांचा सत्कार, अध्यक्ष श्री. रंगा वैद्य, प्रमुख वक्ते, डॉ. फडकुले, कविवर्य संजीव यांच्या हस्ते महावस्त्र व श्रीफळ देऊन गौरव. आभार, श्री. रा. व्यं. छत्रपती. ' अक्करमाशी ' कार श्री. शरणकुमार लिंबाळे यांचा गौरव, अध्यक्ष. डॉ. फडकुले. प्रा. त्र्यं वि. सरदेशमुख हस्ते महावस्त्र व श्रीफळ देऊन सत्कार. प्रास्ताविक प्रा. मीर इसहाक शेख यांनी केले, श्री. रा. व्यं. छत्रपती यांनी आभार मानले.

श्री. वामनराव कर्डक यांचा बुद्धविहार, सोलापूर येथें शाखेच्या वतीने कोषाध्यक्ष श्री. रा. व्यं. छत्रपती यांनी सत्कार केला.

कविवर्य संजीवांच्या अध्यक्षतेखाली विनोदी कवी श्री. बाबूलनाथ यांच्या काव्यवाचनाचा कार्यक्रम झाला. कार्यक्रमाचे संचलन प्रा. सौ. सिंधुताई कुलकर्णी यांनी केले. प्रास्ताविक ओळख व आभार श्री. नागेश सुखसे यांचेकडे होते.

सालाबादप्रमाणे स्व. कवी कुंजविहारी काव्यस्पर्धा घेण्यात आल्या. या प्रसंगी पद्मश्री पं. सुमतीबेन शहा, श्राविका संस्था, नगर श्री. नागेश सुखसे, प्रा. सिंधुताई कुलकर्णी हे समारंभास उपस्थित होते. या काव्यस्पर्धेस दरसाल बक्षिसे देण्याचे निश्चित करण्यात आले. कार्यक्रमाचे अध्यक्ष कविवर्य रा. ना. पवार हे होते तर प्रमुख वक्ते डॉ. फडकुले होते. कार्यक्रमाच्या शेवटी प्रा. सौ. सुनीला नूलकर यांनी आभार मानले.

अखिल भारतीय दलित साहित्य संमेलनाचे (नासिक) अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल ॲड. विलास शहा यांचे अध्यक्षतेखाली डॉ. फडकुले यांचा सत्कार कविवर्य संजीवांच्या हस्ते. प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख, कवि मा. गो. फाटकर, चंद्रभूषण कुलश्रेष्ठी इत्यादी साहित्यिकांच्या उपस्थितीत. कार्यक्रमाचे संयोजन श्री. नागेश सुखसे यांनी केले तर प्रा. शेख यांनी आभार मानले.

श्री. आनंद यादव यांचे ' आपला समाज व आपले साहित्य ' या विषयावर प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान. प्रास्ताविक व परिचय डॉ. फडकुले, आभार श्री. छत्रपती.

श्री. अजिज नदाफ यांच्या ' जाग्या झालेल्या सावल्या ' या आत्मवृत्तपर कादंबरीचे प्रकाशन श्री. रंगा वैद्य यांच्या अध्यक्षतेखाली. मा. शिक्षणाधिकारी प्रा. योगीराज वाघमारे यांच्या हस्ते. या प्रसंगी डॉ. फडकुले, प्रा. बेन्नूर, डॉ. हिरेमठ यांची भाषणे. कार्यक्रमाचे संयोजन श्री. शेख व सुखसे.

श्री. विद्याधर गोखले यांचे व्याख्यान. अध्यक्ष रंगा वैद्य, परिचय डॉ. फडकुले, प्रास्ताविक श्री. छत्रपती, आभार श्री. शेख, संयोजन जयप्रकाश अभंगे.

श्री. चंद्रकांत घोरपडे यांचे ' पत्रकारिता व साहित्य ' या बिषयावर डॉ. फडकुले यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान. प्रास्ताविक व परिचय कार्याध्यक्ष श्री. नागेश सुखसे, आभार श्री. प्रा. शेख, कार्यक्रम संयोजन श्री. छत्रपती व प्रा. सौ. सिंधुताई कुलकर्णी.

प्राचार्य चंद्रशेखर कपाळे यांच्या ' साहित्य संवदे ' या ग्रंथास पुरस्कार मिळाल्याने त्यांचा सत्कार श्री. सुधाकर चौधरी यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. फडकुले यांच्या हस्ते करण्यात आला. श्री. राजशेखर मडकींचे प्रास्ताविक व आभार.

प्रा. श्री. र. भिडे यांच्या ' रामायणातील शाप व वरदान ' या ग्रंथाचे प्रकाशन, अध्यक्ष डॉ. निर्मलकुमार फडकुले आणि श्री. अरविंद श्री. जोशी, संपादक दै. तरुण भारत, सोलापूर यांच्या हस्ते. याप्रसंगी श्री. अनंतराव कुलकर्णी, डॉ. ग. ना. साठे, पुणे यांचे व्याख्यान. प्रास्ताविक व परिचय श्री. रा. व्यं छत्रपती. आभार प्रा. मीर इसहाक शेख.



अनुक्रमणिका






कविवर्य कुसुमाग्रजांच्या अमृतमहोत्सवनिमित्त प्रा. सुमती निरगुडे यांचे ' कुसुमाग्रजांचे साहित्य ' या विषयावर व्याख्यान, अध्यक्ष डॉ. फडकुले, प्रास्ताविक व परिचय प्रा. सौ. सिंधुताई कुलकर्णी, आभार प्रा. सौ. सुनीला नूलकर.

पद्मश्री पं. सुमतीबेन शहा यांच्या अमृतमहोत्सवानिमित्त सत्कारप्रसंगी अध्यक्ष श्री. रत्नाप्पाण्णा कुंभार, पं. महादेवशास्त्री जोशी यांचे हस्ते म. सा. प. च्या वतीने श्री. रा. व्यं. छत्रपतींनी महावस्त्र व श्रीफळ देऊन बेनचा सत्कार केला.

**येवले :**

या शाखेने सालाबादप्रमाणे या वर्षीही विविध कार्यक्रम आयोजित केले होते. प्रामुख्याने व. पु. शिष्य व ' माझे घर माझा संसार ' चित्रपटाची नायिका कु. मुग्धा चिटणीस यांचे कथाकथन आणि दूरदर्शन व आकाशवाणी कलावंत श्री. भीमराव पांचाळे यांच्या ' गीतवहार ' या कार्यक्रमाचा आवर्जून उल्लेख करावा लागेल.

कु. मुग्धाचे कथाकथन : कु. मुग्धा चिटणीस यांनी आपल्या साभिनय व जोशपूर्ण कथाकथनामुळे रसिकांना मंत्रमुग्ध केले. त्यांनी सांगितलेल्या कथा बहुतेक नवीन होत्या. दि. ३०-८-८६ रोजी झालेल्या या कार्यक्रमास मुग्धाचे वडील प्रा. अशोक चिटणीस हेही उपस्थित होते. हा कार्यक्रम पुन्हा करावा अशी येवल्यातील रसिकांनी मागणी केली आहे.

सुश्राव्य-' गीतवहार ' दि. २७-११-८६ रोजी दूरदर्शन व आकाशवाणी कलावंत श्री. भीमराव पांचाळे यांचा ' गीतवहार ' हा सुश्राव्य कार्यक्रम सादर करण्यात आला. श्री. पांचाळे यांनी आपल्या नेहमीच्या शैलीत भक्तिगीते, नाट्यगीते आणि गझल गायन केले.

येत्या वर्षात विविध वक्त्यांची व्याख्याने व नवीन उपक्रम आयोजित करण्याचा शाखेचा मानस आहे. त्यासाठी शाखेचे कार्यकारी मंडळ प्रयत्नशील आहे.

**धुळे :**

न्या. गो. भि. अस्मर यांचे ज्ञानेश्वरीवर व्याख्यान. ' माटे यांचा संत साहित्य विचार ' या विषयावर माटे जन्मशताब्दीनिमित्त प्रा. डॉ. मु. श्री. कानडे (मराठी विभाग प्रमुख-पुणे विद्यापीठ) यांचे अभ्यासपूर्ण व्याख्यान. याच प्रसंगी ' राष्ट्रीय व्याख्याता ' म्हणून मान्यता मिळाल्याबद्दल डॉ. कानडे यांचा शाल व श्रीफळ देऊन सत्कार.

श्री. मधुकरबुवा आळंदीकर यांचे ज्ञानेश्वरीवर रसाळ प्रवचन.

' दर्वविंदू ' काव्यसंग्रह प्रकाशन समारंभात सहभाग व प्रमुख पाहुणे प्रा. डॉ. गंगाधर पानतावणे यांच्यासह स्थानिक साहित्य सेवकांचा हार व पुष्पगुच्छ देऊन सत्कार.

यावर्षी जवळजवळ ३५ आजीव सदस्य नोंदविण्यात आले.

**लासलगाव :**

मोठ्या प्रमाणात व्यापारी उलाढाल असलेल्या लासलगावात १९८६ च्या जुलै महिन्यात म. सा. प. शाखेची मुहूर्तमेढ रोवण्यात आली. ह्या गावातील व्यापार, व्यवसाय व शिक्षणक्षेत्रातील साहित्यप्रेमी मंडळींना एकत्रित करण्याचा हा यशस्वी प्रयत्न फलद्रूप झाला आणि साठ सभासद पहिल्याच वर्षी शाखेला लाभले.

स्वातंत्र्यदिनाच्या दुसऱ्या दिवशी शाखेची रीतसर सभा होऊन पदाधिकारी व कार्यकारी मंडळाची निवड करण्यात आली. ह्याच वेळी मिरजगाव येथील कवी श्री. प्रकाश घोडके ह्यांच्या काव्यगायनाचा कार्यक्रम झाला. येथील वैद्यकीय अधिकारी डॉ. उषा बंदछोडे ह्यांनी श्री सरस्वती पूजन करून दीप प्रज्वलित केला. ह्या कार्यक्रमास स्थानिक काव्यरसिक उपस्थित होते.

महात्मा गांधी जयंतीदिनी स्थानिक कवी संमेलन आयोजित करण्यात आले. जुन्या-नव्या, तरुण-वृद्ध अशा तीस कवींनी आपल्या वेगवेगळ्या रंगाढंगाच्या कविता सादर केल्या. श्रोतृवर्गात सरपंच श्री. सुमतीशेठ आबड, श्री. वसंतराव पानगव्हाणे व अन्य प्रतिष्ठित रसिक होते. कार्यवाह श्री. प्रकाश होळकर ह्यांना जैन युवक मंडळाच्या राज्य पातळीवरील काव्यवाचन स्पर्धेत सुवर्णपदक मिळाल्याबद्दल त्यांचा हार्दिक सत्कार करण्यात आला. अध्यक्ष-स्थानी जुने कवी डॉ. भरतकुमार सोहोनी होते.



अनुक्रमणिका

दि. १०. डिसेंबर हा मानवी हक्क दिन. या दिवशी लासलगावातील वयोवृद्ध नागरिक, सेवानिवृत्त शिक्षक व साहित्यिक श्री. पुंजाजी शेजवळ ह्यांच्या 'पुंजी' ह्या आत्मचरित्राचा प्रकाशन समारंभ संपन्न झाला.

पीपल्स एज्युकेशन सोसायटीचे सेक्रेटरी श्री. व्ही. डी. गायकवाड ह्यांच्या हस्ते 'पुंजी' प्रकाशित झाले. प्रकाशक श्री. बाबा भांड (साकेत प्रकाशन औरंगाबाद). प्रख्यात साहित्यिक प्रा. प्र. ई. सोनकांबळे, प्रा. विजय काचरे ह्यांनी ह्या कामात विशेष परिश्रम घेतले. शेजवळ गुरुजींच्या नागरी सत्कारासाठी माजी आमदार श्री. द. भि. पाटील, खरेदी विक्री संघाचे माजी चेअरमन श्री. सी. भा. पाटील होळकर आणि सरपंच श्री. सुमती आवड ह्यांचे मोलाचे सहकार्य लाभले.

रंगपंचमीच्या रात्री सुरांचा उत्सव साजरा करण्यासाठी उदयोन्मुख गायक श्री. विश्वनाथ भोसले (कोपरगाव) ह्यांच्या भावगीत गायनाचा कार्यक्रम झाला. अध्यक्ष श्री. मा. रा. वैद्य ह्यांनी भोसले ह्यांचा हार्दिक सत्कार केला.

वर्षभरातील शाखेच्या वाटचालीला सर्व सभासदांचे हार्दिक सहकार्य लाभले. विशेषतः श्री. ज. वूव (उपाध्यक्ष), डॉ. शिवाजीराव पाटील, डॉ. शकुंतला परांजपे, श्री. वसंतराव सोनावणे, श्री. यशवंतराव दरेकर, सौ. इंदुमती रजपूत, प्रा. सतीश श्रीवास्तव, प्रा. अ. ना. कुलकर्णी, श्री. नरेंद्र राणा, श्री. अ. व. पठाण ह्यांचे वेळोवेळी हार्दिक सहकार्य लाभले.

**श्रीरामपूर :**

दि. १७ सप्टेंबर ८६ रोजी मा. ॲड. रावसाहेब शिंदे (अध्यक्ष, म. सा. प. श्रीरामपूर शाखा) यांच्या अध्यक्षतेखाली कार्यकारिणीची बैठक घेण्यात आली. त्यानंतर झालेल्या सर्वसाधारण सभेत स्थानिक कवींचे काव्यवाचन झाले.

दि. १९ ऑक्टोबर ८६ रोजी म. सा. प. तर्फे जानेवारी ८६ त घेण्यात आलेल्या व उत्तीर्ण झालेल्या प्राज्ञ परीक्षेची प्रमाणपत्रे विद्यार्थ्यांना प्रदान करण्यात आली. कार्यक्रमाचे अध्यक्ष ॲड. रावसाहेब शिंदे होते. याचवेळी प्राज्ञ परीक्षेचे वर्ग घेणाऱ्या अध्यापकांचाही सत्कार करण्यात आला. तसेच सुप्रसिद्ध ग्रामीण साहित्यिक श्री. नामदेवराव देसाई यांचे कथाकथन संपन्न झाले. कार्यक्रमाचे सूत्र संचलन सौ. सुमती लांडे (कार्यवाह) यांनी केले.

दि. ३१ जानेवारी ८७ रोजी. डॉ. दादासाहेब आगाशे यांच्या अध्यक्षतेखाली नवोदित कवी श्री. के. पी. सागर व बाबासाहेब सौदागर यांचे काव्यवाचन झाले. सूत्रसंचलन सौ. मेघा किराणे यांनी केले.

जानेवारी ८७ त घेण्यात आलेल्या प्राज्ञ व विशारद या परीक्षांना बसलेल्या विद्यार्थ्यांची सर्वांगीण तयारी करून घेण्यासाठी विनाशुल्क अभ्यासवर्ग चालविण्यात आले. या वर्गांना प्रा. डॉ. रत्नाकर मंचरकर, प्रा. विजय कसबेकर, प्रा. बबनराव विलायते, प्रा. कु. सुनीता मुळे, मेघा किराणे यांनी मार्गदर्शन केले.

दि. २१ एप्रिल, ८७ रोजी मा. ॲड. रावसाहेब शिंदे यांच्या अध्यक्षतेखाली म. सा. प. श्रीरामपूर शाखेचे पदाधिकारी डॉ. र. बा. मंचरकर (कार्याध्यक्ष), सुमती लांडे (कार्यवाह) यांचा त्यांना अनुक्रमे राज्य पुरस्कार (मुक्तेश्वराची कविता– डॉ. र. बा. मंचरकर व कै. केशवराव कोठावळे पुरस्कार शब्दालय-दिवाळी अंक १९८६ संपा. सुमती लांडे) मिळाल्याबद्दल भेटवस्तू देऊन सत्कार करण्यात आला.

याच वेळी स्थानिक कवींचे काव्यवाचन संपन्न झाले. कार्यक्रमाचे सूत्रसंचलन प्रा. विजय कसबेकर यांनी केले.

**ऋणनिर्देश :**

यावर्षी परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या विविध कार्यात अनेक व्यक्ती आणि संस्था यांचे सहकार्य लाभले. महाराष्ट्र राज्य शिक्षण खाते, ग्रंथालय संचालनालय, साहित्यसंस्कृती मंडळ, विश्वकोश कार्यालय, पुणे व पिंपरी–चिंचवड महानगरपालिका, विशिष्ट कार्यासाठी देणग्या देणारे देणगीदार, शाखासभांचे पदाधिकारी, वृत्तपत्र–नियतकालिके, नव्याने झालेले आजीव सदस्य व परिषदेचे सर्व सदस्य व हितचिंतक या सर्वांचे आम्ही ऋणी आहोत.

आपले

**राजा फडणीस / म. वि. गोखले / प्रभाकर अत्रे**

कार्यवाह



अनुक्रमणिका

# परिषद-वार्ता

(१ जुलै १९८७ ते ३१ ऑगस्ट १९८७)

### कै. र. वा. दिघे स्मृतिदिन

कै. र. वा. दिघे यांचे स्मृतिदिनानिमित्त दि. ६ जुलै ८७ रोजी डॉ. सुधाकर भोसले यांचे " ग्रामीण साहित्या-कडून अपेक्षा ' या विषयावर भाषण झाले.

### कै. वामन मल्हार जोशी स्मृतिदिन

कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त दि. २० जुलै ८७ रोजी प्राचार्य डॉ. कमलाकर श्रीखंडे यांचे ' एकोणि-साव्या शतकातील स्त्री-जीवन ' या विषयावर व्याख्यान झाले.

### कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिन

दि. २२ जुलै ८७ रोजी कै. ग. ल. ठोकळ यांचे स्मृतिदिनानिमित्त श्री. शंकर पाटील यांचे ' ललित साहित्य : काही समज आणि गैरसमज ' या विषयावर व्याख्यान झाले.

### श्री. सावतामहाराज व्याख्यानमाला

संतश्रेष्ठ श्री. सावतामहाराज यांचे स्मरणार्थ दि. ३० व ३१ जुलै ८७ या दिवशी डॉ. दि. ब. केरूर यांची ' महाराष्ट्रातील अवधूत गंगा-दोन अमृतधारा ' या विषयावर व्याख्याने झाली.

### श्री. शंकर पाटील कथा/कादंबरी पारितोषिक

श्री. शंकर पाटील सत्कार समितीने जमविलेल्या व परिषदेकडे सुपूर्त केलेल्या निधीतून या वर्षी प्रथमच दि. ९ ऑगस्ट ८७ रोजी श्री. गौरी देशपांडे यांच्या ' आहे हे असं आहे ' या कथासंग्रहाला पारितोषिक व मानचिन्ह देण्याचा समारंभ आयोजित केला होता. सुप्रसिद्ध कथालेखक श्री. अरविंद गोखले यांचे हस्ते पारितोषिक देण्यात आले. सौ. गौरी देशपांडे यांचेतर्फे प्रकाशक श्री. श्री. पु. भागवत यांनी पारितोषिकाचा स्वीकार केला. परीक्षकांतर्फे डॉ विलास खोले यांनी भाषण केले.

### कै. पु. भा. भावे स्मृतिदिन

दि. १७ ऑगस्ट ८७ रोजी कै. पु. भा. भावे स्मृतिदिनानिमित्त डॉ. शशिकांत लोखंडे यांचे ' कथाकार भावे ' या विषयावर भाषण झाले. नंतर श्री. मिलिंद वेडेकर यांचे कथाकथन झाले. कै. भावे यांच्या नाटकातील काही प्रवेश सौ. इला भाटे व श्री. मिलिंद वेडेकर यांनी सादर केले. दिग्दर्शन श्री. विश्वास गाडे यांचे होते. राज्य शिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात हा कार्यक्रम पार पडला.

□

महाराष्ट्र साहित्य परिषद

शेड्यूल ८

**दिनांक ३० जून**

| निधी व देणी | | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|---|
| **विश्वस्त निधी** | | | |
| मागील ताळेबंदाप्रणे | | ३,५५,३३७–४५ | |
| आजीव सभासद (८६–८७) | | ४५३४१–०० | ४००६७८–४५ |
| **इतर राखीव निधी** | | | |
| (अ) इमारत | | | ८९६४४–९४ |
| (ब) ग्रंथालय | | | २३५७३–१० |
| (क) वाङ्‌मयेतिहास | | | ६७३००–०६ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ७७२७५–८६ | | |
| + ८६–८७ मधील विक्री | १४१०५–३८ | | |
| + ३०–६–८७ चा साठा | ४९५९४–६२ | | |
| | १४०९७५–८६ | | |
| – १–७–८७ चा साठा | ६३७००–०० | | |
| – ८६–८७ मधील खर्च | ९९७५–८० | | |
| **पारितोषिके व स्मृतिदिन निधी** | | १,६७,४६०–०० | २,११,४६०–०० |
| + ८६–८७ मधील जमा | | ४४,०००–०० | |
| **प्रॉव्हिडंड फंड खाते** | | | २०,३५७–०२ |
| मागील ताळेबंदावरून | | १५२२०–४२ | |
| + ८६–८७ मधील जमा | | ५१३६–६० | |
| **इतर देणी** | | | ३६०९६–२२ |
| **अनामत** | | | १०,०००–०० |
| **ग्रंथालय अनामत** | | | २६,१२२–०० |
| मागील ताळेबंदानुसार | | २२०८६–०० | |
| + ८६–८७ मधील जमा | | ४०३६–०० | |
| **हिशोब तपासनीस** | | | ५००–०० |



अनुक्रमणिका

नियम (१) प्रमाणे

## १९८७ रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **स्थिर जिंदगी** | | ५७९२६–७५ |
| मागील ताळेबंदानुसार | ५९,४१२–०५ | |
| – घसारा २.५ टक्के | १४८५–३० | |
| **गुंतवणुका** | | १,२१,५५०–०० |
| (अ) कर्जरोखे दर्शनी किमतीचे | ५३००–०० | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४७ | २७००–०० | |
| | ८०००–०० | |
| (ब) शेअर्स सें. प्रॉ. रेल्वेज | २३००–०० | |
| महाराष्ट्र स्टेट को. ऑप. बँक | १२५०–०० | |
| (क) टेल्को रॉयल डिबेंचर्स | ६०,०००–०० | |
| (ड) महानगर टेलिफोन निगम | ५०;०००–०० | |
| **फर्निचर व डेडस्टॉक** | | १०,३६०–७९ |
| मागील ताळेबंदानुसार | १०,४९९–७९ | |
| + ८६–८७ मधील खरेदी | १०१२–२० | |
| | ११,५११–९९ | |
| घसारा १० टक्के | ११५१–२० | |
| **ग्रंथालय** | | ३२,४३७–१३ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३१,९८२–०० | |
| + ८६–८७ मधील खरेदी | ४०५९–२५ | |
| | ३६०४१–२५ | |
| – घसारा १० टक्के | ३६०४–१२ | |
| **शिल्लक साठा** | | ९२३१६–०७ |
| वाङ्मयेतिहास प्रकाशने | ४९,५९४–६२ | |
| संशोधन प्रकाशने | १६३२१–४५ | |
| मराठी फार्स | २६,४००–०० | |

| निधी व देणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
| --- | --- | --- |
| **मराठी फार्स** | | १६८१९–८३ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ४३६९–७५ | |
| + ८६–८७ मधील विक्री | ५७३३–८५ | |
| + ३०–६–८७ चा साठा | २६४००–०० | |
| | ३६५०३–६० | |
| – ८६–८७ चा खर्च | १९६८३–७७ | |
| **साहित्यिक साहाय्य निधी** | | ४४८२५–०० |
| **संशोधन प्रकाशने** | | ८१४१–५७ |
| ८६–८७ मधील विक्री | ७१७८–५५ | |
| ३०–६–८७ चा साठा | १६३२१–४५ | |
| | ९३५००–०० | |
| – मागील ताळेबंदानुसार | ८१६७–१७ | |
| वजा ८६–८७ खर्च | २५–६० | |
| **साहित्य परिषद पारितोषिक निधी** | | ३९१४–२५ |
| **अखेरच्या शिलका** | | ३४४३७–६८ |
| बँक ऑफ बडोदा (करंट) | १९,८११–९४ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र (सेव्हिंग्ज) | १४६२५–७४ | |
| | एकूण रुपये | ९९३८७०–१२ |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार. पाटणकर अँड असोसिएटस् चार्टर्ड अकौंटंट्सकरिता

पुणे दि. ५–९–८७

(एन्. सी. भळगट) भागीदार



अनुक्रमणिका



| जिंदगी व येणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| वीज बोर्ड अनामत | | २६०-०० |
| आयकर वसूली | | ३४१९-०० |
| इतर येणी | | ५८११-२५ |
| अॅडव्हान्स | | १७४२-८४ |
| ठेवी | | ४,६८,९००-०० |
| (अ) पारितोषिके व स्मृतिदिन | २५,५००-०० | |
| (ब) बँक ऑफ महाराष्ट्र ठेवी | २३,४००-०० | |
| (क) विश्वस्त ठेवी | २,९२,५००-०० | |
| (ड) कार्यकारी मंडळ ठेवी | ५६,५००-०० | |
| (इ) स्टेट बँक ऑफ इंडिया | ७०,०००-०० | |
| (फ) ग्रंथालय अनामत | १,०००-०० | |
| प्रॉ. फंड ठेवी | | २०३५७-०२ |
| ठेवी | ८२९४-०१ | |
| सेव्हिंग्ज खाते | १२०६३-०१ | |
| तूट | | १,१६,८४५-३४ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ८५०९४-३३ | |
| + ८६-८७ मधील तूट | ३१७५१-०१ | |
| अखेरच्या शिलका | | ६११९४३-९३ |
| रोख | ११८८-३२ | |
| बँक ऑफ महाराष्ट (ठेवी) | २३४००-०० | |
| बँक ऑफ बडोदा विश्वस्त (से.) | १९०४८-६८ | |
| स्टेट बँक विश्वस्त (सेव्हिंग्ज) | ४०१५-८८ | |
| पुणे पीपल्स को ऑप बँक | १८५६५-१५ | |
| पुणे पिपल्स को ऑप. बँक (सेव्हिंग्ज) | १९१२५-९० | |
| | एकूण रुपये | ९९३८७०-१२ |

| गं. ना. जोगळेकर | राजा फडणीस | सर्जेराव घोरपडे | मधुकर परांजपे | वि. ग. माटे |
|---|---|---|---|---|
| कोषाध्यक्ष | कार्यवाह | विश्वस्त | विश्वस्त | विश्वस्त |

एकवीस

महाराष्ट्र

शेड्यूल ११

दिनांक १-७-१९८६ ते ३०-६-८७

| खर्च | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **मालमत्तेसंबंधी** | | ३६८०-७० |
| भुईभाडे, म्युनिसिपल कार्पो. कर | ७००-५० | |
| विमा (ग्रंथालय) | ४०-०० | |
| जनरल मेंटेनन्स | २५५३-४० | |
| इमारत दुरुस्ती | ३८६-८० | |
| **व्यवस्थापन** | | ४७८५०-५६ |
| पगार व प्रा. फंड | २३९६४-८५ | |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी | ६०७०-७० | |
| टपाल व दूरध्वनी | ५६४३-८५ | |
| कार्यकारी मंडळ (प्रवासादी खर्च) | ३६५८-७५ | |
| प्रवास व प्रचारकार्य | ३३२०-४० | |
| वीज | ५१९२-०१ | |
| **विभागीय संमेलन** | | ५४०३-०० |
| स्मरणिका | | ३०४-९० |
| **हिशोब तपासनीस** | | ५००-०० |
| **किरकोळ खर्च** | | २९७९-५५ |
| आतिथ्य | २४१०-५० | |
| इतर | ५६९-०५ | |
| **घसारा** | | ६२४०-६२ |
| इमारत | १४८५-३० | |
| फर्निचर व डेडस्टॉक | ११५१-२० | |
| ग्रंथालय | ३६०४-१२ | |
| | | ६६९५९-३३ |

साहित्य परिषद

नियम (१) प्रमाणे

**या वर्षाचे उत्पन्न, खर्च पत्रक**

| उत्पन्न | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **व्याज** | | ५३४१३–२२ |
| सेव्हिंग्ज खात्यावरील | १६७३–९९ | |
| ठेवींवरील | ५१६२७–२३ | |
| डिव्हिडंड | ११२–०० | |
| **देणग्या** | | ४२,००५–०० |
| **अनुदाने** | | ४१,२५०–०० |
| ग्रंथालय | २५००–०० | |
| पत्रिका | ६७५०–०० | |
| वाङ्मयकोश | २२,०००–०० | |
| विभागीय संमेलन | १०,०००–०० | |
| **इतर उत्पन्ने** | | ३६२८१–७० |
| परीक्षा शुल्क | ७८२४–५० | |
| इतर जमा | २५८–८५ | |
| साधारण सभासद वर्गणी | १५८५६–०० | |
| पत्रिका वर्गणी व जाहिरात | ८२८२–०० | |
| संलग्न संस्था वर्गणी | १५०–०० | |
| प्रकाशने | १९६८–३५ | |
| वीज | ८०–०० | |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | १८६२–०० | |
| **पारितोषिके व स्मृतिदिन** | | ७,३००–०० |
| का. र. मित्र स्मृतिदिन व व्याख्यानमाला | ६०००–०० | |
| सावित्रीबाई बार्लिंगे | ५००–०० | |
| बालकवी स्मृतिदीन | ८००–०० | |
| **विभागीय संमेलन** | | १६३०–०० |
| स्मरणिका | | ६३४–०० |
| **तूट** | | ३१७५१–०१ |
| | | २१४२६४–९३ |

| खर्च | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| | | ६६९५९–३३ |
| संस्थेच्या उद्दीष्टांकरिता | | १४७३०५–६० |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | १७३२६–०५ | |
| महामंडळ (प्रवास व वर्गणी) | २०४९–७५ | |
| शाखा सभा वर्गणी हिस्सा | १००५२–०० | |
| पत्रिका (कागद, छपाई, टपाल इ.) | ७२५१४–६५ | |
| ग्रंथालय (वेतन व इतर खर्च) | ९३५५–६० | |
| परीक्षा | ५२५१–८० | |
| वाङ्मयकोश खर्च | ८८९१–०० | |
| इतर प्रकाशने | ५६६–७० | |
| पारितोषिके व स्मृतिदिन खर्च | २१२९८–०५ | |
| | | २,१४,२६४–९३ |

तपासले बरोबर आहे. आमच्या आजच्या तारखेंच्या अहवालानुसार

पुणे : एन. सी. भळगट

दिनांक : ५–९–१९८७ पाटणकर अँड असोसिएटस अकौंटंट्सकरिता



अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषद

# साहित्यिक साहाय्य निधी

**दि. २६-८-८७ पर्यंत साहित्यिक साहाय्य निधीसाठी परिषदेकडे आलेल्या देणग्यांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.**

| देणगीदाराचे नाव | रुपये |
|---|---|
| मागील जमा | ३९,६०१-०० |
| मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई | १५,०००-०० |
| श्री. अरविंद गोखले, बान्द्रा, मुंबई | १०१०-०० |
| श्री. पद्मा गोळे, पुणे | १००१-०० |
| श्री. पंचगंगा सह. साखर कारखाना, इचलकरंजी | १०००-०० |
| श्री. मंगला देवधर, मुंबई | १०००-०० |
| डॉ. सुनंदा परांजपे, पुणे | १०००-०० |
| श्री. अरुण हरकारे, रावजी प्रका. डोंबिवली | ५०१-०० |
| श्री. रा. बा. साने, पेटलाद (गुजरात) | ५००-०० |
| श्री. संतोष दास्ताने, पुणे | २५१-०० |
| श्री. सुभाष भेंडे, मुंबई | १५१-०० |
| श्री. वि. ग. कानिटकर, पुणे | १५०-०० |
| डॉ. सुहासिनी इर्लेकर, बीड | १०१-०० |
| श्री. केशव केळकर, मुंबई | १०१-०० |
| सौ. उज्ज्वला वसंत देसाई, पुणे | १०१-०० |
| श्री. स. शं. देसाई, काणकोण गोवा | १०१-०० |
| डॉ. उषा देशमुख, मुंबई | १०१-०० |
| श्री. अरुण डावखरे, संगमनेर | १०१-०० |
| श्री. इन्दू नारायण शुक्ल, पुणे | १०१-०० |
| श्री. राजा मंगळवेढेकर, पुणे | १००-०० |
| श्री. प्रल्हाद चेंदवणकर, मुंबई | १००-०० |
| श्री. ना. सं. इनामदार, पुणे | १००-०० |
| श्री. शांताबाई शेळके, पुणे | १००-०० |

| देणगीदाराचे नाव | रुपये |
|---|---|
| डॉ. वि. रा. करंदीकर, पुणे | १००-०० |
| श्री. गंगाधर महांबरे, पुणे | १००-०० |
| श्री. नारायण सुर्वे, मुंबई | १००-०० |
| प्रा. दि. के. देशपांडे, अंमळनेर | ५१-०० |
| श्री. फादर फ्रान्सिस दिब्रिटो, वसई | ५१-०० |
| प्रा. प्र. वा. उर्ध्वरेषे, पुणे | ५१-०० |
| श्री. जयवंत वसंत चुनेकर, मुंबई | ५१-०० |
| डॉ. सुधाकर के. भोसले, पुणे | ५१-०० |
| साहित्यप्रेमीभगिनी मंडळ, पुणे | ५१-०० |
| श्री. गो. म. दिंडोरकर, सोलापूर | १०१-०० |
| श्री. दि. मा. धुमाळ, नागपूर प्रका. नागपूर | १०१-०० |
| प्राचार्य महाराष्ट्र उदयगिरी महाविद्यालय (प्राध्यापक वर्गातर्फे) उदगीर | २०१-०० |
| वा. वि. भट, मुंबई | १००-०० |
| डॉ. अशोक केळकर, पुणे | १०५-०० |
| प्रा. पां. श्री. घारे, पुणे | १०१-०० |
| प्रा. विजया राजाध्यक्ष, मुंबई | १०१-०० |
| प्रमुख, परंधाम प्रकाशन, पवनार | १०१-०० |
| श्री. बा. द. सातोस्कर, गोवा | २५१-०० |
| श्री. रामदास फुटाणे, मुंबई | ५००-०० |
| प्रा. द. मा. मिरासदार, पुणे | १०० ०० |
| सौ. गिरिजा कीर, मुंबई | १०१-०० |
| एकूण | ६४,७४१-०० |

## महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची प्रकाशने

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड १**
(आरंभ ते इ. स. १३५०)
संपादक : डॉ. शं. गो. तुळपुळे : रु. १२५

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड २ (भाग १ व २)**
(१३५० ते १६८०)
संपादक : डॉ. स. गं. मालशे : रु. ११०

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ३**
(१६८१ ते १८००)
संपादक : प्रा. रा. श्री. जोग : रु. ३०

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ४**
(१८०१ ते १८७४)
संपादक : प्रा. रा. श्री. जोग : रु. ३०

**मराठी फार्स :**
संपादक : डॉ. भीमराव कुलकर्णी : रु. ६५

**भाषा व साहित्य : संशोधन खंड १**
संपादक : डॉ. वसंत स. जोशी : रु. ३०

**भाषा व साहित्य : संशोधन खंड २**
संपादक : डॉ. वसंत स. जोशी,
डॉ. गं. ना. जोगळेकर : रु. ९०

- वाङ्मयेतिहासाचे चारही खंड एकदम घेतल्यास सवलत रु. २२० + टपाल खर्च.
- सर्व प्रकाशनांना १५ टक्के कमिशन दिले जाईल.

कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
(दूरध्वनी ४४२९६३०)